# कल्याणी

संत एकनाथ महाराज

विशेषांक - १९९७











## उज्वल भवितव्यासाठी

# ओंकार ट्रस्ट

स्थापना २६ जुलै १९९१


'विसावा' अनिकेत सोसायटी नं. १,

बिबवेवाडी, पुणे - ४११ ०३७.

दूरध्वनी क्रमांक : २४२१ ००४७




॥ श्रीराम ॥

सप्रेम नमस्कार

श्री समर्थ रामदास स्वामी व स्वामी विवेकानंद आदि थोर सत्पुरुषांच्या शिकवणी व तत्वज्ञानापासून प्रेरित होऊन 'ओंकार ट्रस्ट' या संस्थेची स्थापना गुरुपौर्णिमा या शुभदिनी - दिनांक २६ जुलै १९९१ रोजी करण्यात आली. (रजि. क्र. इ. १५०५, दि. १०-१०-१९९१)

देणगीदारांना ८० ग अन्वये प्राप्तीकरांत सूट मिळते.

आमच्या न्यासाच्या उद्दिष्टाप्रमाणे - सामाजिक बांधिलकीस्तव विविध उपक्रम ''विनामूल्य'' राबविले जातात, त्यापैकी महत्वाचे काही उपक्रम पुढील प्रमाणे -

१) गुजरवाडी - निंबाळकरवाडी (कात्रजपासून पुढे ५ कि.मी. अंतरावर ग्रामीण भागात) येथे न्यासातर्फे मुले-मुलींसाठी संस्कार वर्ग घेण्यात येतो.

२) मांगडेवाडी ( कात्रजपासून सुमारे ३ कि.मी.) येथे जिल्हा परिषद शाळेतील मुला-मुलींसाठी संस्कार वर्ग आयोजित केला जातो.

३) कर्वे स्त्री शिक्षण संस्था येथील इयत्ता आठवीतील निवासी मुलींसाठी (सुमारे १८० मुली) संस्कार वर्ग घेतला जातो.

४) डॉ. पारस शहा यांचे नेतृत्वाखाली आतापर्यंत निरनिराळ्या वर्षी आठ नेत्र चिकित्सा शिबिरे गरीब व गरजू व्यक्तींसाठी घेण्यात येवून गरजूंना औषधे व चष्मे मोफत देण्यात आली.

५) तसेच न्यासाने कॅन्सर चिकित्सा शिबीर - मांगडेवाडी येथे, मधुमेह चिकित्सा शिबीर - बिबवेवाडी पुणे येथे व सर्वसाधारण रोगनिदान शिबीर - गुजरवाडी-निंबाळकरवाडी येथे आयोजित केली आहेत.

६) उत्कृष्ट सामाजिक कार्य करणाऱ्या व्यक्तिला अथवा संस्थेला ''वसुंधरा कृतज्ञता'' (न्यासाच्या संस्थापिकेच्या नांवाने) पुरस्कार गेली १२ वर्षे देण्यात येत आहे. या पुरस्काराचे स्वरुप मानपत्र, स्मृतिचिन्ह व रोख रक्कम रु.५०००/- असे आहे. पुरस्कार देण्यात आलेल्या व्यक्ति-संस्था - १) डॉ. स्वर्णलता भिशीकर-सोलापूर २) प्रा. डॉ. अशोक कामत-पुणे ३) समर्थ भक्त सुनीलजी चिंचोलकर-पुणे ४) द्वा. वा. केळकर - पुणे ५) डॉ. सुनीलकुमार लवटे - कोल्हापूर ६) सौ. सिंधूताई सपकाळ - ता. पुरंधर (जि. पुणे) ७) डॉ. पारस शहा - पुणे ८) श्री. श्रीकांत मुंदडा - पुणे ९) श्री. गिरीष यशवंत प्रभुणे - चिंचवड १०) मानव्य संस्था - (संस्थापिका - कै. विजयाताई लवाटे) पुणे ११) डॉ. राजा व सौ. वेणूताई दांडेकर - ता. दापोली (जि. रत्नागिरी) १२) आपल घर (संस्थापक - श्री. विजयजी व सौ. साधनाताई फळणिकर)

७) न्यासाने मराठी व इंग्रजी हस्ताक्षर सुधार प्रकल्प श्री. नानासाहेब लाभे, नागपूर यांचे मार्गदर्शनाखाली ६ वर्षांच्या कालावधीत सुमारे ३५ शाळांमधून

घेतला व त्याचा फायदा सुमारे १०,००० पेक्षा जास्त विद्यार्थ्यांना झाला.

८) न्यास वेळोवेळी आध्यात्म, संतविचार इ. करिता थोरामोठ्यांची प्रवचने / व्याख्याने आयोजित करते. समर्थ भक्त श्री. सुनीलजी चिंचोलकर यांची श्री. एकनाथ महाराज यांचे चिरंजीव काव्य या विषयावर ३ प्रवचने आयोजित करण्यात आली होती.

तसेच यावर्षी ''यांनी घडविला महाराष्ट्र'' या विषयांवर अधिकारी व्यक्तिंची व्याख्याने आयोजित केली होती.

क्रांतीकारक - श्री. निनाद बेडेकर

समाजसुधारक - डॉ. सदानंद मोरे

संतांचे कार्य - डॉ. यशवंत पाठक

याशिवाय डॉ. यशवंत पाठक, प्रमुख - ज्ञानदेव अध्यासन, पुणे विद्यापीठ, पुणे यांनी १) येणे वाग्यज्ञे तोषावे - श्री ज्ञानेश्वर महाराज २) एका जनार्दनी शरण - श्री एकनाथ महाराज ३) उत्कट भव्य तेचि घ्यावे - श्री समर्थ रामदास स्वामी या विषयांवर ३ दिवसांची प्रवचन माला गुंफली.

९) न्यास दरवर्षी खालील शिष्यवृत्या - पारितोषिके देत आहे -

१) हुशार व गरीब विद्यार्थीनीला उच्च शिक्षणासाठी रु. ५०००/- ची शिष्यवृत्ती कै. नलिनी विष्णू जोगळेकर यांचे नावाने, त्यांचे बंधु श्री. गजानन विष्णू जोगळेकर यांनी दिलेल्या देणगीतून देण्यांत येते.

२) श्रीमती मृणालिनी अशोक जोगळेकर यांनी त्यांचे पती कै. श्री. अशोक विष्णू जोगळेकर यांचे स्मरणार्थ दिलेल्या देणगीतून गुजरवाडी - निंबाळकरवाडी येथील एक विद्यार्थी व एक विद्यार्थीनीस प्रत्येकी रु. ७००/- ची शिष्यवृत्ती देण्यांत येते.

३) श्री. विष्णू काशिनाथ आठल्ये यांनी दिलेल्या देणगीतून शालांत परिक्षा, पुणे विभागांत संस्कृत व मराठी विषयांत प्रथम येणाऱ्या विद्यार्थ्यांना कै. श्री. काशिनाथ लक्ष्मण आठल्ये व कै. सौ. विजया काशिनाथ आठल्ये या नावांने पारितोषिके देण्यांत येतात.

१०) ओंकार न्यास गेली १० वर्षे गरीब मुले-मुली दत्तक घेत असून त्यांचा पालन-पोषण, शिक्षण इ. खर्च करत आहे. त्यांचे निवासासाठी गुजरवाडी - निंबाळकरवाडी येथे रु. ६,००,०००/- खर्च करून १६०० चौरस फूट इमारत बांधकाम केले आहे. सध्या ६ मुले-मुली दत्तक घेतली आहेत. त्यांच्या व वाडीतील मुलांच्या विकासासाठी खालील कार्यक्रम राबविले जातात.

दररोज २ तास इंग्रजी व हिंदीचा वर्ग घेतला जातो व त्यालाही मुलांची उपस्थिती चांगली असते आणि त्यांना त्याचा छान उपयोग होत आहे.

संस्कार वर्गात नेहमीच्या उपक्रमाशिवाय गीतापाठ चालू केला आहे. गीता शिकविण्यास कसबा पेठ, पुणे येथून श्री. किशोर वैद्य सर विना मानधन नियमीत येतात. त्यांनी स्वतः मुलांसाठी पुस्तके, सीडी इ. सर्व साहित्य आणले आहे. त्यांच्या सुलभ रीतीने शिकविण्याच्या पद्धतीमुळे मुलांना सुद्धा गीतापाठाची गोडी लागली आहे.

याशिवाय विश्वस्त श्रीमती मालती निमोणकर यांनी यावर्षी नवीन उपक्रम चालू केला आहे. वाडीतील इयत्ता १०वी मध्ये असणाऱ्या काही मुलींना घरी अडचणी असतात, अभ्यासाचे वातावरण नसते, मार्गदर्शन करणारे कोणी नसते. श्रीमती निमोणकर अशा मुलींना न्यासाच्या वाडीतील जागेत अभ्यासाला बोलावून त्यांचेकडून योग्य रीतीने अभ्यास करून घेतात, त्यांच्या अडचणी समजावून घेऊन त्यांना आर्थिक व मानसिक आधार देतात. खरेतर मुलींना मनापासून शिकायचे असते परंतु घरातील वातावरण, अडचणी इ. मुळे त्या नापास होतात व नंतर शिक्षण बंद होते ह्यावर मात करण्याच्या दृष्टीने श्रीमती निमोणकर हा प्रयत्न करत आहेत.

१२) ओंकार न्यास दरवर्षी कल्याणी विशेषांक वेगवेगळ्या संतांवर प्रकाशित करत असते. आतापावेतो न्यासाने एकूण १७ अंक प्रकाशित केले आहेत. त्यातील काही संतांची नांवे अशी - श्री ज्ञानेश्वर महाराज, श्री गुरुदेव रानडे, श्री टेंबे स्वामी, श्री स्वरुपानंद, पावस, श्री स्वामी चिन्मयानंद, श्री गोंदवलेकर महाराज, श्री समर्थ रामदास स्वामी इ. यापैकी कल्याणींच्या २००० साली प्रकाशित झालेल्या स्वामी श्री स्वरुपानंद विशेषांकास मराठी वृत्तपत्र लेखक संघाचा उत्कृष्ट आध्यात्मिक अंक म्हणून पांडुरंग भाटकर स्मृति पुरस्कार मिळाला आहे.

न्यासाने प्रकाशित केलेल्या सर्व कल्याणी विशेषांकास साधक / वाचक यांचेकडून फारच उत्तम प्रतिसाद मिळाला आहे. मागील कल्याणी विशेषांक एप्रिल २००८ मध्ये समर्थ रामदास स्वामी यांचेवर श्री. चंद्रशेखर महाराज आठवले (पंढरपूर) यांचे शुभहस्ते प्रकाशित करण्यांत आला असून पुढील कल्याणी विशेषांक आद्य श्री शंकराचार्य यांचेवर एप्रिल २००९ मध्ये प्रकाशित करण्यात येत आहे. तसेच समाजासाठी अतुलनीय कार्य केल्याबद्दल वसुंधरा पुरस्कार देण्यांत येणार आहे.

सुसंस्कृत समाज बनण्यासाठी बालांचे मन सुसंस्कृत होणे आवश्यक आहे. ट्रस्टच्या या कार्यात समाजातील विविध स्तरांतून सक्रिय पाठिंबा व सहभाग मिळत आहे.

आपण आमच्या कार्यास

१) देणगी रुपाने २) वस्तु रुपाने

३) न्यासात कार्यरुपाने भाग घेऊन

मदत करु शकता.



**चित्रकार : कै. श्री. जि. भि. दीक्षित**

(श्री. प्रकाश जिवाजी दीक्षित यांचे सौजन्याने)



उज्वल भवितव्यासाठी

# ओंकार ट्रस्ट

(स्थापना २६ जुलै १९९१)

'विसावा' अनिकेत सोसायटी नं. १, बिबवेवाडी,
पुणे ४११ ०३७.

टेलिफोन क्रमांक : ४१००४७

मुंबई सार्वजनिक विश्वस्त कायदा १९५० अन्वये
नोंदणीकृत संस्था नोंदणी क्रमांक -
ई १५०५ दिनांक १० ऑक्टोबर १९९१

कलम ८०ग खाली आयकर सवलत क्रमांक :
पी एन् / ६५ / डी २० / १९९६-९७ दिनांक २३-६-९६
१-४-९६ ते ३१-३-९९ या कालावधीसाठी आयकर सवलत प्राप्त



**श्रीएकनाथ महाराजांनी ज्ञानेश्वरी ग्रंथ संशोधन केल्यानंतर ज्ञानेश्वरी संबंधाने केलेल्या ओव्या.**

*श्री शके पंधराशें साहोत्तरी । तारणनाम संवत्सरी ।*
*एकाजनार्दनें अत्यादरी । गीता ज्ञानेश्वरी प्रति शुद्ध केली ॥ १ ॥*
*ग्रंथपूर्वीच अतिशुद्ध । परीपाठांतरी शुद्ध अबद्ध ।*
*तो शोधुनियां एवंविध । प्रतिशुद्ध सिद्ध ज्ञानेश्वरी ॥ २ ॥*
*नामे ज्ञानेश्वरा निष्कलंका । जयाची गीतेची वाचितांटीका ।*
*ज्ञान होय लोकां । अतिभाविका ग्रंथार्थिया ॥ ३ ॥*
*बहुकाळ पर्वणी गोमटी । भाद्रपदमास कपिला षष्ठी ।*
*प्रतिष्ठानी गोदातटीं । लेखन कामासाठी संपूर्ण जाहली ॥ ४ ॥*



# संपादकीय

*जगाच्या कल्याणा संताच्या विभूति ॥*
*देह कष्टविती अपरंपार ॥ श्रीतुका ॥*

महाराष्ट्र ही संतांची भूमी आहे. संत परंपरा ही महाराष्ट्राला मिळालेली देणगी आहे. संत शिरोमणी श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्यापासून आजतागायत ही परंपरा चालू आहे. या सर्व संत मंडळींनी आपल्या आचरणातून व वाङ्मयामधून समाजाला प्रबोधन केले. खऱ्या धर्माची, स्वकर्तव्यांची जाणीव समाजाला करून देऊन लोकांना योग्य दिशा दाखविली. खऱ्या ज्ञानापासून वंचित झालेल्या जनतेला अज्ञानातून बाहेर काढण्याचे कार्य ही मंडळी सतत करत आलेली आहेत.

संत बहिणाबाईंच्या अभंगातील भागवत धर्म मंदिराचा भरभक्कम आधारस्तंभ असणारे संत एकनाथ 'ज्ञानाचा एका' हे याच परंपरेतील एक संतश्रेष्ठ. भारुडे, गौळणी यासारख्या लोकगीतातून त्यांनी केलेल्या जनजागृतीला तर तोडच नाही. लोकाभिमुख राहून विघातक रुढी, परंपरा, कर्मठपणा या कशाचीही तमा न बाळगता सामान्य जनामध्ये जनार्दन पाहणारे संत एकनाथ, सांस्कृतिक पुनर्जीवनाचे प्रवर्तक एकनाथ महाराज,

*जीवही शिव । शिवही जीव । नाही भेदाभेद बाबा । एका जनार्दनी एकरूप सहज । स्वानंद कर बाबा ॥* असे ठोक भाषेत तत्वज्ञान सांगणारे संत एकनाथ, प्रपंचामध्ये कमळपत्राप्रमाणे अलिप्त राहून प्रपंच व परमार्थ याचा सुवर्णमध्य गाठणारे एकनाथ महाराज, एक समाजसुधारक सिद्ध पुरुष, शांत रसाचा झुळझुळता झरा असणारे शांतीब्रह्म एकनाथ किती म्हणून वर्णन करायचे. वर्णन करायला शब्द अपुरेच आहेत. अशा संतश्रेष्ठींच्या वाङ्मय प्रकाराची एक - एक पाकळी उलगडून त्याचे यथार्थ सौंदर्य दर्शन घडवणारा हा अंक वाचकांच्या हातात देताना अतिशय आनंद होत आहे.

नेहमीप्रमाणेच याहीवेळी पण ज्ञानी व विचारवंत लेखकांनी निरपेक्ष वृत्तीने आपले लेख देऊन आम्हाला उपकृत केले आहे. त्यांचे आभार मानावेत तेवढे थोडेच आहेत.

"ओंकार" ट्रस्टच्या उज्ज्वल प्रगतीची वाटचाल अंकामध्ये स्वतंत्रपणे समाविष्ट केलेली आहे.

ज्यांच्या सहकार्यामुळे हा अंक निघू शकतो अशा सर्व लेखकांचे, जाहिरातदारांचे व अंक काढण्यासाठी हस्ते, परहस्ते मदत करणाऱ्या सर्व हितचिंतकांचे आभार मानणे म्हणजे पुन्हा पुन्हा तेच ते सांगण्यासारखे आहे. परंतु असे असले तरी आभार मानल्याशिवाय राहवत नाही. त्याचप्रमाणे ओंकार ट्रस्टशी सतत संपर्क ठेवून वेळोवेळी मदत करणारे ख्यातनाम चित्रकार कै. जी. भि. दीक्षित हे जरी आज आपल्यात नसले तरीसुद्धा त्यांचे सुपुत्र प्रकाश दीक्षित यांनी त्यांच्या वडिलांनी काढलेले श्रीसंत एकनाथ महाराज यांचे चित्र या अंकासाठी उपलब्ध करून दिले व आम्हाला उपकृत केले आहे त्याबद्दल आम्ही त्यांचे ऋणी आहोत.

वाचकांचा प्रतिसाद व हितचिंतकांच्या सदिच्छा हाच आमचा उत्साह आहे.

जय जय रघुवीर समर्थ

**सौ. रजनी काळे**


**मुखपृष्ठ व चित्रे**
भरत केतकर

**व्यवस्थापकीय सहकार्य**
शाम देऊळकर
अनंत सर्व्हीसेस, पुणे ३८.

**अक्षरजुळणी**
प्रतिमा ऑफसेट, पुणे ४.

**छपाई**
प्रतिमा ऑफसेट, पुणे ४.

**प्रोसेसिंग**
पिक्सेल ग्राफिक्स प्रा. लिमिटेड, शनिवार पेठ, पुणे - यांच्या सौजन्याने.






CENTRAL CHINMAYA MISSION TRUST
SANDEEPANY SADHANALAYA,
POWAI PARK DRIVE,
BOMBAY - 400 072.
TEL. : ~~578 43 69~~ 852 43 69

*Swami Purushottamananda* Camp - BELGAUM.
Dt - 23-2-1997

---

प्रिय,

श्री. भा. वा. सातवळेकर

ट्रस्टी, ओंकार ट्रस्ट, बिबवेवाडी, पुणे - ३७.

ॐ नमो नारायणाय । सप्रेम हरि श्रीप्रणाम ।

संतांचे जीवन विकासात्मक विचार आणि चरित्र 'जगाच्या कल्याणा संतांच्या विभूति' ह्या संतोक्तिनुसार समाजात सदाचार, सद्भावना व सद्विचार जागृत करून जीवनाची केवळ सफलताच नव्हे तर सार्थकता साधून सद्दर्शन घडविणारे असतात. त्या दृष्टीने आपले ट्रस्टद्वारा आतापर्यंत अनेक संतांचे उद्बोधक विशेषांक 'कल्याणी' मधून प्रसिद्ध झालेले आहेत. ते खरोखरच स्तुत्य आहेत. त्याचप्रमाणे आता कल्याणीचा श्रीसंत एकनाथ महाराज विशेषांक लवकरच मार्च १९९७ मध्ये प्रसिद्ध होत आहे हे समजून अतिशय आनंद झाला.

श्रीसंत एकनाथ महाराजांचे अभंगातून व इतर लिखाणांतून प्रकटलेले भावपूर्ण विचार आणि तसेच त्यांचे चरित्र संसारामध्ये राहून अत्यंत अलिप्तपणे 'परमार्थ जीवन' जगून जीवनाची सफलता व सार्थकता साधण्याचे दृष्टीने विशेष महत्वाचे आणि सन्मार्गदर्शक आहेत. त्या दृष्टीने प्रस्तुत विशेषांकाच्या जास्तीत जास्त जिज्ञासू, भाविक, साधक-वाचक लाभ घेवोत ही सद्भावना व्यक्त करतो व हे संत विचार, आचार व प्रचाराचे कार्य उत्तरोत्तर उत्साहाने प्रगतपणे वृद्धिंगत होवो ही 'तत्' चरणी प्रार्थना करतो. ॐ तत्सत्-हरिॐ

सर्वांना प्रेम क्षेम व हरि ॐ ।

(स्वामी पुरुषोत्तमानन्दसरस्वती)

ॐ जय गुरुदेव

ॐ जय जगदीश्वर

# ओंकार ट्रस्टची उज्वल वाटचाल



### १९९१-९२

- ११ जुलै १९९१ गुरुपौर्णिमा 'ओंकार ट्रस्टची स्थापना' आद्यसंस्थापक कै. सौ. वसुंधरा मातवळेकर
- गुजरवाडी, निंबाळकरवाडी मांगडेवाडी येथे शाळेमध्ये संस्कारवर्गास सुरवात

### १९९२-९३

- प्रथम वर्धापन दिन गुरुपौर्णिमा 'कल्याणी' प्रथम विशेषांकाचे प्रकाशन
- मांगडेवाडी येथे शिवणवर्ग.
- गुजरवाडी, निंबाळकरवाडी येथे दवाखान्याची सुरवात. मोफत वाचनालय सुरू
- गुलबर्गा कर्नाटक राज्य येथे वर्षातून दोनदा वर्ग घेतला जातो.

### १९९३-९४

- नियोजित प्रकल्पासाठी ४१ गुंठे जागेची खरेदी
- सुनील चिंचोलकर, सौ. सोमण, के. एन. दिसबुड, शि. ग. काशीकर, च. यां. भिशीकर आदींची व्याख्याने
- शिवणवर्गाचे रूपांतर दासबोध वर्गात
- दासनवमी विशेषांकाचे प्रकाशन.
- सौ. अलका देव मारूलकर यांचे गायनाचा कार्यक्रम
- कीर्तन - सौ. मोने



### १९९४-९५

- 'स्वामी विवेकानंद' विशेषांकाचे प्रकाशन.
- मोफत नेत्रचिकीत्सा शिबीर. २०५ लोकांची तपासणी. १०५ जणांना मोफत चष्मे. ४ जणांवर मोफत शस्त्रक्रिया
- युवा संघटनेमार्फत आयोजित मराठीनृत्य स्पर्धेत भाग.
- कात्रजच्या हस्तकला प्रदर्शनात संस्कारवर्गाचा सहभाग. संस्कार वर्ग: मार्केटयार्ड (भटक्या मुलांसाठी), हिंगणे स्त्री-शिक्षण संस्था, धनकवडी शाळा.

### १९९५-९६

- ह. भ. प. कृष्णकांत नाईक यांचे प्रवचन.
- संत ज्ञानेश्वर महाराज विशेषांक
- कीर्तन - सौ. सईताई मोने.
- श्री बा. दा. केळकर यांना सज्जनगडच्या 'स्वामी समर्थ पुरस्कार' मिळाल्याबद्दल सत्कार
- गुजरवाडी जि. प. शाळेतील १८ मुलं शिवथर घळ समर्थ विद्यापीठाच्या भारतीय संस्कृती दर्शन प्रथम परिक्षेला बसली.
- सर्वसाधारण चिकित्सा व कर्करोग निदान, डोळे तपासणी व मोफत चष्मेवाटप, कर्करोगावर स्लाईडसह माहिती ही शिबीरे मांगडेवाडी येथे.
- गुजरवाडी-मांगडेवाडी जि. प. शाळेत विविध स्पर्धा.

## • १९९६-९७ मधील उपक्रम •

- संत तुकाराम महाराज विशेषांक
- रविंद्र देशमुख: अभ्यास कसा करावा: इ. ५ - ७
- १६ ऑगस्ट पासून दररोज दवाखाना सुरु.
- हिंगणे स्त्रीशिक्षण संस्थेच्या निवासी मुलींसाठी नेत्रचिकित्सा शिबीर मार्गदर्शक: डॉ. पारस शहा
- भारतीय संस्कृती दर्शन शिवथरघळ येथील समर्थ विद्यापीठाच्या १ल्या व दुसऱ्या परिक्षेला ५० मुले-मुली बसली व यशस्वी झाली. त्यांना ट्रस्ट तर्फे पुस्तके व वह्या देण्यात आल्या
- अक्षर सुधारा प्रकल्प श्री. नानासाहेब लाभे नागपुर यांचे मार्गदर्शना खाली झाला १२०० जणांनी भाग घेतला.
- मांगडेवाडी, गुजरवाडी, धनकवडी येथे निरनिराळ्या स्पर्धा घेऊन बक्षीसे देण्यात आली
- श्री. ना. ए. घासकडवी यांचे भक्तिसंगीत
- श्री. मधुकरराव कुलकर्णी यांचे काव्य वाचन.
- श्री. कृष्णकांत नाईक यांचे निंबाळकरवाडी येथील विठ्ठल रखुमाई मंदिरात प्रवचन



- श्री. बबनराव नावडीकर यांचे भावगीत व भक्तिसंगीत: आयोजन जेष्ठ नागरिक संघ
- राधाबाई हर्डीकर यांचे स्मरणार्थ प्रसूती गृह ← उभारण्यात आले

ॐ

॥ श्रीपांडुरंग प्रसन्न ॥

श्री. भा. वा. सातवळेकर,
ओंकार ट्रस्ट,
पुणे

ओंकार ट्रस्टद्वारा करण्यात येत असणाऱ्या सांस्कृतिक, सामाजिक व साहित्यिक कार्याविषयी जाणून फार समाधान वाटले. समाजकार्य, समाजाचे भावजीवन व त्याला आवश्यक असणारे आध्यात्मिक अधिष्ठान यांचा एवढा विचारपूर्वक अनुबंध फार क्वचित सांभाळला जातो. अनेक समाजोपयोगी कार्यांमध्ये जे दोष शिरलेले दिसतात, त्याला कारण मानवी जीवनाच्या या तीन अंगांचे संतुलन राखण्याचे भान ध्येयवादी व्यक्तींच्या ठिकाणीही राहात नाही असे दिसते. जिथे हे संतुलन राखले जाते तेथे ते कार्य लोकांची दुःखे प्रेमाने दूर करते, सांस्कृतिक जीवन संपन्न करून लोकजीवनात आनंदाची सृष्टी निर्माण करते आणि कार्य करणाऱ्या व्यक्तीला अभिमान-रहित अशा शुद्ध सात्त्विक सुखाची तृप्ती मिळवून देते. ओंकार ट्रस्टचे कार्यकर्ते अशा तृप्तीचे धनी होतील, कारण संतांपासून प्रेरणा घेऊन ते संतकार्यच करीत आहेत.

किंबहुना दिवसराती । पुढिलांचे सुख उन्नति ।
आणित आणित स्वार्थी । प्रवेशिजे ॥ - ए. १६.२०२

असे त्यांचे कार्य आहे. लोकोपकार हे आत्मकल्याणाचे उत्कृष्ट साधन आहे हा श्रीसंत एकनाथांचा विचार त्यांच्याविषयीच्या विशेषांकाद्वारे लोकमानसात दृढ करण्याचा त्यांचा उपक्रम, म्हणूनच, सद्यःस्थितीत अत्यंत योग्य ठरतो.

या त्यांच्या कार्याने सर्वात्मक भगवान निश्चितच प्रसन्न होईल.

पंढरपूर.
दि. २१.३.९७

भानुदास महाराज देगलूरकर,

## ज्ञानियाचा एका

ज्ञानियाचा एका    बोल हे ऐकतां ।
ठेवितो मी माथा    तुझ्या पायीं ॥ १ ॥
ज्ञानाईनें तुला    सांगतांच स्वप्नीं ।
आलास धावुनी    आळंदीस ॥ २ ॥
तूंच एक पुत्र    खरा श्रद्धावंत ।
माउलीचें आर्त    जाणणारा ॥ ३ ॥
नंदीद्वारांतून    प्रवेशसी आंत ।
माय कृपावंत    पाहिलीस ॥ ४ ॥
कंठी रुतलेली    अजानाची मुळी ।
काढून तूं माउली    मुक्त केली ॥ ५ ॥
पान्हावून तिनें    पोटाशी धरिलें ।
आपलेसें केलें    त्याच क्षणीं ॥ ६ ॥
ज्ञानेश्वरी ग्रंथ    मूळचाच शुद्ध ।
पाठांतरी अबद्ध    होता झाला ॥ ७ ॥
तिच्याच आज्ञेनें    करून प्रतिशुद्ध ।
आमच्या हातांत    दिलास तूं ॥ ८ ॥
भाव धरूनिया    वाचा ज्ञानेश्वरी ।
मंत्र हा वैखरी    तूंच दिला ॥ ९ ॥
तुझें हें वचन    मानून प्रमाण ।
अहोरात्र पठण    केलें आम्ही ॥ १० ॥
वाचतां वाचतां    भेटला श्रीहरी ।
अमृत अक्षरीं    लपलेला ॥ ११॥
'हंसगीत' म्हणे    आला अनुभव ।
श्रीहरी ज्ञानदेव    दोन्ही एक ॥ १२ ॥

**श्रीसद्गुरु चरणांकित, हंसगीत**
**(श्री सद्गुरुकृपामृत या भक्तिकाव्य संग्रहातून)**

श्री. मधुकरराव कुलकर्णी
कृतार्थ सोसायटी, सातारा रोड पुणे ३७.



ओंकार ट्रस्ट १९९७ च्या **"श्री संत एकनाथ महाराज"** विशेषांक, संपादक सौ. रजनी गोपाळ काळे, ट्रस्टी यांनी प्रतिमा ऑफसेट, पुणे ४. येथे छापून, श्री. भालचंद्र वा. सातवळेकर, ट्रस्टी, यांनी 'विसावा' अनिकेत सोसायटी क्र. १, बिबवेवाडी, पुणे ४११ ०३७ येथे प्रकाशित केला.

टीप : (१) सदरचा विशेषांक **फक्त खाजगी वितरणासाठी** असून तो विनामूल्य आहे.
(२) या अंकात प्रसिद्ध झालेल्या लेखनाशी संपादक सहमत असतीलच असे नाही.



## नामयाचा तुका

नामयाचा तुका    ऐकतां लौकिक ।
गूढ अलौकिक    वाटतसे ॥ १॥
गूढ उकलाया    जाऊन शरण ।
धरिले चरण    नामयाचे ॥ २॥
बापा नामदेवा    आहे मी अजाण ।
गूढ उकलून    सांगा मला ॥ ३॥
नामयाचा तुका    म्हणतात जन ।
याचें मूळ कारण    काय देवा? ॥ ४॥
बाप नामदेव    मंदसा हसला ।
म्हणे ऐक बाळा    एकचित्तें ॥ ५ ॥
पांडुरंग माझा    मी पांडुरंगाचा ।
तसा मी तुकयाचा    तुकया माझा ॥ ६॥
भावभक्तिबळें    घडे नवलाई ।
माउली विठाई    ऐक्य करी ॥ ७॥
पांडुरंगासवें    जाऊन स्वप्नांत ।
करावे कवित्व    सांगितलें ॥ ८॥
भक्तिभावें त्यानें    रचिले अभंग ।
देव पांडुरंग    स्वतः लिही ॥ ९॥
देव भक्त होतां    असे एकरूप ।
अभंग आपोआप    पाझरलें ॥ १०॥
चंद्रभागा वाहे    शब्दाशब्दांतून ।
पांडुरंगा स्नान    घालितसे ॥ ११॥
शब्द पीतांबर    पाहून सोनसळा ।
सूर्यही थांबला    आकाशांत ॥ १२॥
कस्तुरी शब्दांचा    लावियतां टिळा ।
गंध गात गेला    दाही दिशा ॥ १३॥
शब्द तुळशीहार    घालितांच गळा ।
कौस्तुभ लाजला    पाहुनिया ॥ १४॥
तुकयाचा अभंग    झाला पांडुरंग ।
भक्ताचें अंतरंग    तोच होई ॥ १५ ॥
असा अलौकिक    आहे माझा तुका ।
म्हणून नामयाचा तुका    म्हणतात ॥ १६॥
बोल हे ऐकता    झालें समाधान ।
वंदिले चरण    नामयाचे ॥ १७॥
'हंसगीत' म्हणे    बघा भागवत मंदिर ।
वर सुवर्ण कळस सुंदर    झळके तुका ॥ १८॥

**श्रीसद्गुरु चरणांकित, हंसगीत**
**(श्री सद्गुरुकृपामृत या भक्तिकाव्य संग्रहातून)**

श्री. मधुकरराव कुलकर्णी
कृतार्थ सोसायटी, सातारा रोड, पुणे ३७.

# अनुक्रमणिका



## कविता

# लोकशिक्षणाचा अग्रदूत

**कै. श्री. स. कृ. देवधर**

निपुण प्रशासकीय अधिकारी, वै. गुरुवर्य मामासाहेब दांडेकर यांच्या कृपाप्रसादामुळे महाविद्यालयीन शिक्षण पूर्ण करू शकले. संस्कृतचे गाढे अभ्यासक, श्रीगायत्री उपासना व ओंकारसाधना याचे मार्गदर्शक आयुर्वेद व ज्योतिष शास्त्र यात पारंगत. देवदेवेश्वर संस्थान व पुणे महानगरपालिका यांचेतर्फे 'वेदमूर्ति' म्हणून सत्कार. विशेष म्हणजे ३१ डिसेंबर ९६ पूर्वी ठरल्याप्रमाणे आपला लेख सुपुर्द केला व कोल्हापूरला जाण्यासाठी रवाना झाले. ते ६-१-९७ रोजी पुन्हा भेटू म्हणून सांगूनच. परंतु दुर्दैवाने ३-१-९७ रोजी त्यांचे दुःखद निधन झाले. त्यांना ट्रस्टतर्फे शतशः प्रणाम.

महाराष्ट्राला संतांची महान परंपरा लाभली आहे. ज्ञानदेवांच्या काळापासून आजपर्यंत यामध्ये कोठेही खंड पडला नाही हे महाराष्ट्राचे एक महान वैभव आहे. या संतांनी महाराष्ट्राला खऱ्या धर्माची, कर्तव्याची पुन्हा-पुन्हा जाणीव करून दिली. वेळच्या पंडितांनी स्वार्थपणे शास्त्राचे अर्थ लावून खऱ्या जाणीवेपासून, खऱ्या ज्ञानापासून लोकांना वंचित केले. सर्व शास्त्रीय ग्रंथ देवभाषेत असल्याने सामान्यांना त्यातील ज्ञान दुर्लभ झाले. या अज्ञानातून या लोकांना बाहेर काढण्याची आणि त्यांना त्यांच्या कर्तव्याचे यथार्थ ज्ञान करून देण्याची महान कामगिरी या संतांनी आत्मीयतेने केली. त्यामुळे लोकांचा संतांच्या वचनावरील विश्वास सदा वाढत राहिला. त्यांच्याबद्दल श्रद्धा आणि प्रेम प्रगाढ झाले. याचे प्रमुख कारण म्हणजे संत केवळ बोलणारे नव्हते, आचार करणारे होते. त्यामुळेच लोक त्यांच्या पाठीमागे जाऊ लागले. हे चित्र ज्ञानदेवांपासून अविरत दिसते. ज्ञानेश्वरांच्या काळी विविध जाती-जमातींमध्ये संत निर्माण झाले. ते सर्व ज्ञानदेवांच्या छायेत वाढले आणि स्थिरावले. ज्ञानेश्वरांनी गीतेवर मराठी अलंकार चढविला आणि गीतेचे देवभाषेत बंदिस्त झालेले आणि तथाकथित पंडितांच्या सोवळ्या-ओवळ्यांत अडकलेले ज्ञान-प्रबोधन मुक्त केले आणि सामान्यांच्या उद्धाराचा प्रारंभ केला. ज्ञानेश्वरांच्या समाधीनंतर नामदेवांनी त्यांचेच कार्य पुढे चालविले परंतु नामदेवांच्यानंतर काही काळ पुन्हा या पंडितांनी आपला पगडा बसविण्यास सुरुवात केली. परंतु त्यांचे दुर्भाग्य असे की अगदी योग्य वेळी ब्राह्मणकुळात जन्म घेऊन पंडितांचा दर्प नाहीसा करणारा एक असामान्य महापुरुष जन्माला आला.

पैठण हे गाव फार पूर्वीपासून धर्मपीठ म्हणून ख्यात होते. आळंदीच्या ब्रह्मवृंदाला ज्ञानदेवादिकांच्या मौजीबंधनाचा निर्णय करता आला नाही तेव्हा त्या ब्रह्मवृंदांनी ज्ञानदेवांना पैठणला जाण्याचा सल्ला दिला. इतकेच नव्हे तर पैठण महान धर्मपीठ असून अत्यंत विद्वान आणि शास्त्रार्थ करणारे पंडित तेथे आहेत ते जो न्याय देतील तो आम्हास होईल असेही आश्वासन दिले. या वचनांवरून पैठण हे धर्मक्षेत्र म्हणूनच प्रसिद्ध होते याची खात्री पटते. ब्राह्मणांशिवाय शास्त्रविचार कोणी करू नये अगर धर्माचाराबाबत सल्ला देऊ नये असे जवळ जवळ ठरून गेलेले होते. असे असले तरी ज्ञानदेवादी संतांना आणि विशेषतः ज्ञानेश्वरीला अग्रमान देणारेही काही पंडित त्या काळी होते. ज्ञानदेवांपासून त्यांनी ही परंपरा जोपासली होती. ज्ञानेश्वरीचा अभ्यास करण्याच्या निमित्ताने या ब्राह्मणांनीच ज्ञानेश्वरीच्या लिखित प्रती तयार केल्या आणि आपल्या वाचनात ठेवल्या. ज्ञानेश्वरी मुखोद्‌गत्‌ केली आणि त्यामुळेच एकनाथ महाराज म्हणतात त्याप्रमाणे *''परी पाठांतरी शुद्ध अबद्ध''* असे ज्ञानेश्वरीचे स्वरूप नाथांच्या नजरेस आले. या सर्व विवेचनाचा सारांश एवढाच की नाथांच्या काळातसुद्धा ज्ञानदेवादी संतांवर आणि त्यांच्या प्रबोधन ग्रंथांवर विश्वास ठेवणारे, त्याप्रमाणे आचरण करणारे आणि दुसऱ्यांना आचरण करायला लावणारे ब्राह्मण होते. परंतु त्यांची संख्या त्यामानाने फारच कमी होती. त्यांचा आवाज सामान्य लोकांपर्यंत पोहोचत नव्हता. त्यामुळे या शास्त्री पंडितांची छाप या ग्रामीण आणि सामान्य लोकांवर मोठ्या प्रमाणात होती. ती नाहीशी करणे, विसरलेला खरा धर्म पुन्हा नव्याने सांगून लोकांना सुमार्गी करण्याची ज्या वेळी निकड होती अगदी त्याच वेळी नाथांचा जन्म झाला. नाथांना दोन प्रकारे त्याचा फायदा झाला. एकतर नाथांचे घराणे शास्त्री-पंडितांचे होते. त्यामुळे शास्त्राचा परिचय आणि आचार यांचा लाभ त्यांना त्यांच्या बालवयातच झाला. दुसरा लाभ म्हणजे नाथांचे पणजोबा - भानुदास हे ज्ञानदेवांच्या समकालीन होते. ज्ञानदेवांचे दर्शन, सहवास आणि प्रबोधन त्यांना लाभले. ते पंढरीच्या पांडुरंगाचे निस्सीम भक्त होते. पंढरीची त्यांची वारी होती. ती त्यांनी कधी चुकविली नाही. (भानुदास महाराजांच्या अभंगामध्ये त्यांना ज्ञानदेव, नामदेव, सावता माळी, कूर्मदास वगैरे संतांचा सहवास लाभल्याचा उल्लेख आहे.) असा भक्तीचा वारसा ज्यांना लाभला त्यांच्या कुळात नाथांचा जन्म झाला. त्या वेळच्या प्रथेप्रमाणे त्यांच्यावर सर्वोत्तम संस्कार झाले. मौजीबंधनानंतर गायत्रीची दीक्षा त्यांचे आजोबा चक्रपाणी यांच्याकडून मिळाली. ब्राह्मणाचे जे कर्म गीतेमध्ये आणि अन्य स्मृतिग्रंथामध्ये सांगितले आहे त्याप्रमाणे त्यांनी आपले आचरण अत्यंत शुद्ध आणि सात्विक ठेवले. घरच्या घरी ज्याप्रमाणे त्यांना शास्त्रग्रंथाचा सखोल परिचय झाला त्याप्रमाणे ते वागत होते. संस्कृतमधील स्मृतिग्रंथ सामान्यांना कळत नाहीत पण ते त्यांना कळणे आवश्यक आहे असा त्यांचा निर्धार होता. त्यामुळेच देववाणीतील ही शास्त्रे अतीव सुलभपणे कशी सांगता येतील याचा विचार करीत असतानाच जनार्दन स्वामींसारख्या शास्त्रज्ञ, भक्तोत्तम आणि राजकारणदक्ष अशा साक्षात्कारी पुरुषाची भेट झाली. जनार्दन स्वामी स्वतः शास्त्रवेत्ते होते पण शास्त्राच्या मर्यादा ज्या वेळी त्यांना माहीत झाल्या त्या वेळी परमेश्वराला आकलन करणाऱ्या भक्तीमार्गावर त्यांची पावले पडू लागली आणि त्यातूनच ते साक्षात्कारी महापुरुष म्हणून गौरविले जाऊ लागले. एकनाथांची आणि त्यांची भेट हा एक

महान सुयोगच म्हणावा लागेल. कारण जनार्दन स्वामींनी नाथांच्या मस्तकावर आपला कृपाहस्त ठेवला आणि त्यांना उपदेश केला तेव्हा नाथांना भानुदासांची आठवण झाली. आजोबांच्यामुळे नाथांचे लक्ष भानुदास महाराजांच्या लेखनाकडे लहानपणीच वळले. त्यामध्ये असा एक अभंग आहे.

*''दांभिकांचा देव प्रतिमा धातूची । अज्ञान जगाची निष्ठा तेथे ।।*
*योगियांचा देव हातांपायांविण । भक्ताचा सगुण विटेवरी ।।*
*मानसीक पूजा कर्मठांलागी ।। केले कर्म भोगी निश्चयेसी। ।*
*आमुचा हा देव दोनी विलक्षण । निरालंब खूण आहे त्याची ।।*
*साक्षीचाही साक्षी आनंद जिव्हाळा । भानुदास निळा गुज सांगे ।।''*

यामध्ये परमेश्वराकडे जाणारे सर्व मार्ग दाखविले असून भक्तीखेरीज अन्यांची कठीणताही त्यात वर्णन केली आहे. या अभंगातील आशय लक्षात घेवून पुढे काय करावे या प्रश्नाने त्यांच्या मनाला जेव्हा स्पर्श केला तेव्हा जनार्दन स्वामींच्या समोर ते नत झाले. आपल्याला शरण आलेल्या शिष्याला जनार्दन स्वामींनी जो उपदेश केला त्यातूनच नाथांचे जीवन साकारले आहे.

*''सर्वांभूती भाव नको ठेऊ दुजा । तेणे गरुडध्वजा समाधान ।*
*संतासी नमन आलीया अन्नदान । यापरते कारण आणिक नाहीं ।*
*सर्वभावे वारी पंढरीची करी । आणिक व्यापारी गुंतू नको ।*
*म्हणे जनार्दन घेई हाचि बोध । सांडोनी सर्वदा द्वेष भेद ।।''*

जनार्दन स्वामींच्या उपदेशाप्रमाणे नाथ आचार करू लागले. ब्राह्मण असूनही जातीभेदांचा तिरस्कार होऊ लागला. आपण करतो आहोत ते बरोबर की चूक हा नाथांचा संदेह, जनार्दन स्वामींच्या कृपेने नाथांना दत्तात्रयांचे ज्या वेळी मलंग रूपात दर्शन दिले. त्या वेळी पूर्णपणे लयाला गेला. अशा अत्यंत सुदृढ भूमिकेवर त्यांनी सर्वांभूती भगवत्‌भाव ठेऊन कर्मठपणाला बाजूला सारले आणि सामान्य लोकांना प्रबोधित करण्यासाठी ते त्यांच्यातच मिसळले.

भक्तीमध्ये रंगलेल्या नाथांनी समाजाच्या विविध स्तरांतील लोकांचे आणि अंधानुकरणाने चाललेल्या संसाराचे निरीक्षण करण्यास प्रारंभ केला. लोकसंग्रह करण्यासाठी नाथांनी पुराण सांगण्याचे निमित्त केले. त्यामुळे अनेक लोक त्यांच्या पुराणाला येत. नाथांच्या पायी डोकं ठेऊन आपली सुख-दुःखे ते नाथांच्या कानांवर घालत. नाथ त्यांना धीर देत. देवऋषी, गंडे-दोरे, धुपारे यांच्यापासून त्यांचे मन परमेश्वराकडे वळवीत. नाथ म्हणजे शांतीचा सागर होते. कोणालाही दुखावणे त्यांना माहीत नव्हते. स्वतःला कितीही कष्ट सहन करावे लागोत पण दुसऱ्याला केवळ सुखच प्रदान करावयाचे हा त्यांचा बाणा होता.

एकदा महारवाड्यातील एक गृहस्थ नाथांच्या वाड्याबाहेर उभं राहून नाथांचं पुराण ऐकत होता. अन्न हे परब्रह्म आहे. कुठेही असले आणि कोणीही दिले म्हणून अन्नातील ब्रह्मदशा कदापी नाहीशी होत नाही. अन्न देणारा आणि अन्न घेणारा दोघांनाही आनंद देणारे परब्रह्म म्हणजे अन्न. नाथ सांगत होते. श्रोते तल्लीन होऊन ऐकत होते. बाहेर उभ्या असलेल्या त्या पुरुषाच्या मनात विचार आला. नाथांचे पाय आपल्या झोपडीला लागले तर आपलाच काय पण आपल्या सगळ्या वस्तीचा उद्धार होईल. पुराण संपवून नाथ बाहेर आले. त्यांच्या पायांवर मस्तक ठेवीत तो नाथांना म्हणाला, ''नाथबाबा, आपले पाय आमच्या वस्तीला लागले तर...''

''समजलं मला. मी उद्याच येईन.'' नाथ म्हणाले.

''महाराज दुपारच्या वेळी आमच्या बरोबर घास खाल्लेत तर ठीक आहे.''

''उद्या दुपारी मी जेवायलाच येईन. मग तर झालं.'' त्या गृहस्थाच्या डोळ्यात आनंदाश्रूंनी दाटी केली. नाथांना नमस्कार करून तो घरी आला. त्याचा आनंद गगनात मावत नव्हता.

नाथ महारवाड्यात जेवायला जाणार ही गोष्ट नाथांचे चिरंजीव हरिपंत यांना समजली. हरिपंत अत्यंत कर्मठ आणि शास्त्राभिमानी होते. त्यांनी नाथांना न जाण्याची विनंती केली. 'तुम्ही गेलात तर आपण लोकनिंदेला पात्र होऊ' वगैरे सांगितले. यावर नाथ काही बोलले नाहीत. पण दिलेल्या शब्दाप्रमाणे ते महारवाड्यात गेले. तेथे जेवणही केले आणि तृप्त मनाने ते बाहेर पडले. लोकांनी त्यांना विचारले तेव्हा ते म्हणाले, ''ब्राह्मण ज्या देवानी निर्माण केले त्याच देवानी शूद्रही निर्माण केले. ब्राह्मणाला जशी भूक लागते त्याप्रमाणे शूद्रालाही लागते. दोघेही अन्नच खातात. अन्न हे ब्रह्म आहे. त्या ब्रह्माच्या आस्वादासाठी मी गेलो तर बिघडले कोठे?'' हरिपंडितांना नाथ म्हणाले, ''खरे तर भगवंतांनी शूद्रांनाच प्रथम जन्माला घातले. शूद्रोऽजायत । त्यांच्यावर संस्कार केल्याने इतर वर्ण जन्माला आले. शूद्रच जन्माला आले नसते तर ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य तरी कसे निर्माण झाले असते.'' वेदवचनांचा अर्थ कृतीत आणून तथाकथित वेदज्ञांना उत्तर दिले. काशीहून आणलेली गंगा, तहानलेल्या गर्दभाला पाजून नाथांनी हेच दाखवून दिले की 'सर्व खल्विदं ब्रह्म' हे वचन पंडितांनी चर्चा करावी आणि सोडून द्यावी यासाठी नाही तर त्याचा प्रत्यक्ष आचार महत्त्वाचा आहे. आचार परमो धर्मः । ही परमेश्वराने निर्माण केलेली नीती आहे. त्याप्रमाणे आपण वागलो नाही तर परमेश्वराच्या साम्राज्यात तो अक्षम्य गुन्हा आहे.

नाथांच्या या आचाराचा फार मोठा परिणाम पैठणकरांवर झाला. नाथांना कर्मठांनी विरोध केला तर दीन-दुबळ्यांनी नाथांना आपले देव मानले. याचा उपयोग नाथांनी कुशलपणे केला. ते समाजाच्या अठरापगड जातींमध्ये वावरले. दीनदुबळे आणि अज्ञानी लोकांच्या घरादारांत हिंडले. त्यांचे फाटके-तुटके संसार पाहिले. त्यांच्या देवाबद्दलच्या विपरित श्रद्धा पाहिल्या आणि त्यांना सज्ञान करण्यासाठी नाथ सरसावले.

शिकले सवरलेले लोक आपल्या आयुष्याची मर्यादा विसरून देवभक्ती म्हणून निरनिराळे आचार करीत. बाह्य देखावा असला तरी अंतरी देवप्रेमाचा उमाळा मात्र नव्हता. अघटित कर्म करून आपण ईश्वर जोडण्याचा खरा मार्ग चोखाळत आहोत असे भासविणाऱ्यांना नाथ सांगतात,

*नरदेह दुर्लभ जाणा । शतवर्षांची गणना ।*
*त्यामध्ये दुःख यातना । तुम्ही आठवा मधुसूदना ।*

*नलगे तीर्थाचे भ्रमण । नलगे दंडण मुंडण ।*
*नलगे पंचाग्नीसाधन । तुम्ही आठवा मधुसूदन ।*

केवळ त्या मधु राक्षसाचा वध करणाऱ्या देवाला तुम्ही आठवा म्हणजे तुमच्या दुःखांचासुद्धा वध होईल. इतर साधनांचा उपयोग अहंकार वाढविण्यास होतो. अहंकार हा देव आणि साधक यांच्यामधील महान भिंत आहे हे विसरू नका.

संसारी जीवनात दारिद्र्याला तोंड देता देता वैतागलेल्या स्त्रीला नाथांनी खरा परमार्थ आणि खरा संसार कसा आहे ते शिकविले. तिने त्याप्रमाणे आचरण केल्यावर आपला अनुभव सांगताना ती म्हणते -

*मोडकेसे घर तुटकेसे छप्पर । देवाला देवघर नाही।दादला नको ग बाई॥*
*फाटकेच लुगडे तुटकिशी चोळी । शिवाया दोरा नाही ।*
*जोंधळ्याची भाकर आंबाड्याची भाजी । वर तेलाची धार नाही ।*
*सुरतीचे मोती गुळधाव सोने । राज्यात लेणं नाही ॥*
*एकाजनार्दनी समरस झाले । तो रस येथे नाही ॥*

यामुळे असे दिसून येते की नाथ जाती-जमातींच्या संसारात डोकावले. त्यांची दुःखे जाणून घेतली. या दुःखाच्याबरोबर त्यांचा देवभावदेखील त्यांना जाणवला. या देवभावाला त्या अज्ञानी जीवांनी जो आकार दिला होता त्यामध्ये सत्यता नव्हती. ज्याला देवत्वाचा अनुभव नाही, भक्तीचा ओलावा ज्याच्या अंतःकरणात नाही आणि केवळ उदरभरण्याचे साधन म्हणून देवाचा उपयोग करून घेणारा एक वर्ग या समाजात होता. जोशी, ज्योतिषी, कैकायी, भट-भटीण, शांखीण-डखिण वगैरे रूपाने ही मंडळी समाजात वावरत. लोक यांचा आदर करीत, ते सांगतील त्याप्रमाणे अंगारे-धुपारे, बळी भोजन करीत आणि देवाची वाट पाहत बसत. पण त्यांच्या पदरी अखेर निराशाच येत असे. अशा लोकांना योग्य मार्गदर्शन करण्याच्या निमित्ताने नाथांनी त्यांचाच स्वभावदर्शन करून देणारी काव्यरचना केली. त्यांच्यातील दोषाचा पाढा वाचला आणि अखेर एकाजनार्दनी म्हणून खरे काय ते पटवून सांगितले. अशा त्यांच्या या काव्यरचनेला लौकिक अर्थाने भारुड असे म्हटले जाते. पण ती भारुडे म्हणजे लोकशिक्षणाचा वस्तुपाठ आहे. नाथांनी या भारुडांच्या माध्यमातून त्या त्या लोकांच्या भाषेत त्यांना शिकवून शहाणे केले. अहंकार निर्माण झाला म्हणजे सज्ञानी माणसालासुद्धा तो नाचवतो.

*नवल अहंकाराची गोडी । विशेषे न लगे अज्ञानापाठी ।*
*सज्ञानाचे झोंबे कंठी । जाता संकटी नाचवी ॥ ज्ञा. १३*

ज्ञानदेवांच्या या ओवीचा मागोवा घेत नाथांनी अहंकारी लोकांना त्याची जाणीव करून दिली. या अहंकारापासून दूर राहिलात तर भगवंताकडे जाण्याचा मार्ग सुलभ होईल असे सांगताना शेतकरी अगर खेडेगावातील लोकांना परिचित असलेल्या विंचवाच्या दंशाची आठवण करून दिली. विंचुदंश झालेला मनुष्य ज्याप्रमाणे आरडा-ओरडा करत नाचतो त्याप्रमाणे अहंकाराच्या दर्पानेदेखील मनुष्य मी मी म्हणत नाचत असतो. तो अहंकाराचा दंश नाहीसा करावा हे सांगताना नाथांनी एका भारुडाचा उपयोग केला आहे. काम, क्रोध वगैरे शत्रू मनुष्याच्या देहाचा आश्रय करतात आणि त्याचे मूळ अहंकारात आहे. तमोगुणाचा अतिरेक झाला म्हणजे हे दोष निर्माण होतात. तो तमोगुणच नाहीसा करा हा नाथांचा मौलिक उपदेश आणि शिकवण या भारुडाच्या मागे आहे. ते या भारुडात म्हणतात,

*विंचू चावला विंचू चावला । कामक्रोध विंचू चावला ।*
*तम घाम अंगासी आला ॥*
*पंचप्राण व्याकुळ झाला । त्याने माझा प्राण चालिला ।*
*सर्वांगाचा दाह झाला ॥*
*मनुष्य इंगळी दारुणं । मज नांगा मारिला तिनं ।*
*सर्वांगी वेदना जाण । त्या इंगळीची ॥*
*ह्या विंचवाला उतारा । तमोगुण मागे सारा ।*
*सत्वगुण लावा अंगारा । विंचू इंगळी उतरे झरझरा ॥*
*सत्त्व उतारा देऊन । अवघा सारिला तमोगुण ।*
*किंचित राहिली फुणफुण । शान्त केली जनार्दने ॥*

भारुडांच्या माध्यमातून ज्याप्रमाणे त्यांनी तळागाळातील लोकांमध्ये जागृती केली त्याप्रमाणे पंडित वेदाभ्यासी, संन्यासी, उपाध्याय, पुरोहित यांनाही त्यांच्या चुका दाखवायला कमी केले नाही. त्यांना त्यांच्या शब्दांत नाथांनी त्यांचा तथाकथित ज्ञानाचा बुरखा बाजूला करून भगवंताकडे जाणारा मार्ग दाखविला. या दृष्टीने नाथांनी श्रीमत् भागवताच्या एकादश स्कंधावर लिहिलेली टीका एकनाथी भागवत्, भावार्थ रामायण, हस्तामलक, चिरंजीवपद असे अनेक ग्रंथ मार्गदर्शक म्हणून गणले जातात.

नाथांच्या प्रत्येक वाङ्मयीन कृतीमध्ये त्यांच्या काळाचे व्यवहार आणि प्रापंचिक परिस्थितीचे चित्र उमटले आहे. कोणत्याही अनिश्चिततेच्या वातावरणात देवाला अंगारे-धुपारे करणं आणि कौल लावणं हे नाथांच्या काळातही होतं. ऐदीपणाने जीवन जगून परमेश्वराला स्वतःचा स्वार्थ साधण्यासाठी कौल लावणारे आणि आपल्या जीवनातील लौल्य जोपासणारे अनेक ग्रामप्रमुख, देवप्रमुख त्या काळी होते. त्यांना आपण काय करीत आहोत आणि त्याचा परिणाम जनमानसावर काय होईल याचा विचारसुद्धा त्यांना कधी सुचला नाही. ब्राह्मणांनी आपल्या कर्मप्रवणतेचा देखावा करावा आणि त्यातून स्वार्थ साधता येईल का ते पाहावे. दुसऱ्याची टिंगल टवाळीत वेळ घालवावा यापेक्षा त्यांना अन्य जीवनच नव्हते. नाथांनी या परिस्थितीचा आढावा घेत-घेत मार्गदर्शन करण्याचे जे महान कार्य केले ते खासच गौरवाचे आहे.

*या स्थितीचा मागोवा घेताना नाथ म्हणतात -*
*होती पोटासाठी सन्त । नाही हेत विठ्ठली ।*
*तयांचा उपदेश न ये कामा । कोण धर्म वाढवी ।*
*घालुनी माळा मुद्रा गळा । दाविती जिव्हाळा वरीवरी ।*
*एका जनार्दनी ते पामर । भोगिती अघोर यातना ।*

शास्त्रांनी सांगितल्याप्रमाणे नाथांनी आपला संसार शास्त्रविहित केला. संसार सोडून संन्यास घेण्याचा उपदेश त्यांनी कोणालाच केला नाही. उलट आपण करतो तो व्यवसाय म्हणजे भगवंताच्या भक्तिचाच

एक भाग आहे, याचा विसर पडू देऊ नये या उद्देशाने नाथांनी त्यांच्यापूर्वी होऊन गेलेल्या गोराकुंभार, सावतामाळी, चोखामेळा यांची चरित्रे लिहिली आणि दाखवून दिले की या लोकांनी आपल्या वाट्याला आलेला उद्योग कधी सोडला नाही तर त्यातच ते रंगले. आपल्या व्यवसायाचे रूपांतर ईश्वरभक्तीत केले आणि जगाच्यासमोर आदर्श निर्माण केला हे मुद्दाम सांगितले.

ज्ञानदेव नामदेवांच्या नंतर वेदज्ञ व्युत्पन्न पंडितांपासून अशिक्षित ग्रामीणांपर्यंत सर्वांना आपले म्हणून हृदयाशी कवटाळणारे नाथ हे महान सन्त होते. लोकांना नाथांची जवळीक त्यांच्या ग्रंथातून अनुभवायला मिळते. त्यामुळेच ज्ञानदेवांप्रमाणे त्यांची कीर्ति उत्तुंग राहिली आहे आणि पुढेही ती तशीच निनादत राहील यात संदेह नाही.

कै. श्री. स. कृ. देवधर
१२ अद्वैत, कृतार्थ सहकारी संस्था, पुणे-सातारा रस्ता,
पुणे ४११ ०३७.



# नाथांची 'अवधूत-गीता' : शलाका-दर्शन

**डॉ. व. दि. कुलकर्णी**

एम्.ए. पीएच. डी.

१६ वर्षे २ महाविद्यालयात प्राध्यापक. निवृत्त विभागप्रमुख, मुंबई विद्यापीठ. १२ वर्षे ग्रंथसंपदा - समीक्षा - महानुभाव पंथ, अर्वाचीन वाङ्मय-इतिहास, चरित्र आत्मचरित्र इ. संपादक - श्रीगुरुसेवा त्रैमासीक. पुरस्कार - महाराष्ट्र राज्य ग्रंथ पुरस्कार, इचलकरंजी फाऊंडेशन, अखिल भारतीय महानुभव परिषद, मुंबई, मराठी साहित्य संघ, महाराष्ट्र साहित्य परिषद पुणे, मराठी ग्रंथालय, पुणे, कालिका प्रकाशन मडगाव, याज्ञवल्य आश्रम, पुणे इत्यादी.

श्रीसंत एकनाथ महाराजांची वाणी बालपणापासून माझ्या कानी पडत आली आहे. माझे वडील नाथ-भक्त होते. ते नित्य 'एकनाथी भागवत' वाचत. नाथांच्या 'रुक्मिणी-स्वयंवरा'चा अध्याय वाचल्याशिवाय ते जेवण घेत नसत. नाथांचं जीवन त्यांना आदर्श वाटे. प्रपंचात राहून परमार्थप्राप्ती कशी करावी यांचे ते आदर्श उदाहरण आहे, असं ते सांगत. नाथांनी उत्तम प्रपंच केला आणि परमार्थही उच्च प्रतीचा साधला. भागवत-संत-मंडळीत आदर्श गृहस्थधर्मी, साक्षात्कारी, संत-सत्पुरुष म्हणजे श्रीसंत एकनाथ महाराज हेच होत ! "धन्यो गृहस्थाश्रमः । धन्यो परमार्थमार्ग :" असे उद्‌गार एकाच वेळी मुखातून बाहेर पडतात, ते नाथांच्याकडे पाहून !

नाथांचं एकनाथी भागवत वाचत असताना आम्ही भांवडं जवळपास असलो, तर वडील आम्हाला बोलावून घेत आणि त्यातले महत्त्वाचे विचार उलगडून दाखवत. ते वृत्तीनं अतिशय मृदू, हळवे होते. सात्त्विकतेच्या गहिवरानं त्यांचा कंठ दाटून येई. नेत्र ओलावत. 'एकादश स्कंध' हा तत्त्वज्ञानपर ग्रंथ, पण त्यातही असे प्रसंग येतात. 'कपोताख्यान' वाचताना त्यांना अश्रू अनावर होत. श्रीकृष्ण निर्याणाचा प्रसंग तर ते अर्धवट वाचून मिटूनच ठेवत. हे माझे वडील एकनाथांच्या एखाद्या भावोत्कट दृष्टान्तानंही भावमग्न होत. हे क्षण आम्ही अनेकदा पाहिले आहेत. मात्र 'भागवता'तील धर्मदर्शन घडवताना ते शांत, मोकळे, प्रसन्न असत. 'यदु-अवधूत-संवाद' त्यांना फार आवडे. "धर्माचं इतकं सोपं आणि प्रत्यक्ष असं दर्शन अन्यत्र कुठं असलेसं वाटत नाही," असं ते म्हणत.

'जनीजनार्दन' पाहणारे श्रीएकनाथ महाराज हे श्रीजनार्दन स्वामींचे गुरुपरंपरेने शिष्य होते, ते 'एका जनार्दन' होते, तर महाराष्ट्र-भागवत मंडळात ते श्रीसंत ज्ञानेश्वर महाराजांच्या ज्ञानभक्तीपर वाङ्मयपरंपरेतले, त्याच पदवीचे थोर अधिकारी संत कवी होते, ते 'ज्ञानाचा एका' होते. नाथांच्या धर्मजीवनात ब्रह्मा-विष्णू-महेश यांच्या शक्तींचा सुंदर एकमेळ झाला होता. त्यांच्या रूपानं 'प्रतिष्ठान' क्षेत्री सर्व धर्मपंथांचा एकरसात्मक विमल तीर्थ-तडाग तुडुंबला होता. नाथ हे मूर्तिमंत शांतिब्रह्म होते. भूतदयेचे महार्णव होते. सारी सृष्टी त्यांची गुरू झाली होती. अखिल प्राणिजात त्यांना गुरुस्थानी होतं. माझे वडील 'एकनाथी भागवत' वाचत असताना 'यदु-अवधूत-संवाद' आला की आम्हा भावंडांना बोलावून घेत व तो संवाद आमच्या कानी घालत.

*'जो जो जयाचा घेतला गुण । तो तो गुरु म्यां केला जाण।*
*गुरुसी आले अपारपण । जग संपूर्ण गुरू दिसे ॥'*

ही ओवी ते स्पष्ट करून सांगत. ही ओवी म्हणजे या 'यदू-अवधूत-संवादा'चं प्राणसूत्र आहे. हा संवाद 'श्रीमद् भागवता'च्या एकादश स्कंधाच्या, अध्याय ७, ८ व ९ यामध्ये येतो.

'श्रीमद्‌भागवता'चा एकादश स्कंध म्हणजे 'उद्धवगीता' होय. 'महाभारता'मध्ये भगवान श्रीकृष्णांनी कुरुक्षेत्रावर अर्जुनाला जे धर्मज्ञान दिलं ते 'अर्जुन गीता' होय आणि आपल्या निर्याणापूर्वी भगवान श्रीकृष्णांनी उद्धवाला जे धर्मज्ञान दिलं ते 'उद्धव गीता' होय. तिथं अर्जुन जसा प्रश्न-शंका विचारतो व भगवान त्यास उत्तर देतात, तसाच प्रकार इथंही आहे. उद्धवाच्या प्रश्न-शंकांचं भगवंत निरसन करतात तो भाग म्हणजे 'भागवता'तील 'एकादश स्कंध - श्रीउद्धव गीता' होय! इथं उद्धवानं असा प्रश्न केला आहे की, "भगवंता, मानवयोनीत राहणारे, स्थिर मनाचे ज्ञानी पुरुष ईश्वराचं - म्हणजेच आत्म्याचं - स्वरूप कोणत्या प्रत्यक्ष आणि अनुमान प्रमाणांनी, साधनांनी ठरवतात, ते मला जाणून घ्यायचं आहे." तेव्हा भगवंतांनी यदुराजा आणि अवधूत यांच्यामध्ये पूर्वी झालेला प्रसंगसंवाद उद्धवास सांगितला. या संवादास 'अवधूत-गीता' म्हणतात.

अवधूत यदुराजास सांगतात, "हे राजा, प्रत्यक्ष आणि अनुमान या प्रमाणांच्या साहाय्यानं माझी बुद्धी विचिकित्सा करीत राहिली व तिनं मोक्षमार्गास नेणारे चोवीस गुरु मला दाखविले. त्यांचं प्रत्यक्ष उदाहरण पाहून आणि त्यांच्या वर्तनावरून अनुमान काढून मी संगविरहित झालो, पूर्ण समाधान पावलो आणि त्या समाधानानं आता पृथ्वीवर भ्रमण करीत राहिलो आहे. हे माझे चोवीस गुरू कोणते ते नीट ऐक -

*पृथिवी वायुराकाशमापोऽ ग्निश्चंद्रमा रविः ।*
*कपोतो ऽ जगरः सिन्धुः पतंगो मधुकृत् गजः ॥*
*मधु हा हरिणो मीनः पिंगला कुररोऽर्भकः ।*
*कुमारी शरकृत्सर्पः ऊर्णनाभिः सुपेशकृत ॥"*

(भागवत, ११-३३-३४)

(१) पृथ्वी, (२) वायू, (३) आकाश, (४) अग्नी, (५) जल, (६) चंद्र, (७) सूर्य, (८) कपोत (कबूतर), (९) अजगर, (१०) समुद्र, (११) पतंग (दिव्यावर झडप घालणारं पाखरू), (१२) मधमाशी,

(१३) हत्ती, (१४) भुंगा, (१५) हरीण, (१६) मासा, (१७) पिंगला नावाची वेश्या, (१८) टिटवी, (१९) मूल, (२०) कुमारी, (२१) बाण करणारा लोहार, (२२) सर्प, (२३) कातणी आणि (२४) कुंभारीण कीटक. विचाराच्या युक्तीनं व आत्मबुद्धीनं या चोवीस गुरुंचं भजन केले असता 'पंचविसावं तत्त्व जे परब्रह्म' त्याची प्राप्ती मी करून घेतली,'' असं अवधूतांनी सांगितलं. यापुढं अवधूतांनी कोणत्या गुणासाठी कोणता गुरू केला आणि कोणत्या विचारानं व युक्तीनं ते गुण स्वतःच्या अंगी बाणविले ते यदुराजाला सांगितलं आणि शेवटी आपणास आत्मस्थिती कशी लाभली ते स्पष्ट केलं.

अवधूतांनी हे गुरू कसे निवडले, विवेकबुद्धी कशी वापरली यासंबंधीचं स्पष्टीकरण श्रीनाथांनी प्रारंभी केलं आहे.

*ऐक प्रज्ञेची लक्षणे । सांगेन दृष्टान्तपणे ।*
*सूप, चाळणी, रांधणे । घेणे त्यजणे विवेकें ॥*

या ओवीत सुपाचा, चाळणीचा आणि रांधण्याचा दृष्टांत देऊनही निवड कशी केली जाते ते नाथांनी पुढं विवरून दाखविले आहे. चाळणीमध्ये जे जे पडतं, त्यातील खरं जे आहे, सूक्ष्म जे आहे ते खाली पडतं अणि खडे मात्र वर तसेच राहतात. खाली पडतं ते 'सूक्ष्मतत्त्व' वर राहतं ते गुण-दोषरूप स्थूल. त्या गुणदोषांचा त्याग करायचा व सूक्ष्मतत्त्वाचा स्वीकार करायचा ! विवेकाची चाळणी अशी लावायची. आता सूप काय करतं? सूप हे भूस, कोंडा, कचरा वगैरे जे आहे ते टाकून देतं आणि जे अस्सल धान्यबीज आहे, ते जवळ ठेवतं. अशा तऱ्हेनं खरं-खोटं, बरं-वाईट, सूक्ष्म-स्थूल जे आहे ते निवडून-पाखडून घ्यायचं. आपल्या विवेकबुद्धीनं हे करायचं. विवेकबुद्धी ही चाळणीचं आणि सुपाचं असं दुहेरी काम करते. विवेक असा कार्यकर झाला की वैराग्य अंगी बाणतं. वैराग्याचा अग्नी जे कच्चं आहे ते पिकवून परिपक्व करतं. हेच ते 'रांधणं' होय. हा धर्म 'चुलीचा' होय. अशा तऱ्हेनं 'चाळण-पाखड-रांधण' करून जे आपण घेतो ते आत्मपोषक, कल्याणकारक व मोक्षप्रद होत असतं. या क्रियेमध्ये जगातल्या साऱ्या गोष्टीच गुरुरूप होतात. ज्याचा गुण घेतला तो गुरू होतोच, हे आवर्जुन सांगायला नको. पण ज्याचा गुण त्यागरूपानं घेतला, तोही 'अहितत्यागा'नं गुरुरूपच होतो. अहितकारक जो गुण आहे, त्याचा त्याग करणं म्हणजे पर्यायानं हितकारकच गोष्ट करणं, असं नाही का? तेव्हा कोणते गुण टाकावेत हे स्वतःच्या रूपानं जे दाखवून देतात ते 'दुर्गुणी'सुद्धा इथं सुगुणी मार्गदर्शक गुरू होतात. 'खरं बोलावं, खोटं बोलू नये', असं अन्वय-व्यतिरेकानं सांगितलं की बोलण्याचा गुणधर्म दोन्ही बाजूंनी पक्का होतो. तसंच हे आहे आणि असा ग्राह्य-अग्राह्य यांचा विचार करून जे शेवटी घ्यायचं ते 'रांधून' विवेक-वैराग्यानं तावून-सुलाखून, पचनी पडेल असं 'सेव्य' करून घ्यायचं म्हणजे ते अंगी लागतं. अवधूतानं जगात जे जे पाहिलं ते ते असं परीक्षा करून घेतलं.

यामुळे जे जेवढं स्वीकृत केलं, तेच तेवढं 'गुरुरूप' जग आहे, असं अवधूताला न वाटता, अखिल जग हेच गुरुरूप आहे हे जाणवलं. त्यातील जे 'श्रेष्ठ' वाटलं तेवढंच त्यांनी यदूपुढं ठेवलं.

*एवं त्याग-अत्याग-समतुके । दोहोंसी गुरुत्व आले निके ।*
*राया तू पाहे पां विवेकें । जगचि असकें गुरु दिसे ॥*
*ऐसें पाहतां सावकाशीं । गुरुत्व आलें जगासी ।*
*हेंचि साधन जयापाशी । तोचि परमार्थासी साधकु ॥*
*ऐसें सांगतां अचाट । तुज वाटेल हें अचाट ॥*
*तरी गुरु सांगों श्रेष्ठ श्रेष्ठ । मानिले वरिष्ठ निजबुद्धी ॥*

(एक. भागवत- स्कंध ११.३४३-३४५)

भगवान श्रीकृष्णांनी अर्जुनाला विभूति-योग सांगताना अगदी असंच म्हटलं आहे.

*हन्त ते कथयिष्यामि दिव्या ह्यात्मविभूतयः ।*
*प्राधान्यतः कुरुश्रेष्ठ नास्त्यन्तो विस्तरस्य मे ॥*

(गी. ११.१९)

अवधूतांनी जे चोवीस गुरू केले, त्या सर्वांसंबंधी विचार इथं करणं स्थलसंकोचास्तव शक्य होणार नाही. वानगीदाखल 'पृथ्वी'ला गुरू म्हणून अवधूतानं का मानलं तेवढं आपण पाहू. 'भागवता'तील मूळ श्लोक असे आहेत -

*भूतैराक्रम्यमाणोऽपि धीरो दैववशानुगैः ।*
*तद्विद्वान्न चलेन्मार्गा दन्वशिक्षं क्षितेर्व्रतम् ॥*
*शश्वत्परार्थसर्वेहः परार्थैकान्तसम्भवः ॥*
*साधुः शिक्षेत भूभृत्तो नगशिष्यः परात्मनाम् ।*

(भागवत - स्कंध ११.३७-३८)

'पृथ्वी ही आपला ठरलेला मार्ग सोडत नाही. स्वमार्ग न सोडणं, हा गुण मी पृथ्वीपासून शिकलो. पंचमहाभूतांनी आणि प्राणिमात्रांनी तिला कितीही सतावून सोडलं तरी ती आपली क्षमावृत्ती सोडत नाही. प्राणिमात्रांचं वर्तन हे बुद्धिपुरस्सर नसून ते माया नेतील तिकडे जातात हे समजून पृथ्वी त्यांच्याबाबत क्षमाशील व शांत असते. पर्वत आणि वृक्ष हे पृथ्वीचाच भाग होत. पर्वत आणि वृक्ष हे परकार्यासाठी जगतात. दुसऱ्यासाठी कर्म करतात हे पाहून मी परोपकारी व क्षमाशील पृथ्वीला गुरू केलं,' असे अवधूतांनी सांगितलं; हा 'भागवता'तील श्लोकांचा भावार्थ होय. यावर नाथांनी फार उद्बोधक, सुंदर आणि विस्तृत भाष्य केलं आहे. नाथ म्हणतात,

*''परमार्थी मुख्य शांती । साधकांशी पाहिजे निश्चितीं ।*
*यालागीं प्रथम गुरुक्षिती । निजशांती लागूनी ॥ ३६० ॥''*

चोवीस गुरूंत पहिलं स्थान, पहिला मान अवधूतांनी पृथ्वीलाच का दिला ते नाथ इथं सांगतात. पृथ्वीला हे अग्रस्थान का दिलं याचा विचार मूळ भागवतात आलेला नाही. नाथच तो मांडतात, हे ध्यानी घ्यावं. ते म्हणतात, ''परमार्थामध्ये शांती ही मुख्य आहे. परमार्थ प्राप्तीसाठी साधकाच्या ठिकाणी 'शांती' हा गुण असणं अत्यंत आवश्यक आहे. म्हणून प्रथमतः 'शांती'लाच, शांती करताच 'पृथ्वी' हा पहिला गुरू ठरतो, असं नाथ स्पष्ट करतात आणि हा गुण तीन रूपांनी कसा प्रकट होतो ते पुढं विशद करतात -

अंतरनिग्रहो ते 'शांती' । बाह्येंद्रियनिग्रहो ते 'दांती'

उभयसहिष्णुता ते 'शांती' । शांतीसी क्षिति गुरू केला ।। ३६२।।'

मन, बुद्धी, चित्त आणि अहंकार हे अंतःकरण-चतुष्टय जे आहे, त्यांचा निग्रह करणं म्हणजे 'शांती' होय. पंच ज्ञानेंद्रियं आणि पंचकर्मेंद्रियं यांचा निग्रह करणं म्हणजे 'दान्ती' होय आणि द्वंद्व सहिष्णुता - म्हणजे सुख-दुःख, राग-लोभ इत्यादी द्वंद्वांना समानतेनं पाहणं म्हणजे 'क्षान्ती' होय. पृथ्वीमध्ये 'शांती', 'दान्ती' आणि 'क्षान्ती' हे तीनही गुण एकत्रितपणे पाहण्यास मिळतात. पृथ्वी आपलं हे त्रिगुणात्मक व्रत कसं आचरते ते नाथांनी पुढं सांगितलं आहे.

'ही पृथ्वी माझी' म्हणून अनेक प्रकारचे प्राणी तिला झोंबत असतात, तर अनेकजण आपापल्या वृत्तीप्रमाणे आणि व्यवहाराप्रमाणे तिचे वेगवेगळे तुकडे करीत राहतात. पण पृथ्वी आपली एकात्मता न मोडता सदासर्वदा अखंडच असते. तिची वृत्ती योगी पुरुषाप्रमाणे अखंड दंडायमान म्हणजे एकरूपच असते. काही जीव या पृथ्वीची पूजा करतात, तर काही मलमूत्रोत्सर्ग करून तिला गांजतात. पण खरं पाहता तिला हर्षही होत नसतो अन् ती गांजलेलीही नसते. आपल्या क्षांतीमुळे ती निश्चळ असते. योगी पुरुषाप्रमाणे तिच्या ठायी नित्य ऐक्यभावच असतो. पृथ्वीची शान्ति-रूपता किती अद्‌भुत आहे ते नाथ पुढं सांगतात.

*पृथ्वी दाहेंकरुनि जाळिली । नांगर घालूनि फाळिली ।*
*लातवरी तुडविली । तोडिली झोडिली पैंभूतें ।।*
*तो अपराधु न मनूनि क्षिती । सवेंचि भूतांतें प्रसन्न होती।*
*तेथेंचि पिकवूनि नाना संपत्ती । तृप्ती देती भूतांतें ।*
*ऐस ऐशिया निजशांती । लागीं गुरु म्यां केला क्षिती ।*
*ऐक सभाग्या भूपती । शांतीची स्थिती अभिनव ।।*

(एक. भा. ११. ३७१-३७३)

अवधूतांनी निजात्मशांतीसाठी पृथ्वीला गुरू का केलं ते इथे प्रत्यक्ष अनुभवास यावं इतके सुस्पष्ट चित्रदर्शी झालं आहे. ही पृथ्वीची शांतवृत्ती, ही शांत स्थिती 'अभिनव' आहे, असं शेवटी नाथ म्हणतात. ही 'अभिनवता' कोणती? त्याचं स्पष्टीकरण पाहण्यासारखं आहे -

कुणी एकानं दुसऱ्या कुणाचा अपराध केला. तो दुसरा कुणी त्यावर उलट काही न करता, शांतपणे तो अपराध सोसून गप्प राहिला, तर त्याला 'शांती' म्हणता येईल का? नाथ म्हणतात, ''ह्या कृतीला 'अपराधाची उपेक्षा' म्हणता येईल.'' मग 'शांती' कशाला म्हणायचं?

*ऊंसू मोडी त्या गोड भारी । छेदितें शस्त्र गोड करी ।*
*पिळिलिया - आळिलियावरी । स्वादाचिया थोरी आपकाऱ्यां देतु।।*
*अपराध साहोनु अंगीं । त्याच्या प्रवर्ते हितालागीं ।*
*तेचि 'शांती' पैं जगीं । होय दादु गो निर्द्वंद्व ।।*

(ए. भा. ११. ३७५-७६)

नाथांनी उसाचा दाखला दिला आहे. ऊस जो मोडतो, त्यालाही तो आपली गोडी देतो, जे शस्त्र उसाचे तुकडे-तुकडे करतं त्या शस्त्रालाही ऊस आपली गोडी लावून ठेवतं. जो त्याला चरकात घालून गाळतो-पिळतो त्याला तर ऊस आपलं निकं गोड रस-जीवनच देतो आणि शेवटी जो त्याला काहीलीत घालून अग्नीवर ठेवून आटवतो त्याला तर तो ऊस आपली सर्वोत्कृष्ट स्फटिकरूप गोडी गुळाच्या रूपानं दान करत राहतो. अपकाऱ्यावर असे उपकार करणं याला 'शान्ती' म्हणतात, असं नाथ सांगतात. हा उसाचा दृष्टान्त श्रीज्ञानेश्वर महाराजांनीही दिला आहे. भक्ताच्या ठिकाणी वैषम्याची म्हणजे द्वैताची, शत्रु-मित्र अशा द्वंद्वाची भावना नसते तो सर्वांशी समबुद्धीनंच वागतो हे सांगताना ('अद्वेष्टा सर्वभूतानाम्....') या पदावर भाष्य करताना श्रीज्ञानेश्वरांनी म्हटलं आहे,

*ना तरी इक्षुदंडु । पाळितया गोडु ।*
*गाळितया कडु । नोहेचि जेवीं ।।*

(ज्ञा. अ. १२.२००)

या ज्ञानेशांच्या ओवीतील भावाशय नाथांनी पराकोटीला नेऊन प्रतिनिगम्य केला आहे. नाथांना 'ज्ञानाचा एका' (म्हणजे 'एकनाथ हे ज्ञानेश्वरांचेच आहेत') असं का म्हणतात, त्याची ही एक झलक आहे. अशी स्थलं पुढं अनेकदा येताना दिसतील.

पृथ्वीला तिच्या परोपकारी शांत-वृत्तीमुळे अवधूतांनी गुरू केलं आहे. ह्याच परोपकारी गुणांमुळे पृथ्वीचेच पुत्र शोभावेत, असे पर्वत आणि वृक्ष यांनाही अवधूतांनी गुरू केलेलं आहे. पर्वत हा कसा उदार दाता आहे आणि त्याची दानसंपत्ती कितीही दिलं तरी कशी संपत नाही, ह्याचं चढतं-वाढतं वर्णन नाथांची वाणी करू लागते. पर्वत आपल्या जवळ रत्नांचे साठे करून ठेवतो ते दुसऱ्यांना वाटून टाकण्यासाठी आणि गवत, पाणी इत्यादी गोष्टी बाळगतो त्याही सर्वांना देण्यासाठीच ! तो कोणाला 'या' म्हणत नाही आणि येणाऱ्या कोणाला 'नको'ही म्हणत नाही. कुणावर चिडून तो त्याला बाहेरही घालवीत नाही. आपल्या जवळचं सगळं देऊन तो ग्रीष्म ऋतूत उघडा-कोरडा होतो खरा, पण भगवंत त्याला लगेच वर्षा ऋतूत अपार हरित-संपदा देऊन श्रीमंत करतो, ही हिरवी लक्ष्मी तो पुन्हा अनंत मार्गानं सर्वांघरी पोचती करतो. पर्वत काय शिकवतो? 'दाता जो जो उत्साहानं आणि उल्हासानं देऊ लागतो, तो तो जगन्नाथ त्याला आपल्या ऐश्वर्याचं दान करून त्याला समृद्ध करीत असतो. खरा दाता कधीच दानानं दरिद्री होत नाही', हेच आपणास शिकवतात.

*एवं पर्वताची जे उत्पत्ती । ते परोपकारार्थ एकांती ।*
*उपकारावाचूनि चित्तीं । दुजी वृत्ति जाणेना ।।*
*त्या पर्वता ऐशी तत्त्वतां । असावी साधकासी उदारता ।*
*काया वाचा आणि चित्ता । सर्वस्व देतां उल्हासु ।।*

(ए. भा. ११. ३८४-८५)

पर्वतापासून जसे झरे पाझरतात, तसे योगी पुरुषाच्या ठायी, ज्ञानी भक्ताच्या ठायी परोपकारचे पाझर फुटून ते निरंतर वाहत राहतात. त्यांना 'आटणं' माहीतच नसतं. पर्वत कधीही कृपण नसतो.

*सांडोनि कृपणवृत्तीची संगती । उपकारी पर्वत एकांती ।*
*राहिलासे उपकारमूर्ती । धैर्यवृत्ति निधारिं ।। ३९१।।*

'परोपकारालागी' निश्चित । गुरु केला म्यां पर्वत । असं म्हणून पुढं वृक्षाला गुरु का केलं, त्याचं स्पष्टीकरण नाथमहाराज करू लागतात.

वृक्षही पर्वतासारखाच पृथ्वीचा पुत्र आहे. पृथ्वी ही 'क्षमा, शांती आणि सर्वदात्री जशी तशीच पर्वतराजी आणि वृक्षराजी हीही सर्वदात्री-परोपकारी अशी ईश्वरी लीलाच आहे.' अवधूत म्हणतात,

*सर्वांगे सर्वभावेंसी । सर्वकाळ सर्व देशी ।*
*पराधीन होआवें सर्वांसी । हें वृक्षापाशी शिकलों ॥ ३९३ ॥'*

इथं 'पराधीन' म्हणजे 'दुसऱ्याचा गुलाम किंवा अंकित' असा अर्थ नाही. 'पराधीन होणं' म्हणजे 'दुसऱ्याच्या इच्छेसाठी जगणं', 'दुसऱ्याचा संतोष करणं', 'दुसऱ्याशी तन्मय होणं'. 'पराधीन होआवे सर्वांसी' म्हणजे 'सर्वांच्या अंतर्यामी राहणं, सर्वांसाठी जगणं'. वृक्ष स्वतःसाठी जगत नाही, तो दुसऱ्यासाठी जगतो. वृक्ष हा त्याच्याकडे जो येईल त्याचाच होऊन जातो. ज्यानं वृक्षाचा प्रतिपाळ केला, त्याच्या आधीन तो होतो आणि जो वृक्ष तोडायला येतो, त्याच्या आधीन तो होत नाही असं होत नाही. वृक्ष हा दोघांचाही असतो. (इथे ज्ञानेश्वरांची आठवण होते.) योगी पुरुषाला पालखीतून नेलं तर तो त्यांचा होतो. सुळावर देण्यासाठी त्याला नेलं तरी तिथं तो त्यांचा होत असतो. साधक असा असतो. तेव्हा अवधूत म्हणतात,

*सकळ लोकीं निजात्मता । देखता जाहली पराधीनता ।*
*हें वृक्षापासोनि तत्त्वतां । 'परात्मता' शिकलों ॥ ३९९ ॥*

तेव्हा 'पराधीनता' म्हणजे 'परात्मता' ! (अलीकडे 'परात्मता किंवा परात्मभाव' ही संज्ञा alienation चा मराठी पर्याय म्हणून उपयोजिली जाते. तो अर्थ इथं अभिप्रेत नाही.)

वृक्षापासून दुसरा गुण घेण्यासारखा आहे तो म्हणजे 'अतिथीचं पूजाविधान' हा होय. वृक्षाकडं जो कुणी येईल त्याची वंचना वृक्ष कधीही करीत नाही. त्याला पत्र-पुष्प-फळ-मूळ-छाया-साल-काष्ठ असं काहीना काही वृक्ष देतोच. वृक्ष हा समूळ-सगळा आपल्या अतिथीचा होऊन राहतो.

*अर्थी आल्या अर्थवयासी । विमुख न व्हावें सर्वस्वेंसीं ।*
*हें शिकलों वृक्षापासीं । विवेकेसीं निजबुद्धीं ॥ ४०५॥*

"याचक मागावयास आला असता, त्याला सर्वस्व द्यावं लागलं तरी ते द्यावं, त्याला विमुख जाऊ द्यायचं नाही हे मी विचारानं आणि आत्मबुद्धीनं वृक्षापाशी शिकलो," असं अवधूत सांगतात.

अवधूत सृष्टीपासून हे जे शिकत आहेत ते स्वतः शिकत आहेत. त्यांना शिकवणारा दुसरा कुणी शिक्षक, पंडित किंवा गुरु नाही. त्यांचे तेच स्वतः शिकून आत्मस्वरूप-स्थितीस पोहोचले आहेत. "हे मी माझ्या विचारानं आणि आत्मबुद्धीनं शिकत आहे." असं अवधूत सदैव सांगत आहेत. सृष्टी आपल्या भोवती असते. आपण सदैव या सृष्टीत असतो. पण आपण एकमेकांचे न होता तसेच राहत असतो. सृष्टीतला प्रत्येक पदार्थ हा गुणयुक्त आहे, त्याला स्वतःचा अर्थ आहे. स्वतःचं वेगळेपण आणि प्रयोजन आहे. सृष्टीत एकही पदार्थ असा नाही की त्याला अर्थ नाही, गुण नाही. निरर्थक म्हणून ज्याला आपण म्हणतो-मानतो त्यातही अर्थ भरलेला असतो. तो पाहण्याची, तो अर्थ जाणून घेण्याची आपणाजवळ दृष्टी असायला हवी अणि तो जाणवलेला अर्थ आपल्या आत्मोद्धारासाठी कसा उपयोगी पडेल ही समजून घेण्याची बुद्धी हवी आणि हे समजल्यावर त्याप्रमाणं वागण्याची वृत्ती हवी. तो निग्रह हवा. त्यासाठी पृथ्वीसारखं शांत, दान्त आणि क्षान्त असायला हवं. 'उद्धरेत् दइआत्मना आत्मानम्' हे वचन या रीतीनं पाहता येऊ शकतं. ही आत्मा पाहण्याची-जाणण्याची उत्कटता अंतर्यामी प्रकट झाली की सारं सभोवताल अर्थपूर्ण दिसू लागतं. हे जग अर्थानं परिपूर्ण झाल्याची जाणीव होते.

'Even grief has joy beneath its roots
For nothing is truly vain the One has made.'

असे योगी अरविंद यांनी म्हटलंच आहे. हे पाहणारे-जाणणारे दिव्यनेत्र हवेत.

हे विश्व त्या अनादि-अनंत परब्रह्माचा मनोहर विलास आहे. रोज उगवता सूर्य ह्याची ग्वाही देतच उगवत असतो. उमलणारी फुलं, अंतरिक्षात विहरणारे पक्षी, कुरणात चरणारी गायी-गुरं, झुळझुळ वाहणारे निर्झर, खवळलेला दर्या, झाडं उन्मळून टाकणारा वादळ-वारा, पाण्याच्या पोटात सुळकन पोहणारा मासा, आईच्या अंगावर पिणारं बाळ, सुरकुत्यांचं पांघरुण घेऊन पडून राहिलेला जख्ख म्हातारा, गोठ्यात वासराला चाटणारी गाय, मध गोळा करणारी मधमाशी.... किती किती असं पाहायचं? जे पाहावं ते अर्थानं भरलेलं. अवधूतांना या जगातली प्रत्येक गोष्ट काही नवनवं दाखवत-सांगत होती. सारं जगच त्यांचं गुरु बनलं होतं.

अवधूतांनी त्यातले श्रेष्ठ म्हणून चोवीस गुरु आपणास सांगितले. त्यात पंच महाभूतं आहेत, चंद्र-सूर्य हे तेजोगोल आहेत, अजगर-सर्प हे सरपटणारे प्राणी आहेत; जलचर मासा आहे; कातीण-कुंभारीण हे कीटक आहेत, पतंग, भुंगा, मधमाशी हे पंख असणारे लहान जीव आहेत, टिटवी-कपोत हे मोठे पक्षी आहेत. हरणासारखा चपळ-सुंदर प्राणी आहे. हत्तीसारखा सर्वांत मोठा देहाकार असलेला बलवान पशू आहे. ही सृष्टी मानवेतर आहे. उत्क्रांतीच्या मानवपूर्व अवस्थेची ती निदर्शक आहे. या सृष्टीतील जे भव्य-प्रचंड आहे, त्यांचीच केवळ निवड इथं केलेली नाही. उपेक्षित, अवलक्षित अशी ही जीवसृष्टी इथं आलेली आहे. इथं मानव सृष्टीतील मूल आणि कुमारी येतात आणि बाज करणारा लोहार येतो. पिंगला नावाची वेश्या येते. बस्स ! ही नामावली पाहिली म्हणजे ही 'विभूतीं'ची नामावली नाही, हे सकृत दर्शनीच ध्यानी येतं. 'केषु केषु च भावषु चिन्त्योऽसि भगवन्मया' असं अर्जुनानं विचारल्यावर भगवंतांनी आपल्या दिव्य अशा आत्मविभूती कोणत्या ते 'गीते'त सांगितले आहे. अध्याय ११. ह्या विभूतींच्या स्मरण-चिंतनानं भगवंताचंच स्मरण-चिंतन होतं. ह्या 'विभूती' किती आहेत? 'अनन्त आहेत.' असंच भगवंतांनी उत्तर दिलं आहे. ('नान्तोऽस्ति मम दिव्यानां विभूतीनाम्' ।) 'जे जे ऐश्वर्ययुक्त, सत्वसंपन्न आणि श्रीमत् आहे, ते ते सर्व माझ्याच तेजाच्या अंशातून निर्माण झालेलं आहे,' ही भगवंतांची उक्ती आहे. हे सगळं जग म्हणजे भगवंताच्या केवळ एका अंशाचा विलास आहे. विभूतीयोग हा साक्षात भगवंतांच्या

सगुण भक्तियोगाचा एक दिव्य प्रकार आहे.

'अवधूत गीता' हे सृष्टीतील दैवी-संपत्तीचं दर्शन घडविणारे एक अपूर्व नीतिशास्त्र आहे. आत्मोन्नतीसाठी कोणकोणत्या गुणांचा अवलंब करणं आवश्यक असतं, ते सांगणारी ही गीता आहे. भगवत्प्राप्तीसाठी साधकाच्या ठिकाणी 'साधन चतुष्ट' असावं लागतं. चार साधनं असावी लागतात. (१) विवेक, (२) वैराग्य, (३) शम, दम, श्रद्धा, उपरम, तितिक्षा आणि समाधान ह्या षट्-संपत्ति आणि (४) मुमुक्षत्व ही ती साधनं होत. ही साधनं अंगी कशी बाणावीत ते 'अवधूत-गीते'नं स्पष्ट होतं. 'अवधूत-गीते'चं वैशिष्ट्य हे की इथं या संपत्तीचा शोध साधक स्वतःच करीत असतो व तो तसतसा अधिकारी होत जातो. दैवी गुणांचा शोध घेणं आणि ते गुण अंगी मुरवून आत्मोद्धार करून आनंदमय जीवन व्यतीत करणं, याचं सुंदर दर्शन घडविणारी ही 'अवधूत गीता' आहे.

जिज्ञासू अभ्यासकांनी आणि मुमुक्षुंनी ही अवधूत-गीता (एकनाथी भागवत - ७-८-९) मननपूर्वक एकाग्र चित्तानं पाहावी. 'चोवीस गुरुं'चं कथन संपल्यावर अवधूत म्हणतात.

*अवधूत म्हणे यदूसी । इतुकिया गुरुंपाशी ।*
*मी शिकलों जे जें मतीशीं । तें तुजपाशी सांगितलें ॥*
*निजबुद्धीचिया व्युत्पत्ती । काही एक शिकलों युक्ती ।*
*तेंही सांगेन तुजप्रती । अनन्यप्रीती - स्वभावें ॥*
*चोवीस गुरुंपाही गुरू । विवेक-वैराग्य-विचारु ।*
*हा नरदेहीं लाधे सधरु । यालागीं मुख्य गुरू नरदेहो ॥*

(ए. भा. अ. ९.२४७-४९)

'अवधूत-गीते'चा पहिला भाग (पूर्वार्ध) चोवीस गुरुंसंबंधी सांगून होताच संपतो व दुसरा भाग (उत्तरार्ध) 'नरदेहाच्या गुरुत्व-कथना'नं सुरू होतो. तोही भाग महत्त्वाचा आहे. नाथांच्या टीकेनं हे सारं चित्तावर सहजपणे ठसतं. नाथांची टीका ज्ञानेश्वरांचं अंतरंग घेऊन येते. त्यामुळे इथं भागवत संतवाणीच्या अखंड एकजिनसी प्रवाहातच आपण सुस्नात होत असतो. यदु-अवधतू-संवाद-सुख सर्वांनी अनुभवावं आणि परमानंदी लीन व्हावं !

डॉ. व. दि. कुलकर्णी
१५, वृंदावन सोसायटी,
७५९/१२६ बी, प्रभात रस्ता
पुणे ४११ ००४.

---

# ॥ नाथभागवताचे रचना विशेष ॥

**डॉ. उषा मा. देशमुख**

एम्. ए. पीएच. डी. - मुंबई विद्यापीठ मराठी विभाग प्रमुख (निवृत्त), ३३ वर्षे प्राध्यापक, १० ग्रंथ प्रकाशित व इतर विपुल लेखन साहित्य प्रकाशित, प्राचीन मराठी वाङ्मय साहित्य, मराठी कविता, शब्दकोष, पाश्चात्त्य व पौर्वात्य वाङ्मय हे विशेष कार्यक्षेत्र, अध्यक्ष वैदर्भीय लेखिका साहित्य संमेलन भारतीय साहित्य संमेलन, विदर्भ साहित्य संमेलन १९८४ आणि १९८९ निरनिराळ्या साहित्य संमेलनात सक्रीय सहभाग. पीएच.डी. व एम्. फिल च्या विद्यार्थ्यांचे मार्गदर्शक म्हणून व परीक्षक म्हणून काम केले. महाराष्ट्र आणि महाराष्ट्राबाहेरील अनेक विद्यापीठे यांचे सभासदत्व.

१:१ *'एका जनार्दनी पूर्वपुण्य फळले । श्रीगुरु भेटले ज्ञानेश्वर'* असे एकनाथांनी एका अभंगात म्हटले आहे. जनार्दनस्वामींकडून आलेली दत्तोपासना आणि ज्ञानदेवांकडून आलेली विठ्ठलोपासना यांचा समन्वय एकनाथांच्या साहित्यात वैविध्यपूर्ण रचनांमध्ये झालेला आहे. जनार्दनस्वामींमुळे नाथांचे पूर्वपुण्य फळाला आले आणि ज्ञानदेव गुरु म्हणून मिळाले. म्हणजे ज्ञानदेवांचे कार्य, ज्ञानदेवांचे साहित्य, ज्ञानदेवांचे व्यक्तित्व आणि ज्ञानदेवांची तात्त्विक विचारसरणी या प्रभावातून 'ज्ञानाचा एका' सिद्ध झाला होता. 'जन तोची जनार्दन' मानण्यात ज्ञानदेवांच्या पुढे एकनाथ गेलेले दिसतात. नाथांवर मुकुंदराजाच्या साहित्याचा जसा प्रभाव आहे तसाच नरेंद्राच्या रुक्मिणीस्वयंवराचाही परिणाम आहे. पूर्वसूरींचे ऋण स्वीकारत एकनाथांनी आपली रचना केलेली आहे. न्यायमूर्ती रानडे यांनी 'महाराष्ट्राचे लोकनाथ - एकनाथ' म्हणून नाथांच्या कार्याचा गौरव केलेला आहे. ज्ञानदेवांच्या आध्यात्मिक आणि सामाजिक लोकजागृतीचे कार्य एकनाथांनी आपल्या काळात केले आणि पुढे रामदास-तुकाराम यांनी त्यावर कळस चढविला. ज्ञानदेवांनी पायाभरणीचे काम केले. एकनाथांनी भागवत मंदिराला आधार देणारा खांब उभा केला आणि तुकारामाने कळस चढविला. ज्ञानदेव-नामदेव-एकनाथ-रामदास आणि तुकाराम या पाच कवींनी भागवत धर्माची पताका भारतभर फडकविली आणि 'संतमता'ची जागृती केली. ज्ञानदेवांच्या कार्याचे मोल अचूकपणे ओळखून एकनाथांनी 'ज्ञानेश्वरी'चे आणि ज्ञानदेव समाधीचे संशोधन सर्वप्रथम केले आणि *'ज्ञानेश्वरापाठी । जो ओवी करील मराठी । तेणे अमृताचिये ताटी । जाण नरोटी ठेविली ॥'* अशी ग्वाहीही घालून ठेवली. ज्ञानदेवांचा काळ आणि नाथांचा काळ यामध्ये फार मोठे अंतर आहे. ज्ञानदेव-नामदेव यांच्या नंतरच्या समन्वयवादी आणि सामिल्की बांधीलकी स्वीकारणारा लोककवी म्हणून नाथांचे स्थान अनन्य ठरते. विपुल आणि विविध प्रकारी रचना सर्वत्र संत कवींनी केल्या असल्या तरी त्यात एकनाथांच्या रचनांचे वैविध्य आगळे-वेगळे ठरते. नामदेव-ज्ञानदेवांनीही भारुडात्मक रचना केल्या होत्या पण 'भारुडांचे सम्राट' म्हणून नाथांना मान्यता मिळाली आहे. लोकनाथ म्हणून संबोधिले गेले ते नाथांच्या वेगळ्या रचनांमुळेच! अत्यंत प्रतिकूल परिस्थितीच्या पार्श्वभूमीवर नाथांचे साहित्य निर्माण झाले. परवशता, पूर्व परंपरा खंडित झालेली, लोकमानस भरकटलेले, अशा युगधर्माची जाण नसलेल्या काळाला नाथांनी आपल्या आचरणाने, आपल्या विचारसरणीने आणि साहित्याच्या निर्मितीने वळण दिले ते पूर्व परंपरेशी नाते ठेऊन आणि पृथगात्म होत जाऊन.

**२:१ ॥ नाथांची साहित्य निर्मिती ॥**




यावरून नाथांच्या साहित्य निर्मितीचा आलेख काढता येतो. **प्रबंध-काव्ये**-भागवत-रामायण-रुक्मिणीस्वयंवर अशी नाथांनी रचली. आध्यात्मिक काव्ये - शुकाष्टक, आनंदलहरी, हस्तामलक, चिरंजीवपद, स्वात्मसुख इत्यादी रचली. **पौराणिक आख्यानपर रचनाही** नाथांनी बऱ्याच रचल्या आहेत. तुळशीमाहात्म्य, हळदुली, रुक्मांगकथा या त्यातील प्रमुख होत. एकनाथांच्या अभंग निर्मितीतही वैपुल्य आणि विविधता भरलेली आहे. भारुडांमध्येही अनेकविधता लक्षात येते व लोकपरंपरा, लोकसमजुती आणि विधिनाट्ये यांचा अनोखा संगम नाथांच्या भारुडात झालेला आहे. नाथ लोकमानसाला जसे भारुडांतून जिवंत करतात तसेच गाव-गाड्यालाही अधोरेखित करतात. पदे, आरत्या, भूपाळ्या, स्तोत्र अशा वैविध्यपूर्ण रचनाही नाथांनी केल्या आहेत. वैपुल्य हा नाथांच्या साहित्यनिर्मितीचा विशेष ठरतो. संतचरित्रे, भक्त चरित्रेही एकनाथांनी गायिली आहेत. नामसंकीर्तन करून आणि संतस्तुती करून नाथांनी गुरुमाहात्म्यही पुनःपुनः प्रगट केले आहे.

२:२ एकनाथांचे वेगळेपण आणखी एका दिशेने स्पष्ट करता येईल ते म्हणजे भानुदास - जनार्दन स्वामी - ज्ञानदेव - मुकुंदराज ही परंपरा स्वीकारण्यात नाथांना धन्यता वाटते त्याचप्रमाणे 'नाथपंचक'ही निर्माण झाले आहे. इतर कोणत्याही मराठी संत कवीपेक्षा हा वेगळेपणा लक्षात घेतला पाहिजे. एकनाथांच्या प्रभावळीत इतरही अनेक संतकवी पुढच्या काळात समाविष्ट झालेले होते. पण 'नाथपंचक' ही संकल्पना

फक्त नाथांसह दासोपंत, रामाजनार्दन, विठा रेणुकानंद, जनीजनार्दन या पंचकाला मिळाली. नाथांच्या प्रभावात आणखीही काही संतकवी आलेले होते. त्यात कृष्ण याज्ञवल्की, महालिंगदास, मधुकर, मृत्यूंजय स्वामी, त्र्यंबकराज, शिवकल्याण, कृष्णदास, माधवदास, लोलिंबराज, मोरया गोसावी, श्रीपतिदास इत्यादी संत कवींचा उल्लेख करता येईल. मुक्तेश्वर आणि हरिपंडित हे तर घराण्यातच जन्माला आलेले महाकवी होते आणि पुढील काळात एकनाथांचा रामदासांच्या निरुपण शैलीवरील प्रभाव लक्षवेधी ठरतो.

२:३ ज्ञानदेवांनी 'भगवद्गीता' निरुपणासाठी स्वीकारली व भक्तश्रेष्ठ अर्जुनाची प्रश्नात्मक भूमिका व तिला भगवंताने दिलेली उत्तरे अशी धारणा स्वीकारून गीतेला आपला अनुभवविषय केला. एकनाथांनी ज्ञानदेवांच्या पावलांवर पाऊल टाकून गीता न स्वीकारता भागवतातील केवळ एकादश स्कंध स्वीकारून उद्धवाची बाजू मांडण्याचा प्रयत्न केला. भागवताचा एकादशस्कंध म्हणजे एका अर्थाने ती 'उद्धवगीता' ठरते. ज्ञानदेवांनी समग्र उपनिषदांचे सार असलेला स्मृतिरूप गीताग्रंथ निरूपणासाठी निवडला तर एकनाथांनी उद्धवाच्या माध्यमाचा स्वीकार करून भागवत पुराणाला आवाहन केले. भागवतपुराण म्हणजे सर्व वेदांतसार असलेला असा 'भक्तिवेद' आहे. एकनाथांच्या साहित्यनिर्मितीची चतुरस्त्रता लक्षात घेतल्यास त्यांना गीतेवर निरूपण करणे अशक्य नव्हते; पण ज्ञानदेवांच्या व्यक्तित्वाने व साहित्य निर्मितीने प्रभावित झालेले नाथ 'भागवता'च्या एकादश स्कंधाकडे वळलेले आहेत. कृष्णार्जुन उपदेशापेक्षा कृष्ण-उद्धव उपदेशाची जोड एकनाथांनी दिली. ज्ञानदेवांची भूमिका आणि नाथांची भूमिका समान असल्यामुळे व ज्ञानदेवांच्या कर्तृत्वाने प्रभावित झाल्यामुळे एकनाथांनी थोडी वेगळी वाट अनुसरली असली तरी त्या पाठीमागच्या प्रेरणा आणि हेतू प्रयोजन हे ज्ञानदेवांच्या साहित्य निर्मिती पाठीमागे जे होते तेच असलेले लक्षात येते. कारण ही महाकवींची संवेदनशील मने मुख्यतः संतत्वाने ओतप्रोत भरलेली होती व ते लोकशिक्षक, द्रष्टे महाकवी होते. मातृभूमी व मातृभाषेवर त्यांचे नितांत प्रेम होते आणि लोकमानस घडविण्यासाठी त्यांनी आपल्या काळात समाजाचे नेतृत्व केले. नायकत्व स्वीकारले. लोकसंस्था रक्षण करण्यासाठी आणि 'मार्गा धारे वर्तवे । विश्वते मोहरे लावावे' या जाणिवेने आत्मसाक्षात्काराचा अनुभव या दोन्ही महाकवींनी पार्थिवाच्या पातळीवर आणण्यासाठी धडपड केली. मराठी अस्मितेचे, समाजाचे, संस्कृतीचे आणि विचारांचे नेतृत्व या महाकवींनी आपल्या साहित्यातून सिद्ध केले. संत एकनाथांचे कार्य ऐतिहासिक परिप्रेक्ष्यातून लक्षात घेतले पाहिजे. त्यांनी ज्ञानदेव-नामदेवांची खंडित झालेली लोकजागरणाची परंपरा पुनः नव्याने चालू केली. तसेच आख्यानकाव्य, पंडितीरचना यांचेही दाखले आपल्या साहित्यकृतीतून उभे केले आणि लोकपरंपरेतील लोकमानसाला अचूकपणाने जाणले. तत्त्वविचार आणि प्रत्यक्ष व्यवहार त्याचप्रमाणे अध्यात्मविचार आणि कृतिशीलता यांचा समन्वय नाथांच्या साहित्यात आणि व्यक्तित्वात दिसून येतो. नाथांच्या रचनांत भागवत, रुक्मिणीस्वयंवर आणि भारुडरचना यांचे अनन्य स्थान आहे. चतुःश्लोकी भागवत हा नाथांचा पहिला ग्रंथ आहे तर भावार्थ रामायण हा अखेरचा ग्रंथ ठरतो. एकनाथी भागवताचा रचनाकाल शके १४९२ ते १४९५ हा आहे म्हणजे या मधल्या काळात नाथांनी स्फुटरचना, भारुडरचना केलेली असावी. नाथांच्या साहित्याचे ठळक दोन प्रवाह आहेत. मुकुंदराजवळण आणि ज्ञानदेववळण असे हे प्रवाह आहेत. त्यात भागवत रचना ज्ञानदेव वळणाची आहे. म्हणूनच वारकरी संप्रदायाच्या प्रस्थानत्रयीत ज्ञानेश्वरी, एकनाथी भागवत व तुकाराम गाथा यांना अनन्य स्थान मिळाले आहे.

### ३:१ ॥ संस्कृत भागवत पुराण ॥

सर्व पुराणग्रंथात भागवत पुराण हे विशेष लोकप्रिय पुराण असून द्वैती अद्वैती अशा दोन्ही परंपरांनी त्यावर टीकाभाष्ये केली आहेत. एकनाथांसमोर श्रीधरी टीकेचा आदर्श होता. संपूर्ण भागवतावर भाष्य न लिहिता नाथांनी एकादशस्कंध स्वीकारला होता. या स्कंधात एकूण एकतीस अध्याय आणि चौदाशे सदुसष्ट श्लोक आहेत. नाथ भागवतात अठरा हजार आठशे अडतीस ओव्यांतून भाष्य विस्तृतपणे केलेले आहे. भागवताच्या एकादशस्कंधात एकूण एकतीस अध्याय असून श्लोकसंख्या दीड हजाराचे घरात असूनही नाथांनी मात्र या स्कंधावर विस्तृत टीकाभाष्य लिहिले आहे ते मूलतः प्रवचन कीर्तनकाराच्या भूमिकेतून! रामायण महाभारत आणि भागवत या तीन ग्रंथांनी भारताच्या राष्ट्रीय पुररुत्थानात फार मोलाची कामगिरी केली आहे. भारतीय एकतेचे प्रतिक आणि अनेकतेतील एकता या ग्रंथांतून दिसून येते. या धर्मग्रंथांचा अभ्यास आणि पठण-मनन सर्व भारतीय भाषांतून झालेले आहे. ईश्वर मीमांसा, तत्त्वज्ञान, साक्षात्कारी अनुभव जो अशा ग्रंथांतून मांडला गेला त्याचे रसाळ भक्तिमूलक कथन पुराणग्रंथांनी विशेषतः भागवतपुराणाने केलेले होते. भागवतपुराणात राष्ट्रपुरुषांच्या चरित्रकथा, विवेकनिष्ठा, नीतिनिष्ठ, राजनीती यांच्या अंगाने रंजकपद्धतीने सांगितल्या आहेत. तसेच आदर्श स्त्रिया, ऋषी, भागवतभक्त यांच्याही मनोवेधक कथा वर्णिल्या आहेत. एका आदर्शवादाचा पुरस्कार सद्संगती, सदाचार आणि विवेक निष्ठेच्या अंगाने या ग्रंथातून झालेला आहे. भागवत पुराण म्हणजे 'सर्व वेदान्तसार' असे आहे. त्यामुळे वेदांत विचार आणि भक्तिपासना यावर रसाळ भाष्ये सर्व भारतीय भाषांत लिहिली गेली. त्यात नाथभागवत अग्रेसर ठरते. गीतेची पार्श्वभूमी कुरुक्षेत्रावरील संघर्षाची, युद्धाची होती. ज्ञानदेवांनी या संघर्षालाच शांतिकथेचे, धर्मकीर्तनाचे, वाग्यज्ञाचे स्वरूप दिले. त्याचप्रमाणे भागवताला यादवकुलसंहाराची पार्श्वभूमी असूनही नाथांनी तिला संहारकथेचे रूप न देता भक्तिकथेचे, शांतिकथेचे स्वरूप दिले आहे. त्यामुळे भागवताचे टीकाभाष्य म्हणजे एकनाथीभागवत झाले नाही तर एकनाथ लोककवी आणि महाकवी असल्यामुळे त्यांनी भागवतालाच आपला अनुभव विषय केले आणि त्यातून एक स्वतंत्र नवनिर्मिती मूलाधारासह सिद्ध करण्याचा प्रयत्न केला. त्यासाठी श्रोत्यांचे अवधान, उपक्रम उपसंहार, भागवताची सुप्रतिष्ठा, मराठी भाषेचा जाज्वल्य अभिमान आणि मूळ कथेतील आशय यांनी एक नवे परिमाण या विषयाला मिळवून दिले. या ग्रंथासाठी

एकनाथांची परीक्षाही काशीस घेतली गेली आणि त्यात उत्तीर्ण झाल्यावर या ग्रंथाची हत्तीवरून मिरवणूकही निघाली अशी दंतकथा सांगितली जाते. म्हणूनच एकनाथी भागवताची रचना सुदीर्घ अशी झालेली आहे. विस्तारित झाली आहे.

| मूळ अध्याय | मूळ श्लोकांचा | एकनाथी भागवतातील विस्तारश्लोक |
|---|---|---|
| १ | ३९८ | (२४) |
| २ | ७९४ | (५५) |
| ३ | ८७३ | (५५) |
| ४ | २९६ | (२३) |
| ५ | ५७६ | (५२) |
| ६ | ४२९ | (५०) |
| ७ | ६५० | (७४) |
| ८ | ३३१ | (२४) |
| ९ | ५०७ | (३३) |
| १० | ७६५ | (१७) |
| ११ | १५८० | (४९) |
| १२ | ६२९ | (२४) |
| १३ | ७८१ | (४२) |
| १४ | ५४८ | (४६) |
| १५ | २५० | (३६) |
| १६ | ३३८ | (४४) |
| १७ | ५४२ | (५८) |
| १८ | ३९७ | (४८) |
| १९ | ५९८ | (४५) |
| २० | ४६२ | (३७) |
| २१ | ५४४ | (४३) |
| २२ | ७३१ | (६०) |
| २३ | १००४ | (६२) |
| २४ | ६२८ | (३९) |
| २५ | ४२५ | (३६) |
| २६ | ५०२ | (३५) |
| २७ | ४५७ | (५५) |
| २८ | ७४३ | (४४) |
| २९ | १०५५ | (४९) |
| ३० | ४१३ | (५०) |
| ३१ | ५९२ | (२८) |

भागवताच्या एकादशस्कंधात सर्वात लहान अध्याय केवळ सतरा श्लोकांचा दहावा अध्याय आहे व सर्वात मोठा सातवा अध्याय सत्तर श्लोकांचा आहे. एकनाथी भागवतात अकरावा (१५८०) एकोणतीसावा (१०५५) आणि तेवीसावा (१००४) असे दीर्घ अध्याय असून ओवीदृष्ट्या सर्वात छोटा अध्याय (२५०) ओव्यांचा पंधरावा अध्याय आहे. भागवताच्या अकराव्या अध्यायात संत लक्षणे, साधु लक्षणे सांगितली आहेत. एकोणतीसाव्या अध्यायात भागवत धर्म विशद केला आहे. नाथांच्या संतत्वाशी आणि लोकशिक्षकाच्या भूमिकेशी जुळणारा कथाशय मिळताच त्यात कवी म्हणून नाथांनी प्रतिमा प्रतीके, दृष्टांत उपमा, रूपके यांची कारंजी निर्माण केली असून 'संसार जिणते शास्त्र' ही भक्तिकथा रंगविली आहे.

## ३:२ एकनाथी भागवत स्वरूप विशेष ॥

भागवताच्या एकादशस्कंधावर निरूपण करताना नाथांनी प्रत्येक अध्यायाला प्रस्तावना आणि उपसंहार केलेला आहे. प्रास्ताविकातही, पहिल्या अध्यायाचे प्रास्ताविक म्हणजे समग्र ग्रंथाचे प्रास्ताविक ठरले आहे. 'ज्ञानेश्वरी' आदर्श एकनाथ स्वीकारतात आणि पहिल्या अध्यायाचे प्रास्ताविक सिद्ध करतात. पहिला अध्याय हा मुखाध्याय आहे. दोनशे दोन ओव्यांची प्रस्तावना पहिल्या अध्यायाला मिळाली आहे. 'ॐनमो श्री जनार्दना' अशी पहिली ओवी असून दुसऱ्याच ओवीत एकदंताला नमन करून एक सुदीर्घ रूपक एकनाथांनी रचले आहे. चार भुजा - चार पुरुषार्थ, दोन कान - उत्तरपूर्व मीमांसा, दोन चरण - प्रकृतिपुरुष, मुष्टी - निजपरत् अशा गणेशाचे वंदन करून नाथ सरस्वतीवंदनाकडे वळतात. ज्ञानेश्वरीच्या पहिल्या अध्यायीचे गणेशवंदन, शारदावंदन आणि नाथभागवतातील गणेश शारदावंदन यात बरेच साम्य लक्षात येईल. एकनाथांची सरस्वती ही विवेकमूर्ती, चेतना इंद्रियवृत्ती, स्वप्रभा, शिवांगी, वागीश्वरी, हंसवाहिनी, वाग्विलासी परमेश्वरी, सर्वांग देखणी सुंदरी अशी आहे.

*जैशा सागरावरी सागरी । चालति लहरियाचिया हारी ।*
*तैसे शब्द स्वरूपाकारी । स्वरूपापरी शोभती ॥*
*जैशा साखरेचिया कणिका । गोडिये भिन्न नव्हती देखा*
*तैसे निरूपण ये रसाळ सुखा । ब्रह्मरसे देखा रसवृत्ती ॥*

अशा सरस्वतीच्या कृपाप्रसादाने माझी कथा सिद्ध होत आहे.

सरस्वतीवंदनानंतर संतसज्जन श्रोत्यांना एकनाथ वंदन करतात. श्रोते आनंदचिद्घन, चैतन्याचे अलंकार, ब्रह्मविद्येचे शृंगार, भूतदयार्णव, स्वयंप्रकाशी, प्रकाशमान असे असून त्यांच्या साक्षीने मी हा ग्रंथसोहळा प्राकृतात केलेला आहे. 'ज्ञानेश्वरी' प्रमाणे भागवतातही एकनाथांचे श्रोते सहभागी होतात आणि म्हणतात 'आम्हासि पाहिजे ज्ञानकथा । वरी तुजसारिखा रसाळ वक्ता । तरी स्तुति सांडोनि आता निरूपण तत्त्वता चालवी' (६०) आणि कवी आनंदून जातात. पसायदान - स्वानंदघन, मेघ-मयूर, चातक-जीवन-चकोर-चंद्र, समर्थ-दास, स्वामी-सेवक अशी विलक्षण नम्रभूमिका घेऊन श्रोत्यांच्या सज्जनांचा गौरव करतात. एकवीरा देवी, गुरु जनार्दन स्वामी यांनाही वंदन करतात. गुरुवंदनात एकनाथ रंगून जातात. गुरुची आज्ञा पाळून मी हा ग्रंथ सिद्ध करीत आहे. श्रीराम-अहिल्या, वशिष्ठ वचने-रविमंडळ, याज्ञवल्क्य-धुष्ककाष्ट पल्लवता त्याप्रमाणे माझा ग्रंथ गुरुवैभवे सार्थकी बनला आहे. व्यास, वाल्मीकी, शुक या विषयी 'पुराणे गौरवी बोलिजे', यांच्या आशीर्वादाने ग्रंथसमाप्ती मी करू शकेन ! आचार्य शंकराचार्य, भागवत व्याख्याता श्रीधर आणि इतर भाष्यकार यांनाही एकनाथ वंदन

करतात. प्राकृत कवीश्वर ज्ञानेश्वर, नामदेव, चांगदेव, वटेश्वर यांचा विशेष गौरव एकनाथ करतात आणि आपला कुलवृत्तांत सांगतात. भानुदास-चक्रपाणी-एकनाथ अशी परंपरा सांगतात. नारद, प्रल्हाद, सनक, उद्धव, अक्रूर, श्रीधर, वसिष्ठ हे सर्व वैष्णव असून मीही त्यांच्याच कुळातील आहे. पहिल्या अध्यायाची प्रस्तावना येथे पूर्ण होते. प्रत्येक अध्यायाच्या प्रस्तावनेत उपसंहारात पुढील अध्यायांचे अनुसंधान जोडून घेतात. उदाहरणार्थ *'पुढील कथेची व्युत्पत्ती । सांगेन यथार्थी अर्जुनी । श्री भागवताचे राशीवर । एका जनार्दन केला मापारी'* (३:८७२) अशा प्रकारे कथेचा अनुबंध जोडून घेताना भागवत, स्वामी जनार्दन यांचाही गौरव केलेला दिसतो.

### ३:३ ॥ भागवताच्या एकादशस्कंधाचा गौरव ॥

पहिल्या अध्यायाच्या प्रास्ताविकात आणि इतरही अध्यायात भागवताची वैशिष्ट्यपूर्णता, वेगळेपणा, भक्तिपूर्णता आणि कृष्णउद्धव यांचे संवाद, भक्त, राजपुरुष यांचे संवाद कसे श्रेष्ठ आहेत हे पुनःपुन्हा स्पष्ट केले आहे.

*पुराणी श्रेष्ठ भागवत । त्याही माजी उद्धवगीता*
*तुवा प्रवर्तवि तेथ । वक्ता भगवंत तुज साक्ष*

ही मोक्षकथा आहे. भक्तिज्ञानमार्ग प्रदीप आहे. भक्तिबोध असे म्हटले आहे. गुरुकृपा, भक्तिप्रबोध आणि सर्वसामान्य माणसांना उपासना सांगण्यासाठी नाथांनी चरित्रकथांचा विस्तार केला आहे. मराठी भाषेविषयी नितांत आदर त्यांनी व्यक्त केला आहे.

प्राचीन मराठी संतकवींनी (वारकरी-महानुभाव) मातृभाषेचा बोलीभाषेचा आणि जनभाषेचा जाज्वल्य अभिमान आपल्या रचनांमधून प्रगट केला आहे. या पाठीमागे कोणती प्रेरणा असावी? एकतर संस्कृत ही पंडितांची भाषा होती आणि ज्ञानभाषा म्हणून तिला सन्माननीय स्थान होते. सर्व ज्ञानव्यवहार आणि ईश्वरमीमांसा संस्कृतातून होत होती. सर्व आकरग्रंथांचे माध्यम संस्कृत भाषा होती. पंडितांची ज्ञानभाषा चिंतनभाषा म्हणून संस्कृत भाषेला स्थान होते. या भाषेतील ज्ञाननिधी आणि भक्तिमार्गाची उपासना सर्वसामान्य लोकांपर्यंत पोहोचविण्यासाठी जनभाषेतून टीकाभाष्य निर्मितीला अकराव्या-बाराव्या शतकात सुरुवात झाली आणि टीकाभाष्ये आविष्करणाच्या बाबतीत जराही उणी नाहीत हे पटवून देण्यासाठी लोकभाषेचा, जनभाषेचा आणि बोलीभाषेचा स्वाभिमान भाष्यकार कवींनी पुनःपुनः आपल्या साहित्य निर्मितीतून केलेला आहे. स्वभाषेच्या अभिमानापाठीमागे तिची समृद्धता आणि सखोलताही स्पष्ट करण्याची प्रेरणा दडलेली आहे.

*देशभाषा वैभवे । प्रपंच पदार्थी पालटली नावे*
*परी रामकृष्णादि नामा नव्हे । भाषा वैभवे पालटू*
*संस्कृत वाणी देवे केली । तरी प्राकृत काय चोरापासून झाली*
*असोत या अभिमानभुली । वृथा बोली काय काज*
*आता संस्कृता किंवा प्राकृता । भाषा झाली जे हरिकथा*
*ते पावनची तत्त्वता । सत्य सर्वथा मानली ॥ १ : १२७, १२८ ॥*

प्राकृतभाषेतील टीकाभाष्य कविपोषक आहे असेही एकनाथ आवर्जुन सांगतात. देशभाषा, प्राकृतभाषा, बोलीभाषा, मराठी भाषा असे उल्लेख एकनाथ करतात. *'हेचि मराठीया आरवा । सांगेन ते सावध ऐका'* असेही एकनाथ म्हणतात आणि कथेचे, अध्यायांचे, विषयानुसंधान साधून घेतात. देशीभाषेत मी कथाकथन करीत आहे ही नाथांची भूमिका आहे.

भागवताच्या एकादशस्कंधाचा मी अनुवाद करीत आहे. कथाकथन करीत आहे ही नाथांची भूमिका सर्व अध्यायात परिपूर्ण झालेली आहे. प्रत्येक अध्यायातील प्रत्येक श्लोकांवर भाष्य करताना सर्व सप्रमाण ओव्या आलेल्या नाहीत तर अतिशय मोकळेपणाने ही निरूपणे परिपूर्ण होण्यासाठी एकनाथ प्रयत्नशील असतात. त्यामुळे काही श्लोकांवरील भाष्य विस्तृत असते तर काही श्लोकांवरील भाष्य आटोपते घेतले असते. सर्व अध्यायांतून हे दिसून येते. तसेच गुरुविषयीचा आत्यंतिक आदरभाव प्रत्येक अध्यायाच्या प्रास्ताविकात आणि उपसंहारात भरभरून आलेला आहे. किंबहुना गुरुभक्तीच्या सुवर्णधाग्यातच भागवताचा हा स्कंध एकनाथांनी गुंफलेला आहे. गुरुचिंतनात अनेक दीर्घ रूपके आणि सांगरूपके एकनाथांनी योजिली आहेत. श्रोत्यांशी, वाचकांशी ते संवाद साधतात.

*कथेसी फाकली सर्वथा । तो कोप न मानावा श्रोता*
*प्रसंगे गुरुवंचना होता । मीही गुरुकथा बोलिलो*
*मज तव चुकी पडली मोठी । चुकू नि सांगितली गुरुची गोठी*
*तेही संस्कृत नव्हे मराठी । वृथा चावटी न म्हणावी ॥ ए. भा. ९:४४०,४१*

याप्रमाणे *'भागवत प्राकृत जाहले । परि नाही चुकले निजज्ञान'* हा आत्मविश्वास आपल्या निरूपणातून प्रत्यही एकनाथ व्यक्त करतात. ज्ञात्या विद्वतजनांनी मराठी ग्रंथ म्हणून उपेक्षाही करू नये अशी समजही एकनाथ देतात. एकतीसाव्या अध्यायात म्हणजे भागवताच्या एकादशस्कंधाचा अखेरचा अध्याय असल्यामुळे या अध्यायात आधीच्या सर्व अध्यायात आलेल्या विषयांची अनुक्रमणिका एकनाथांनी दिली आहे. 'ज्ञानेश्वरी'च्या सतराव्या-अठराव्या अध्यायातही हेच दिसून येते. 'ज्ञानेश्वरी' संरचनेचा फार सखोल परिणाम आणि संस्कार एकनाथी भागवतावर झालेला आहे. त्याचा स्वतंत्रपणे अभ्यास होण्याची गरज आहे. एकनाथांनी ज्ञानदेवांची निरूपणशैली स्वीकारून व प्रत्येक अध्यायात प्रस्तावना उपसंहार करून आपले प्रवचनकीर्तन सिद्ध केले आहे. संत कवी हे सर्जनशील आणि संवेदनशील कवी होते. त्यात ज्ञानदेव, एकनाथ, मुक्तेश्वर, रामदास यांनी तर साहित्यकला निर्माण करण्याच्या उद्देशाने आपले धर्मकीर्तन सिद्धीला नेले होते. त्यामुळे त्यांची कविभूमिका आणि काव्यकर्तृत्व त्यांच्या रचनांमधून प्रगट होते. विशिष्ट संज्ञा ते उपयोजितात. आपला अभिप्राय व्यक्त करतात व त्यातून त्यांची साहित्यविषयक जाण प्रगट होते. नाथांच्या भागवतात अशा कितीतरी खुणा सापडतात व त्यावरून त्यांचे साहित्यविषयक विचार पडताळून पाहता येतात. संस्कृत कवितेपेक्षा आपण काहीतरी वेगळी नवनिर्मिती साधीत आहोत याची जाणीव सर्वच संतकवींना होती तशी ती एकनाथांनाही आहे. संस्कृत महाकाव्याची वैशिष्ट्ये रचनेच्या बाबत न

स्वीकारता त्यांनी पुराण प्रवचनाची बैठक आपल्या रचनातंत्राला दिली. आपल्या काव्याची भाषा, त्याचे प्रयोजन, हेतू, विषय आणि वर्गीकरणाविषयीही संत कवी आणि एकनाथ जागरुक होते. म्हणूनच स्वकाव्यविषयक उद्‌गार कथानिरूपणाच्या ओघात आणि प्रास्ताविक उपसंहारात स्वतंत्रपणाने एकनाथ करतात. त्यातून त्यांची काव्याभिरुची लक्षात येते. स्वकाव्य समर्थनासाठी भाषाभिमान, गुरुस्तुती, ग्रंथस्तुती करून कधी विनयाने, कधी कळवळ्याने तर कधी आत्मप्रौढीने आपल्या ग्रंथाची भलावण करतात. ज्ञानदेवांप्रमाणे एकनाथांना आपल्या अभिनव काव्यस्वरूपाची नेमकी जाणीव होती. म्हणून त्यांनी काव्यमीमांसाही केलेली आहे.

*हे जनार्दन कवितावाडी । ब्रह्मरसे रसाळ गाठी*
*जे जनार्दने लाविली गोडी । ते चवी न सोडी सर्वथा*

असे एकनाथ म्हणतात. कविता रसाळ असावी व ब्रह्मरसाने परिपूर्ण व्हावी ही त्यांची दृष्टी आहे. साहित्य आणि उपसाहित्य असेही वर्गीकरण एकनाथ करतात. कविताशक्ती भक्तीमुळे वाढीस लागते. (३०:४०) कवित्वशक्ती, काव्यप्रयोजन, काव्यलक्षण, काव्यकारण, रसविचार हाही स्वतंत्र विचार एकनाथांनी मांडला आहे आणि या त्यांच्या चिंतनामुळे नाथभागवताचे रचनाविशेष लक्षात येतात. एका धर्मकीर्तनाची आणि प्रवचनपुराणाची उभारणी एकनाथांनी भागवत निरूपणात केलेली आहे.

'ज्ञानेश्वरी'चा आणि ज्ञानेश्वरीच्या रचनातंत्राचा फार मोठा प्रभाव एकनाथी भागवतावर पडलेला आहे. एकनाथांची सहृदयी आणि गुरुभक्तीने ओथंबलेले अंतःकरण भागवत निरूपणातून प्रगट झाले आहे. भाष्यग्रंथ, टीकाग्रंथ म्हणून भागवताची निर्मिती झाली नसून रसाळ कीर्तनाचा मांड त्याला लाभलेला आहे.

डॉ. उषा मा. देशमुख
'३' फुलराणी साहित्य सहवास,
वांद्रे (पूर्व), मुंबई - ४०० ०५१.

## प्राक्तन

*मज वाटे माझे प्राक्तन बदलावे*
*प्रयत्नांचे सुईदोरे आशेचे टाके घालावे*
*न साधता येणारे न बदलता येणारे*
*तरीही वाटते संपवावे*
*आणिक वाटे यात भरावी स्वप्नांची डिझाईन*
*उमेदीच्या रंगांनी उत्साहाच्या ब्रशाने रंगवावे*
*हे चित्र द्यावे वाटते, वाटते*
*तुजला रविकरा भेट म्हणुनी.*

**कु. शरयु रांगणे**
अंकूर अपार्टमेंट, ब्लॉक नं. ७,
पार्श्वनाथनगर, विश्वेवाडी, पुणे ४११ ०३७.

# जीवन्मुक्ती

**डॉ. शि. स. अंतरकर**

एम. ए. (तत्त्वज्ञान) पी. एचडी., महाविद्यालयीन व विद्यापीठ पातळीवर तत्त्वज्ञान विषयाचे ३६ वर्षे अध्यापक. निवृत्त मुंबई विद्यापीठ तत्त्वज्ञान प्रमुख. मानद प्राध्यापक जैन अकादमी शिक्षण व संशोधन केंद्र तत्त्वज्ञान विषयावर नियमित लेखन. महाराष्ट्र तत्त्वज्ञान परिषद अध्यक्ष. जीवनात अध्यात्म, विज्ञान, धर्म व नीती या विषयांत रस.

## प्रास्ताविक

मानवेतर प्राण्यांचे जीवन एकस्तरीय असते तर मानवप्राणी आपले जीवन भिन्न पातळीवर किंवा स्तरांवर जगू शकतो - जगत असतो. शारीरिक, जैविक, मानसिक, बौद्धिक आणि आत्मिक अशा पाच स्तरांवर जीवन जगले जाते असे वेदान्त मानतो. प्रत्येक व्यक्ती या पाचही स्तरांवर स्वाभाविकपणे जीवन जगते असे नाही. मनुष्याला जन्मतःच शारीरिक आणि जैविक जाणीव असते. हे जिवंतपणाचेच लक्षण आहे. मुलाला चिमटा घेतला किंवा तहान-भूक लागली तर वेदना होतात आणि ते रडते. हे उपजतच असते. स्तनपान करण्याचे धडे घ्यावे लागत नाहीत. ते क्रमाक्रमाने उपडी वळते, रांगते, उभे राहते, चालू लागते. आवाजाच्या दिशेने पाहू लागते. वस्तू व माणसे ओळखू लागते. आवाजाचे अनुकरण करून बोलू लागते. मुलाची अशी प्राकृतिक वाढ होत असताना त्याच्यावर संस्कार होत असतात. मलमूत्रविसर्जन, खाणे-पिणे, इत्यादी सामान्य जैविक प्राकृतिक व्यवहारांनाही संस्कारांमुळे; शिक्षणामुळे सांस्कृतिक रूप येऊ लागते. जीवाच्या उपजत जैविक प्रेरणांना, सामग्रीला विशिष्ट सांस्कृतिक आकार येऊ लागतो. विशिष्ट संस्कारांनुसार मूल मराठी, गुजराथी बनते. हिंदू, मुस्लिम, ख्रिस्ती बनते. त्याच्यामध्ये भाषिक, प्रादेशिक, धार्मिक, व्यावसायिक अस्मिता निर्माण होते. मानवी जीवाला शिक्षण, संस्कार, वातावरण यातून हळूहळू सांस्कृतिक आकार येतो. तो अन्य प्राण्यांमध्ये एकटा किंवा कळपातील एक न राहता तो आता हिंदू, मराठी, विशिष्ट वर्णिय, वर्गीय विशिष्ट जीवनपद्धती असलेली व्यक्ती बनतो. त्याच्या 'मी' चा हा आशय सामाजिक असतो. त्याचे आचार, विचार आणि उच्चार 'मी'च्या या केंद्रातून, चष्म्यातून होतात. मानवी जीवन जगण्याची ही कमीतकमी पातळी आहे. या पातळीपर्यंत पोहोचू न शकणाऱ्या दुर्दैवी बालकांना मानवजातीतील जीव म्हणून सांभाळतो. पण जो या कमीतकमी पातळीवर येतो त्याला आपण जबाबदार मानवी व्यक्तीचा दर्जा देतो. त्याला काही हक्क असतात; काही कर्तव्ये असतात. त्याच्याकडून काही अपेक्षा असतात. सुजीवनाची अस्पष्ट का होईना त्याला काही कल्पना असते. त्याची जाणीव केवळ वैयक्तिक नसून तिचा आशय सामाजिक असतो. अशा जीवनात केवळ प्राकृतिक असे जवळ-जवळ काही उरतच नाही. श्वासोश्वास, अन्नपचन इत्यादी जैविक-शारीरीक क्रिया सोडल्यास मलमूत्रविसर्जनापासून झोपणे, खाणे-पिणे, संभोगसुख घेणे हे सर्व व्यवहार केवळ प्राकृतिक जैविक पातळीवर न राहता त्यांना सांस्कृतिक रंग येतो. सांस्कृतिक मूल्ये किंवा जीवन-मूल्ये हे मानवी जीवनाचे व्यवच्छेदक लक्षण आहे. मानवी जीवनाचा विचार म्हणजे सुजीवनाचा विचार. अर्थपूर्ण मानवी जीवन किंवा श्रेष्ठ मानवी जीवन म्हणजे काय याचा विचार कळत-नकळत माणसाच्या मनावर बिंबवला जातो.

पारंपारिक भारतीय दर्शनात या विचाराला पुरुषार्थ विचार म्हटले जाते. पुरुषार्थाचा विचार म्हणजे मानवी जीवनाच्या अंतिम साध्यांचा, मानवी जीवनाचे प्राप्तव्य काय, मानवी जीवन कशासाठी याचा विचार असे सामान्यपणे मानले जाते. असे मानण्यात मानवी जीवन साधनरूप आहे असे गृहीत आहे. ज्याप्रमाणे विशिष्ट प्रयोजन मनात ठेवून तांबट ताट, वाटी, पातेली अशी विशिष्ट आकाराची भांडी बनवतो त्याप्रमाणे विशिष्ट प्रयोजनासाठी माणसाचा जन्म आहे असे या विचारसरणीत गृहीत आहे. अस्तित्ववादी तत्त्वज्ञ हे गृहीत नाकारतात. त्यांच्या मते जन्म ही पूर्वनियोजित निर्मिती किंवा घटना नसून ती एक अनियोजीत घटना आहे. या वादात न शिरता भारतीय तत्त्वज्ञानाच्या संदर्भात असे म्हणता येईल की चार्वाकेतर भारतीय दर्शने मात्र जन्म हा पूर्वकर्माचा विपाक असल्याचे मानतात. या दर्शनानुसार कर्मबंधामुळे जीव जीवन-मरणाच्या चक्रात सापडला आहे. आणि ही जीवनमृत्यूपरंपरा दुःखरूप आहे. म्हणून या संसारचक्रातून, भवचक्रातून, जीवनमृत्यू परंपरेतून सुटका करून घेणे हे मानवी जीवनाचे अंतिम प्रयोजन आहे. यालाच मुक्ती किंवा मोक्ष म्हणतात. कैवल्य, अपवर्ग, निर्वाण अशी याला अन्य नावे आहेत. म्हणून मुक्ती म्हणजे जन्म-मृत्यू परंपरेतून सुटका. मुक्तीचा हा अर्थ स्वीकारला तर कर्मसिद्धांत, जन्ममृत्युपरंपरा आणि ही परंपरा दुःखरूप आहे ही गृहिते जे स्वीकारतात त्यांच्यापुरतीच मुक्तीची ही संकल्पना अर्थपूर्ण ठरेल. जे ही गृहिते स्वीकारीत नाहीत त्यांना या मुक्तिकल्पनेचे आकर्षण वाटणार नाही; त्यांना ही संकल्पना प्रमाण वाटणार नाही उलट ती कालबाह्य अंधश्रद्धाच वाटेल. या लेखात मुक्तीची संकल्पना या अर्थाने वापरली जाणार नाही. याची कारणे दोन :

१) मुक्तीच्या संकल्पनेमागील वरील गृहिते प्रमाण आहेत की अप्रमाण हा विवाद्य विषय आहे. ती विशिष्ट धर्मसंप्रदायांचा श्रद्धेचा विषय आहेत आणि २) त्यामुळे मुक्तीची ही संकल्पना संप्रदायसापेक्ष आहे. ती सर्व मानवांसाठी सार्वत्रिक व सार्वकालिक स्वीकारार्ह ठरत नाही. म्हणजे केवळ निधर्मी बुद्धिवादी लोकांनाच नव्हे तर पुनर्जन्म किंवा जन्म-मृत्यूपरंपरा न मानणाऱ्या अन्य धर्मसंप्रदायांनासुद्धा ही मुक्तीची

कल्पना अर्थशून्य वाटेल व वाटते. म्हणून या लेखात मुक्ती म्हणजे मृत्यूनंतरची आत्म्याची अशरीरि शुद्ध स्थिती किंवा जन्ममृत्यूपरंपरेतून सुटका किंवा वैकुंठ, कैलास इत्यादी परलोकात आत्म्याचे गमन असा संप्रदाय विशिष्ट अर्थ अभिप्रेत नसून याची देही याची जन्मी अनुभवण्याची एक परमोच्च अवस्था, मानवी जीवन जगण्याची परमोच्च रीत हा अर्थ अभिप्रेत आहे. मुक्ती हा परमपुरुषार्थ आहे. तो सुजीवनाचा उच्चतम स्तर आहे. मुक्ती केवळ वैयक्तिक जीवनाची फलश्रुती नसून सामाजिक जीवन निकोप ठेवण्याची गुरुकिल्ली आहे.

मुक्तीचा हा विचार पारंपरिक वाटत नसला तरी तो परंपराविरोधी नाही. उलट त्याची मुळे भारतीय परंपरेत आहेत. उपनिषदांपासून आपल्याला मुक्तीच्या दोन लक्षणांची, दोन संकल्पनांची समांतर मांडणी केली गेली असल्याचे आढळते. जन्ममृत्यूपरंपरेतून सुटका हा एक अर्थ, ही एक संकल्पना तर 'विकारांतून, तृष्णेतून, विषयवासनेतून, अहंममधून सुटका किंवा मुक्तता हा दुसरा अर्थ'. 'यदा सर्वे विमुच्यन्ते कामा येऽस्य हृदी श्रिताः । अथ मर्त्योऽ मृतोभवत्यत्र ब्रह्म समश्नुते ।' असे बृहदारण्यकात म्हटले आहे. 'ज्या वेळी व्यक्तीच्या चित्तातील काम व तदुत्पादक संस्कार नष्ट होतात त्या वेळी ती व्यक्ती कैवल्यरूपी अमृत मिळविते व याच देहात (इथेच) ब्रह्मस्वरूपी बनते.' अशा प्रकारची पुष्कळ वचने उपनिषदे, भगवद्‌गीता इत्यादी वाङ्मयात आढळतात. अर्थात मुक्तीची ही दोन लक्षणे किंवा या दोन संकल्पना स्वतंत्र व परस्परांशी असंबंधित मानल्या गेल्या होत्या असे नाही. त्या परस्पर-विरोधी म्हणून नाही तर परस्परपूरक म्हणूनच पारंपरिक वाङ्मयात येतात. हे जरी खरे असले तरी जन्ममरणपरंपरेतून सुटका ही मुक्तीची संकल्पना त्यामागील पारलौकिक गृहितांमुळे अनाकलनीय व अस्वीकारार्ह वाटते. त्याने मुक्तीची ऐहिक व पारमार्थिक संकल्पनाही टाकली पाहिजे असे नाही. मुक्तीच्या संकल्पनेतील परलोकाशी, मरणोत्तर अवस्थेशी निगडित अंश टाकून या जीवनाशी संबंधित काही उदात्त भाग राहत असेल व तो स्वीकारार्ह वाटत असेल तर तो घ्यायला काहीच हरकत नसावी. अशी संकल्पना संप्रदायनिरपेक्ष, कर्मसिद्धांत, पुनर्जन्म इत्यादी गृहित-निरपेक्ष आहे. मुक्तिसंकल्पनेतील हा सारभाग भगवद्‌गीतेतील स्थितप्रज्ञ, गुणातीत, योगी, ज्ञानी, भक्त इत्यादी आदर्श पुरुषांच्या लक्षणात येतो. मुक्त जीवन म्हणजे निरपेक्ष, निष्काम, निस्पृह, निर्मळ, निरामय, निर्मम, निरहंकारी, शांत, पवित्र, प्रसन्न जीवन. मुक्ती म्हणजे विकारातून, वासनेतून, तृष्णेतून मुक्ती. बद्ध जीवन म्हणजे बहिर्मुख, कामकामी, अशांत जीवन तर मुक्त जीवन म्हणजे अंतर्मुख, आत्मकामी, शांत, प्रसन्न जीवन. ही मुक्ती मानवी जीवनाचे परमोच्च मूल्य, परमश्रेय आहे. हे सर्वांनाच आकर्षक, विलोभनीय, स्वीकारार्ह वाटेल असे नाही. तरीपण परलोकवाद, जीवनदुःखवाद, कर्मसिद्धांत, पुनर्जन्मकल्पना यांच्यापासून या मुक्तीची नाळ कापल्यामुळे तिच्यात चिकित्सक बुद्धीच्या निकषावर टिकणार नाही असे काही नाही एवढे तरी मान्य व्हावे. ही जीवनमुक्ती म्हणजे 'व्यसनमुक्ती'प्रमाणे जीवनातून मुक्ती नाही; पाखांड्यांची 'मरण हेचि मुक्ती' नाही. तसेच 'आत्म्याची जन्ममरणाच्या दुःखमय चक्रातून मरणोत्तर कायमची सुटका' हा परलोकवादी अर्थही येथे अभिप्रेत नाही. जीवनमुक्ती ही मानवी जीवन जगण्याची परिपूर्ण, उत्कृष्ट, सर्वश्रेष्ठ रीत आहे. या जीवनपद्धतीला आध्यात्मिक, पारमार्थिक जीवन पद्धती म्हणता येईल. असे जीवन जगणाऱ्या आदर्श व्यक्तीला जीवन्मुक्त, स्थितप्रज्ञ, आत्मज्ञानी, गुणातीत, ज्ञानीभक्त, योगी, संत, साधू असे म्हटले जाते.

## २) वेदान्तमत

वेदान्ताच्या परिभाषेत जीवन जगण्याच्या या पातळीला पारमार्थिक पातळी किंवा आत्मस्थिती, ब्राह्मीस्थिती म्हणतात. भगवद्‌गीतेच्या दुसऱ्या अध्यायात स्थितप्रज्ञाचे वर्णन करून शेवटच्या श्लोकात *"एषा ब्राह्मी स्थितिः पार्थ नैनां प्राप्य विमुह्यति । स्थित्वास्यामन्तकालेऽपि ब्रह्मनिर्वाणमृच्छति ।।"* असे म्हटले आहे. ही ब्राह्मी स्थिती आहे. ही प्राप्त झाल्यावर व्यक्ती मोहग्रस्त होत नाही. अंतकाळीदेखील या अवस्थेत स्थिर होऊन तो ब्रह्मनिर्वाण पावतो. अशा तऱ्हेने वेदान्त मानवी जीवनात जगावे कसे व मरावे कसे याचा आदर्श घालून देतो. वेदांत बाह्यवर्तनाचा तपशील न देता हरतऱ्हेचे वर्तन करीत असताना आंतरिक भूमिका कोणती-कशी असावी हे वेदांत सांगतो. वेदान्त मतानुसार मानवी जीवन शारीरिक, जैविक, मानसिक, बौद्धिक आणि आत्मिक अशा पाच स्तरांवर जगता येते. पारंपरिक भाषेत यांना अन्नमय, प्राणमय, मनोमय, विज्ञानमय आणि आनंदमय कोश असे म्हणतात. व्यक्तित्वाचे हे पाच स्तर किंवा पाच घटक समजावून घेतले पाहिजेत. चैतन्य किंवा जाणीव किंवा आत्मतत्त्व हे व्यक्तित्त्वाचे सारतत्त्व आहे. तर स्थूल देह हा चैतन्याचा भौतिक आधार आहे. अद्वैत मतानुसार चैतन्यात स्वरूपतः, मूलतः भेद नाही. ते आकाशासारखे एकसंघ व अपरिच्छिन्न आहे. चैतन्याला व्यक्तित्व नाही. त्यामुळे माझा आत्मा, तुझा आत्मा, पुरुषाचा आत्मा, स्त्रीचा आत्मा, एवढेच काय तर मानवी आत्मा आणि मानवेतर जीवांचा आत्मा असा चैतन्यात जाणीवेत, आत्म्यात भेद नसून हे भेद औपाधिक आहेत. अशी ही मूळ अनवच्छिन्न शुद्ध जाणीव जेव्हा स्थूल देह, इंद्रिये, मन, बुद्धी इत्यादी उपाधींमुळे वातावरण, शिक्षण, विशिष्ट संस्कार यांच्यामुळे अहंकारबद्ध होऊन व्यक्तित्त्वाला येते तेव्हा सर्व व्यवहार या संकुचित व्यक्तित्वातून होतात. व्यक्तीचे विचार, उच्चार व आचार हे सर्व विशिष्ट वर्गीय, व्यावसायिक, भाषिक, प्रादेशिक, राष्ट्रीय, धार्मिक, लैंगिक अस्मितेतून, दृष्टीतून होतात. ही दृष्टी अर्थातच विकृत, अशुद्ध, संकुचित असते. यामुळे व्यक्तीचे स्वतःविषयीचे आणि सत्यविषयक आकलन तसेच व्यक्तीचे समाजाशी, मानवेतर प्राण्यांशी आणि एकूण सृष्टीशी संबंध दूषित होतात. अभेद बुद्धीने, आत्मौपम्य दृष्टीने व्यवहार न होता सर्व व्यवहार भेदबुद्धीने होतात. असा हा भेदबुद्धीवर आधारलेला सर्व व्यवहार सत्य आणि अनृत यांच्या मिश्रणातून होतो. म्हणून सर्व व्यवहार अज्ञानमूलक आहेत असे शंकराचार्य सांगतात. या भेदबुद्धीने, अज्ञानाने, अहंमम बुद्धीने जाणीव मलीन, संकुचित आणि विकृत होऊ न देता, बद्ध होऊ न देता शुद्ध व्यापक अशा आत्मस्थितीवरून, वैश्विक जाणीवेच्या पातळीवरून, आत्मौपम्यवृत्तीने,

अभेदवृत्तीने जीवन जगणे ही जीवन्मुक्तावस्था होय. शुद्ध, सर्वव्यापी, अद्वैत जाणीवेच्या म्हणजेच 'अहं ब्रह्मास्मि ।' किंवा 'सर्व खल्विदं ब्रह्म' या पातळीवरून व्यवहार करणारी व्यक्ती जीवन्मुक्त असते. अशी निश्चयाची आत्मस्थिती हीच मोक्षाची अवस्था. तो शरीरात असूनही अशरीरि, विदेहावस्थेत असतो. त्याला मार्यादित व्यक्तित्व नसते.

### ३) एकनाथकृत विवेचन :

व्यक्तीला जेव्हा आत्मस्वरूपाचा, आपल्या सारतत्त्वाचा विसर पडतो व मी म्हणजे या स्थूलदेहाने अवच्छिन्न झालेले संस्कारबद्ध चैतन्य असे मानून व्यक्ती व्यवहार करू लागते तेव्हा जीवन दुःखमय होते. एकनाथ म्हणतात,

*'तेवी आत्मत्वाचा विसरु । तेणे मी देइ हा अहंकारु ।*
*तेणे अहंकारे संसारु । अतिदुस्तर थोरावे ।।'* (पृ. १६.)

व्यक्ती आपले जीवन शारीरिक स्तरांवरून जगते. ती शारीरिक सुखांच्या मागे लागते. सुखाच्या अमर्याद अतृप्त तृष्णेमुळे व्यक्तीचे जैविक-मानसिक संतुलन बिघडते याची दखलही व्यक्ती घेत नाही. आणि अविवेकी जीवनाच्या अधःपतनाची प्रक्रिया सुरू होते. म्हणून विवेकी मनुष्याने केवळ सुखाचा केवळ 'प्रेयस्'चा विचार न करता जैविक-मानसिक व बौद्धिक हिताचा विचार करायला हवा. परंतु मानसिक-बौद्धिक विकासही मानवी विकासाची परमोच्च स्थिती नाही असे वेदान्ताचे प्रतिपादन आहे. पारंपरिक भारतीय दर्शनात या सर्व विकासाला 'अभ्युदय' म्हणतात. याचा धर्म, अर्थ व काम या त्रिवर्गात समावेश होतो. चार्वाकेतर भारतीय दर्शनि अभ्युदय हा परमपुरुषार्थ मानीत नाहीत. त्यांच्या मते मोक्ष हा परमपुरुषार्थ आहे. ते परमोच्च साध्य, परमोच्च मूल्य आहे. मोक्षाशिवाय अभ्युदय ही सोन्याच्या बेडीसारखी आहे. सोन्याची असली तरी ती बेडीच आहे. तो बंध आहे. म्हणून समृद्धी, वैभव, अभ्युदय जर बंधनकारक व्हायला नको असेल तर त्याच्या आहारी न जाता, त्यांची गुलामी न पत्करता, त्याच्यावर विजय मिळविला पाहिजे. दारिद्याने, दुःखाने, अपयशाने खचून न जाणे जितके आवश्यक तितकेच वैभवाने, सुखाने, यशाने हुरळून न जाणे आवश्यक आहे. हे आध्यात्मिक जीवनाचे सार आहे. यश-अपयश, सुख-दुःख, वैभव-दारिद्य या द्वंद्वामध्ये 'साम्यावस्था' ठेवणे म्हणजे जीवनमुक्ती. 'इहैव तैः जितः सर्गः येषां साम्ये स्थितं मनः ।' या गीतावचनात हाच विचार मांडला आहे.

अशा या परिपूर्ण जीवनाचे मूर्तिमंत उदाहरण म्हणजे एकनाथांचे चरित्र. एकनाथ स्वतःच्या आत्मस्थितीचे वर्णन करताना म्हणतात :

*'आम्हां येणें ना जाणें । जिणें ना मरणें ।*
*मरणे ना भोगणें पापपुण्य ।।*
*आम्हां कवण पदा जाणें ना कवण देवा भेटणे ।*
*आप आपणामाजीं राहणें अखंडित ।।'* (पृ. ९)

'आत्मन्येवात्मना तुष्टः' अशी ही स्थितप्रज्ञाची अवस्था आहे. आपल्याला काही ज्ञातव्य, कर्तव्य, प्राप्तव्य आणि भोक्तव्य नाही असे एकनाथ सांगतात. पण जर काही मिळवायचे नसेल तर व्यक्ती कृतीप्रवण होणार नाही. कारण कृती करण्यासाठी प्रयोजन लागते. म्हणून अशी व्यक्ती आत्मस्वरूपात विलीन होऊन अक्रीय राहील. एकनाथ तर सर्व व्यवहार करीत होते. मग ते जीवन्मुक्त होते की प्रपंची होते? एकनाथ आपल्याविषयी लोक काय काय समजतात ते सांगतात :

*'एका जनार्दनाचा वृत्तांत । एक म्हणती भक्तियुक्त ।*
*एक म्हणती जीवन्मुक्त । प्रपंची निश्चित मानिती एक ।*
*अहो हा एका जनार्दन । नाही आसन न देखे ध्यान ।*
*नेम मुद्रा माळा जाण । उपासकलक्षण या नाही ।'* (पृ. ९)

जीवन्मुक्त व्यवहार करू शकत नाही. धर्माचरण करू शकत नाही, कर्मे करू शकत नाही असा गैरसमज आहे. जीवन्मुक्तावस्था व्यक्तीला लोकसंग्रहाची कामे, सदाचरण, व्यवहार करण्यास अक्षम बनवीत असेल तर अशा जीवनाला आदर्श किंवा परिपूर्ण म्हणता येणार नाही. जीवन्मुक्त समाधी स्थितीत किंवा आत्मस्थितीत असतो याचा अर्थ तो कर्म करण्यास असमर्थ होतो असा नाही. कारण येथे समाधी म्हणजे ताटस्थ नव्हे. *'ताटस्था नाम समाधी । म्हणे त्याची ठकली बुद्धी। हे समाधी नव्हे त्रिशुद्धी । जाणावी नुसधी मुर्च्छा आली ।।'* (पृ. ७९) जीवन्मुक्त ताटस्थ अवस्थेत नसतो. तो कर्मे करीत असला तरी त्याची आत्मस्थिती किंवा समाधी भंग पावत नाही. कर्म करीत असताना समाधी स्थिती असू शकत नाही असे जे म्हणतात त्यांना निजात्म बोध म्हणजे काय हेच माहीत नाही असे एकनाथ म्हणतात : *'कर्माचरणी समाधी । एक म्हणती न घडे कधी । ते पावले नाही निजात्मबोधीं । जाण त्रिशुद्धी विदेहा ।।'* (पृ. ७९)

भगवद्गीतेतही अर्जुनाने *'स्थितधीः किं प्रभाषेत किमासीत व्रजेत किं ।'* असा प्रश्न श्रीकृष्णाला विचारला आहे आणि श्रीकृष्णाने त्याचे उत्तर 'अशी व्यक्ती व्यवहार करूच शकत नाही; तिचे सर्व व्यवहार व इंद्रियांचे व्यापार बंद असतात.' असे दिले नाही. जीवन्मुक्त ज्या समाधीत असतो ती विशिष्ट काळापुरती मर्यादित अशी एक अवस्था नाही. एकनाथ या समाधीला 'पूर्णसमाधी' किंवा 'निजसमाधी' असे म्हणतात. *'यालागी समाधी आणि व्युत्थान । या दोन्ही अवस्थांसहित जाण । बुद्धी होये ब्रह्मार्पण । अखंडत्वे पूर्ण समाधी ।।'* (पृ. ७९) ताटस्थ्य म्हणजे समाधी आणि ताटस्थ्य संपणे म्हणजे समाधीभंग ही समाधीची कल्पना अपूर्ण असून अगदी समान्य मनुष्यसुद्धा अशा प्रकारची समाधी हे जीवनाचे परमोच्च ध्येय असल्याचे मानणार नाही. एकनाथ म्हणतात, *'ताटस्थ्यापासूनि उठीला । तैं तो समाधीस मुकला । तेव्हा एकदेशी भावो आला । मंदही या बोला न मानिती सत्य ।।'* (पृ. ७९).

प्रयत्नपूर्वक समाधी लावणे म्हणजे काही काळासाठी चित्तवृत्तींचा निरोध करणे. हे कदाचित साधन म्हणून उपयुक्त असले तरी ती जीवन्मुक्ती नव्हे, स्थितप्रज्ञता नव्हे. तो परमपुरुषार्थ नव्हे. वसिष्ठ, नारद, शुक, वामदेव यांचा एकनाथ दाखला देतात. हे सर्व 'चालते बोलते समाधिस्थ' होते असे ते सांगतात. ते काष्ठ होऊन पडले नाहीत. ते कार्यरत होते. *'स्वरूप देखोनि मुर्च्छित जाहला । तो आपणिया आपण तरला । स्वये तरुनि जन उद्धरिला । तो बोधु प्रकाशिला शुक*

*वामदेवी ॥'* (पृ. ७९.)

जीवमुक्ती अवस्थेत शारीरिक-जैविक क्रिया प्रारब्धवशात् होत राहतात. परंतु तो कृती करू शकत नाही असे एकमत आहे. एकनाथ नित्य, नैमित्तिक, काम्य व निषिद्ध हे कर्माचे चार प्रकार सांगून त्यातील काम्य व निषिद्ध कर्मे जीवन्मुक्तावस्थेतून गळून पडतात. ती जीवन्मुक्ताच्या जवळ येण्याचे धाडसच करीत नाहीत असे सांगतात. परंतु जीवन्मुक्ताचे धर्माचरण, सदाचरण, लोकसंग्रहाचे काम बंद न पडता अधिकच वाढते. कर्तृत्वाहंकार आणि फलाभिलाषा यांच्या विरहित ते अनायासे होत असते. *'जो रथीं निश्चळ होऊनियां बैसे । तो न चालताही चालतु दिसे ।जाण स्वकर्म त्याचे तैसें । अनायासे मज अर्पे॥'* (पृ. ७८) जीवन्मुक्त कोरडा, कठोर, भावनाशून्य असतो हाही गैरसमज आहे. उलट मी आणि माझे या स्वकेंद्रीपणामुळे सामान्य माणसाची संवेदनक्षमता संकुचित व बोथट झालेली असते. दुसऱ्याचे दुःख त्याला बेचैन करीत नाही. जीवन्मुक्ती म्हणजे मी आणि माझे यातून मुक्ती; अहंकारमुक्ती. यामुळे स्वकेंद्रिता जाते व त्याची संवेदनता तरल व निस्वार्थी होते. एवढेच नव्हे तर *'पाहे पा देवर्षि नारदु । विनोदे न मोडे समाधिबोधु'* असे एकनाथ सांगतात. यावरून जीवन्मुक्ती ही नीरस, शुष्क, रटाळ जीवनपद्धती नाही हे स्पष्ट होते. जे धर्म्य आहे ते करताना त्याला विकारांशी संघर्ष करावा लागत नाही. स्वार्थच नसल्यामुळे स्वार्थविरुद्ध परार्थ हा झगडा संपतो. यामुळेच *'अर्जुना देऊनि निजसमाधी सवेंचि घातला महायुद्धीं । परी तो कृष्ण कृपानिधी । ताटस्थ तें त्रिशुद्धी नेदीच स्पर्शों ॥'* (पृ. ७९) असे एकनाथ सांगतात. युद्धात मारला गेलो तर स्वर्ग मिळेल व जिंकलो तर राज्य मिळेल अशा वैयक्तिक व स्वार्थी हेतूने युद्ध न करता अधर्म नाहीसा करून धर्माची प्रतिष्ठापना करण्याच्या ईश्वरी योजनेचा भाग म्हणून कर्तृत्वाहंकार व फलाभिलाषा टाकून, ईश्वराच्या हातचे साधन बनून ईश्वरार्पण बुद्धीने अर्जुन युद्धास तयार झाला हा या समाधीचा अर्थ आहे. अर्जुनाला अशा भूमिकेवर नेले. पण श्रीकृष्णाने त्याला ताटस्थ समाधीचा स्पर्शही होऊ दिला नाही हे एकनाथांचे निरीक्षण मार्मिक आहे. अशी निष्कलंक, शुद्ध निर्दोष साम्यावस्था म्हणजे आत्मस्थिती. या भूमिकेवरून जीवन जगणे म्हणजे मुक्तावस्था. ही जीवन जगण्याची सर्वोत्कृष्ट रीत आहे.

तात्पर्य जीवन्मुक्ती ही ताटस्थ समाधी नसून व्यावहारिक वावटळीची भंग न पावणारी पारमार्थिक सहजावस्था आहे. खरे तर तिला स्थिती किंवा अवस्था हे शब्दही लागू पडत नाहीत. जागृती, स्वप्न, सषुप्ती या तीन अवस्थांप्रमाणे ही एक व्यावहारिक अवस्था नसून ती अवस्थात्रयातीत *'तुरीया'* आहे. एकनाथ या परम समाधीचे, निजसमाधीचे बहारदार वर्णन करतात :

*'सकळ कर्मी समाधी । हे सद्गुरुचि बोधी बुद्धी ।*
*तरी युद्धींही त्रिशुद्धी । निजसमाधी न मोडे ॥*
*बुद्धीं आकळले परब्रह्म । तैं अहैतुक चाले कर्म ।*
*हेंचि बुद्धीचे अर्पण परम । इतर तो भ्रम अनुमान-ज्ञान ॥*
*स्वरूपी दृष्टी निरवधी । अनवच्छिन्न समान बुद्धी ।*
*कर्माकर्मी अज्ञान न बाधी । परमसमाधी तिये नाव ॥*
*जेथे शमली मनाची आधी । ते जाणावी परम समाधी ।*
*समाधी घेणे ते देहबुद्धी । काष्ठ तें त्रिशुद्धी मूर्च्छितप्राय ॥'* (पृ. ८०)

अशा तऱ्हेने आत्मस्थिती भंग न पावता जीवन्मुक्त जीवन जगत असतो. तो जे जे करतो ते भगवदाराधन असते. व्यवहार व परमार्थ किंवा आध्यात्मिक साधना असे द्वैत तेथे नसते. एकनाथ म्हणतात -

*'त्याचा खेळ तेंचि महापूजन । त्याची बडबड तेंचि प्रियस्तवन ।*
*त्याचे स्वभावी स्वानंदपूर्ण । श्रीनारायण सुखावे ॥*
*तो जेउति वास पाहे । आवडीं देवो तेउता राहे ।*
*मग पाहे अथवा न पाहे । तरी देवोचि स्वये स्वभावें दिसे ॥'* (पृ. ८१)

अशा व्यक्तीचे श्वासोश्वासादि सर्व व्यापार भगवद्रूप होतात.

*'श्वासोश्वासांचे परिचार । कां निमेषोन्मेषांचे व्यापार ।*
*तेही नारायणपर । केले साचार निजस्वभावें'* (पृ. ८०)

मानवी जीवन विविध स्तरांवर जगता येते-जगले जाते. अधिकाधिक सत्ता, संपत्ती, कीर्ती याने जीवनाला पूर्णत्व आणण्याची अहर्निश धडपड करणारे सदा अतृप्त, वखवखलेले संघर्षमय, स्पर्धात्मक कामकामी जीवन हा एक स्तर. या स्तरावर नीती, चारित्र्य हेही गौण असतात. वासनावश, विकारवश, बहिर्मुख जीवन ही जीवन जगण्याची कनिष्ठ रीत - यातून भ्रष्टाचार, हिंसा, हेवेदावे, सत्तास्पर्धा इत्यादी समस्या उत्पन्न होऊन वैयक्तिक आणि सामाजिक जीवन बिघडते. विवेक विरुद्ध विकार, स्वार्थ विरुद्ध परार्थ अशा द्वंद्वाच्या झगड्यात आपली शक्ती खर्च करीत प्रयत्नपूर्वक विवेकी, नैतिक जीवन जगण्याची पराकाष्ठा करणारे संघर्षमय नैतिक-धर्म्य जीवन सामान्यपणे समाज अशा पातळीवर येत नाही. व्यक्तीला खूप त्याग करावा लागतो. विलोभनांना, भ्रष्टाचाराला तोंड द्यावे लागते. म्हणून अशा जीवनात पुष्कळदा नैराश्य, चीड, कडवेपणा येतो. निष्ठावानांचा पुष्कळदा भ्रमनिरास होतो. हा जीवन जगण्याचा बौद्धिक-नैतिक स्तर. अशा व्यक्तीला नैतिक अहंकार असतो आणि ती इतरांकडे तुच्छतेच्या दृष्टीने पाहते. याहून वेगळा तिसरा स्तर म्हणजे स्वतः आत्मस्थितीत ईश्वर स्थिर राहून निरहंकारवृत्तीने काहीही स्वार्थ नसताना आत्मौपम्य वृत्तीतून ईश्वर सेवा म्हणून किंवा वैश्विक जाणीवेतून लोकसंग्रहाची कामे करणारे पारमार्थिक, आध्यात्मिक जीवन. संत, साधू, जीवन्मुक्त या स्तरावरून व्यवहार करतात. समुद्र ज्याप्रमाणे सर्व बाजूंनी नद्यांनी भरभरून पाणी आणले तरी आपली मर्यादा सोडीत नाही आणि नद्या आटल्या तरी तो आटत नाही त्याप्रमाणे इंद्रिये-मन, बुद्धी यांच्याद्वारा प्राप्त होणाऱ्या सुख-दुःखांनी, यशापयशांनी, ज्याची जाणीव मलीन, कलुषित व क्षुब्ध होत नाही असे पवित्र, प्रसन्न, आत्मकामी समर्पित जीवन हा तिसरा सर्वोत्कृष्ट स्तर. ही जीवन्मुक्ताची जीवनपद्धती आहे. या स्तरावर जगत असताना व्यक्तीची आंतरिक स्थिती कशी असते याचे वर्णन करताना शंकराचार्य म्हणतात :

*'आत्माम्भोधेस्तरंगोऽस्म्यहमिति गमने भावयन्नासनस्थ : ।*
*संवित्सूत्रानुविद्धो मणिरहमिति वा चेन्द्रियार्थप्रतीतौ ।*

*ह्यष्टोऽस्यात्मावलोकादिति शयनविधौ मग्न आनन्दसिन्धौ ।*
*अन्तर्निष्ठो मुमुक्षुः स खलु तनुभृतां यो नयत्येमवमायुः ।।' (शतश्लोकी)*

मी चालतो तेव्हा या आत्मसागरावरील मी एक तरंग असतो. जेव्हा बसतो तेव्हा संवित्-सूत्रात ओवलेला मी एक मणी असतो. इंद्रियांद्वारे विषयांची प्रतीती घेताना आत्मप्रतीतीचा आनंद उपभोगित असतो आणि गाढ झोपतो तेव्हा आनंदसागरात बुडी मारलेली असते. शरीरधारी अंतर्निष्ठ व्यक्ती आपले आयुष्य अशा अनुभूतीत व्यतीत करते. ही जीवन्मुक्ती आहे. हा मानवी जीवन जगण्याचा सर्वोत्कृष्ट, सर्वोच्च स्तर आहे.

(टीप : या लेखातील एकनाथांची वचने प्रा. गं. बा. सरदार यांनी संपादित केलेल्या 'एकनाथ दर्शन' मॉडर्न बुक डेपो प्रकाशन, पुणे, पहिली आवृत्ती, १९७८ या पुस्तकातून घेतली आहेत. वचनांच्या पुढे दिलेले पृष्ठ क्रमांक या पुस्तकाचे आहेत.)

डॉ. शि. स. अंतरकर
जैन संशोधन केंद्र,
मुंबई विद्यापीठ, विद्यानगरी सांताक्रुज (पूर्व),
मुंबई ४०० ०९८.

# श्रीनाथ भागवताचा वाङ्मयीन आविष्कार

**प्रा. डॉ. दा. वि. कुलकर्णी**

एम. ए. मराठी, हिंदी, संस्कृत पी.एचडी. 'श्रीएकनाथी भागवताचा विवेचक अभ्यास' प्रकाशित, समीक्षा ग्रंथ 'मराठीकथा स्वरूप आणि आस्वाद' - एकनाथचरित्र, संतकृपाप्रकाशन. संतवाङ्मयाचा अभ्यासक, गेली २८ वर्षे पदवी आणि पदव्युत्तर वर्गांना अध्यापन पी.एचडी. मार्गदर्शक, शिवाजी विद्यापीठ रीडर, गरवारे कन्या महाविद्यालय मराठी विभागप्रमुख.

**॥ इत्येषा वाङ्मयी मूर्ती ॥**

श्रीएकनाथांच्या भागवतभाष्य प्रबंधाविष्काराचे वाङ्मयीन वैभव पाहता ''भक्ती-मुक्ती'' आणि - ''मुक्तीवरील गुरुभक्तीचा'' मुख्य सिद्धांत विविध पातळीवरून परोपरीने मांडताना नाथांनी 'मराठमोळ्या' शैलीत वाङ्मयीन आविष्काराचे कितीतरी 'चित्रदर्शी रूपबंध' सहजी समूर्त केलेले दिसतात. भक्तीचा मुख्य विषय श्रोत्यांपर्यंत थेट भिडविण्यासाठी प्रकटलेल्या या वेधक आविष्काराचे विविध स्वरूप थक्क करून टाकणारे आहे. त्यात सूक्ष्मता, मार्मिकता, सखोलता, समर्पकता, आणि सहजता असून 'पैठण'च्या भागवतोत्तम एकनाथांच्या प्रत्यक्ष भावानुभूतीचे त्यातून विमर्शक असे दर्शन घडते. नाथांनी नारद, व्यास, शुकाचार्य, श्रीधरांपर्यंत आणि ज्ञानेश्वरादी पूर्वसूरींच्या प्रतिभा सामर्थ्याविषयी कृतज्ञ आदरभाव ठेवूनही स्वयंभू स्फुरद्रूप इथे प्रकट केले आहे. भागवती कथा घटिते ज्या एका सुखानंदकंद अशा गुरु स्वरूपाच्या अस्तित्व कळेतून स्फुरण पावतात त्या 'सहज' सोलीव सुखाचा गाभा, गुरुकृपेने निजांतरी पूर्णतः अनुभवून त्या स्वानुभूत सुगंधाने त्यांनी आपल्या भागवती टीकेच्या आविष्काराचे आकारात कोरून टाकले आहे. त्यामुळेच नाथांची ही विशालकाय वाङ्मय मूर्ती -

''स्व-रूपाविष्काराच्या'' दृष्टीनेदेखील देखणी बनली असून वाङ्मय कलेच्या मोहकतेने नटलेली आहे. एकाच वेळी आत्मनिष्ठ आणि वस्तुनिष्ठ, अन्वयवादी आणि व्यतिरेकवादी, संवेदनात्मक आणि विचारात्मक, प्रभावोत्पादक आणि विवरणात्मक अशा संमिश्र वैविध्याने स्फुरणारी स्पंदने विविध पातळीवरून इथे फुललेली दिसतात. हे दर्शन प्रत्ययकारी आणि सुस्पष्ट आहे. गुरुस्वरूपाच्या मूल आनंदास्तित्वाचीच प्रचिती भागवताच्या विशाल पार्श्वभूमीवर प्रकट करण्यात नाथांच्या प्रातिभ आविष्काराचे सौभाग्य प्रकटले आहे. मौनाच्या, निःशब्द आशयाला शब्दरूपात आकार देताना लघुदीर्घ रूपके, अलंकार, प्रतीक-प्रतिमा इ. वाङ्मयीन रूपे इथे सहजी चित्ररूप बनली आहेत.

**॥ निःशब्दाचे सोलीव शब्दरूप ॥**

नाथांनी निःशब्दब्रह्माला ''वाक्‌ब्रह्माच्या'' स्वरूपात सहज कौतुकाने प्रकट केले आहे. ''बोली अरूपा रूप'' दाखविणारी ही किमया असून नाथ सांगतात -

*''जळामाजी उपजे तरंग । जल तरंगांचे निजांग ।*
*तेवी शब्दी शब्द सांग । शब्दाचे सर्वांग निःशब्द ॥ ११.३३६''*

अर्थात निःशब्दाच्या चिन्मात्र गोष्टी या वाग्यज्ञातून नाथ प्रकट करीत आहेत. ते स्वतः सांगतात की,

*''शब्दी शब्दाते शब्दविता । ते शब्दरूपे हरीची सत्ता ।*
*शब्द द्योती ज्या शब्दार्था । ते अर्थग्राहकता हरीची ॥ २६.३८८''*

अर्थात गुरुभक्तीच्या वाग्यज्ञात शब्दांच्या विविध रूपबंधातून प्रकटलेल्या आविष्कार शैलीचेदेखील हवन करून ते निराळे होतात. नाथांची ही ''वाङ्मोहिनी'' स्वानंदमत्तपणे डुल्लत असून जिवंत व्यक्तिचित्रे, विस्तृत रूपके, उपमा दृष्टांत, यमकानुप्रासांचे नादछंद, क्रमतंत्राचे विविध रूपबंध साकार करते. त्यातून वक्तृत्व आणि निरूपण कुसरी दिसून येते. स्वतः नाथांनादेखील या गारुड किमयेचे आश्चर्य वाटते. ते सांगतात -

*''श्रीभागवत केले मऱ्हाटे । हे आश्चर्य वाटे माझेचि मज''॥ १६.३३७*

अर्थात संस्कृतच्या तोडीस तोड अशी आविष्कार घाटाची कुबेर श्रीमंती नाथांनी इथे प्रकट केली असून त्यांच्या आविष्काराचे विविध आकृतिबंध हे वेरुळच्या ''कैलास लेण्या'' प्रमाणे वेधक ठरले आहेत.

**॥ वाङ्मयीन रूपबंध ॥**

रूपक-महारूपकाप्रमाणे नादगर्भ शब्दांची पेरणी, चेतन गुणदर्शन, विविधगतींचे ताण, क्रमतंत्र, अमूर्ताचे मूर्त दर्शन, आघाततंत्र, क्षुद्र भव्य वस्तूंच्या सलग मांडणीतून आशय प्रभावी बनविणे, समरप्रसंगातील नेमके नाट्य हेरून संवादातून अभिनयाकृती उभी करणे, विशिष्ट उद्‌गारवाचकातून भावना वेग तीव्र करणे, लोकोक्ति म्हणी वाक्प्रचार सहजी वापरणे, सूत्रबद्ध सुभाषितांची पेरणी करणे, इ. अनेक प्रकारांची कुसर ओवीबंधाच्या पोतातून भागवती महावस्त्रात नाथांनी किनखापली आहे. इथे नाथांनी लोकसाहित्यकाराची, कीर्तनकार हरिदासाची आणि पुराणिकाची आविष्कार त्रिवेणी साधली असल्याचे दिसून येते. नाथवाणीच्या वाङ्मयीन सौंदर्याचे मर्म या त्रिवेणी निवेदन कौशल्यात आहे.

**॥ रूपकबांधणी : ॥**

भागवताच्या संदर्भात रूपकांचा विचार करता दोन विभाग करता येतील.

(१) संपूर्ण नाथ भागवत हेच एक ''भागवत महाक्षेत्र रूपक'' अशा स्वरूपात नाथांनी विशाल आवाका मांडला आहे.

(२) दुसऱ्या विभागात भागवत ग्रंथांतर्गत आलेली रूपके तीन गटात (अ) सद्‌गुरू स्वरूप दर्शन घडविणारी

(ब) जीवपातळीवरून साधकांचे स्वरूप सांगणारी

(क) साधन भक्तिस्वरूप दर्शविणारी अशी विभागणी करता येईल.

## ॥ भागवत महाक्षेत्र रूपक ॥

या दृष्टीने पाहता नाथांची 'रूपकसृष्टी' काश्यपीसृष्टी इतकीच सर्वव्यापी असल्याचे दिसून येते. एकाच वेळी लौकिक आणि आध्यात्मिक आशय पेलून नाथांनी अ. ०१६ आणि अ. ०३१ मध्ये भागवताच्या बृहत्तर क्षेत्ररूपकाचे स्वरूप चित्रदर्शी बनविले आहे. आदिनारायण हे आदिबीज (ते मिया नमिले आदिबीज - ज्ञाने.) ते नारदरूपी भूमीत जोमाने तरारून आले. व्यासांनी त्या पिकाची संवगण केली. चूड बांधून शुक-परीक्षितीच्या खळ्यावर मळणी केली. रास केली. श्रीधरांनी त्यातील "निडाराचे कण" निवडून काढले. त्या निवडक धान्यापासून "मराठी पदपद्धतीने" एका जनार्दनांनी पक्वान्ने करून रेळचेल केली. त्याची "निजगोडी" जाणणारे भक्त आहेत. एवंच पेरणीपासून पक्वान्न रुचीपर्यंत - तृप्तीपर्यंत - *"पिका आला ब्रह्मरस । हाचि भागवताचा कळस ॥"* असे हे महारूपक विस्तारते. हेच रूपक अ. ०३१ मध्ये विविध बारकाव्याने नाथांनी अधिक स्पष्ट केले आहे. (अ. ३१-३९० ते ४३९). अर्थात या रूपचित्रात भागवत क्षेत्राची म्हणजे भूमीची निवड, शुद्धभूमी शोधन, नांगरण, ओलवण, बीजवपन, राखण, मळण, रासचाळण, निवडण, हे करताना प्रसंगी होणारी नागवण इ. सर्व प्रथमाध्यायापासून कलशाध्यायापर्यंत महारूपकातून मांडून आद्यंती एक समग्र चित्र उभे केले आहे.

या पंगतीत एकाजनार्दनाची माशी निजतृप्त झाली. इथेच नाथांनी वेडे मांजर होऊन ब्रह्मरसाचे ताट चाटून तृप्त झाल्याचे रूपकातूनच सांगितले आहे.

रूपकाच्या द्वितीय विभागात - श्रीसद्गुरूंचे रूपदर्शन घडविताना -

गणेश रूपातील सद्गुरू - १.१ ते १६. निजात्ममायपिता २.१ ते १३.

क्षेत्रज्ञ - ६.१६८ ते १७६. सद्गुरू ज्योतिषी - ८.१ ते १२. सद्गुरू अमरपती ९.१.१७. धन्वंतरी - १०.१ ते ३० वसंत. त्र्यंबकेश्वर, चित्समुद्र कर्णधार माऊली - इ. रूपचित्रे वाङ्मयाची अलंकरणे बनली आहेत.

साधक पातळीवर - भवसागर २.९२ ते १०२. मायामोहिनी - ३.४१ ते ५१. विषयकामगज. ३.५१७. ते ५२१. काळनदी ७.५२० ते ५३१. कर्मनदी - ११. १०५३ ते १०७९. इ. रूपके लक्षणीय ठरतात.

भक्ती साधना या दृष्टीने - भागवत महानौका २.३११ ते २९ सद्गुरूंचा भोई - १२.५६४ ते ५७८. संतकृपा नाव. २६.४१९ ते ४२६ इ.

## ॥ प्रतिक प्रतिमा ॥

आशयाची सार्थ प्रतिमा साकारताना नाथांच्या रूपचित्रात - म्हैसा, रानसोळ, गारुड्याचे वानर, भद्रजाती, मर्कट, अस्वल, उठवणीचे हातिरू, लांडागर्दभ, घार, गरुड इ. प्राणी, पक्षी यांचा समावेश आहे.

केवळ बाह्य शरीर सौंदर्याचा वृथाभिमान बाळगून चढेल ताठ्याने वागणाऱ्या देहवादी माणसाचा मदोन्मत्तपण दाखविताना -

॥ म्हैसा ॥ *"तेवी बरवेपणाचा जाण । थोर चढे अभिमान*
*जेवी देखोनि हिरवे रान । म्हैसा संपूर्ण उन्मादे ॥ ५.१६६ ॥*

इथे म्हैसा-रेडा या प्रतिमेतून केवळ देहभोगी बुद्धीने मट्ठ तरीही अहंच्या ताठ्यात उन्मादीपणाने वागणारा सदैव मृत्यूच्याच छायेत असतो असे सुचविले आहे. यम म्हैशावरच स्वार होतो इ."

॥ रानसोळ ॥ *कां आंगीचे माजे । रानसोळ न मानी दुजे ।*
*तैसा बळाचेनि फुंजे । स्वयें गर्जे मुसमुसित ॥ ५.१६८*

*॥ गारुड्याचे वानर ॥ - "गारुड्याचे वानर जैसे । स्त्रियासंगे नाचे तैसे*
*प्रमदा दृष्टी झाले पिसे ॥ विवेकु मानसे विसरला ॥ ८.१६५"*

॥ गुळातील गुळदगडू ॥

*"मज रिघोनिया शरण । जोवांछी मानसन्मान ।*
*तो गुळातील पाषाण । केवळ जाण गुळदगडू ॥ ११.९६३ ॥"*
*"आंधळे मातले हात्तीरु। तेणे निजपतन निर्धारु ॥ ११.२४६ ॥"*
*"सुईमागे दोरा जाण । तेवी जरे सपे असे मरण ॥"* २२.५३५ ॥

इ. सहज-सुंदर प्रतिमातून विनाभाष्य अर्थ स्पष्ट होताना दिसतो.

## ॥ दृष्टांत दर्शन ॥

नाथभागवताच्या आविष्काराचे वाङ्मयीन सौंदर्य पाहत असताना नाथांच्या दृष्टांतवाणीचा प्रभाव सर्वत्र दिसतो. त्यात (१) सूर्यदृष्टांत, (२) सुवर्णदृष्टांत, (३) घृतकणिका दृष्टांत हे अक्षरशः शेकड्यांनी अवतरले आहेत. या खेरीज मग पारंपरिक, कौटुंबिक, व्यावसायिक, कृषी दृष्टांत इत्यादींचे आपणास दर्शन घडते. त्यातून नाथांच्या सूक्ष्म निरीक्षणाचे समाजावलोकनाचे प्रत्यंतर येते. हट्टी मुले, माहेरपणास येणाऱ्या मुली-बाळी, कन्यादान, आहेर, वेणीफणी, डोहाळे, स्त्रियांचे शृंगार, तान्ह्याचे लळे इ. दृष्टांत गृहस्थी नाथांनीच उपयोजावेच ! काही दृष्टांत असे -

उदा : **सूर्यदृष्टांत** *१) रवि थिल्लरी बिंबला । थिल्लर मी जाहला कदान म्हणे ॥ २.६८५ ॥*
*२) जनी अलिप्त वर्ते सविता । तेवी मुक्तता अवधारी ॥ ११.४१४*
*३) सूर्यापरी जाण । विचारे आपण समसाम्ये ॥ २८.१०७*
*४) जेवी सूर्याते नातले आभाळ । तेवी ज्ञात्यासी संग सकळ ॥ २८.३३८ ॥*

**सुवर्ण दृष्टांत :** *१) जेवी कनकाचे भूषण । कीं भूषणीं कनक संपूर्ण ॥ ४.१७*
*२) जैसा सुवर्णाचा नरहरी ॥ सुवर्ण हिरण्यकश्यपूते विदारी ॥*
*सुवर्ण प्रल्हाद पोटी धरी । तैशी परी मद्‌भजना ॥ ११.११३७ ॥*
*३) का सुवर्णाचे केले सुणे । परी ते मोले नव्हेचि उणे ॥ १३.७७३ इ.*

**घृताचा दृष्टांत :** *१) जैसी घृताची पुतळी । थिजोनि जाहली एके काळी ।*
*तैसी चैतन्याची मुसावली । स्वलीला जाहली श्रीकृष्णमूर्ती ॥ ३१.५७॥*
*२) होका घृताची पुतळी । नव्हता घृतपणा वेगळी ।*

*घृत रूपे आली । तैंसी मूर्ती झाली सद्‌गुरूची ।। १०.११९।।*

*३) घृत थिजले की विघुरले । परी घृतपणा नाही मुकले ।*

*तेवी सगुण निर्गुणत्वे मुसावले । परब्रह्म संचले श्रीकृष्ण ।। २९.८८७।।*

**पारंपारिक दृष्टांतात :** १) कमळ कळी गुंतला भ्रमरू २) चंद्रचकोर - मेघचकोर - किडा-भिंगुरटी, लोह-परिस इ. दृष्टांत लक्षणीय ठरले आहेत.

*कौटुंबिक दृष्टांतात : १) बाल पालवी घाली पिळा । तेणे बापराळे थोकला ।।*

*तरी काय तो निर्बळ जाहला । ना तो स्नेहे भुल्ला ढळेना ।। २.७८५ ।।*

*२) कन्या प्रतिपाळूनि जैसी । दान देता जावयासी*

*त्यागी बापाचे कुळगोत्रासी । दमें इंद्रिये तैंसी विषयार्थ ।। ३.५२६।।*

*३) जेवी लेकीसी शिकवण देता । सून सर्वथा चळी कां पे ।। ११.८८३ ।।*

४) माय बहिणींची तेलफणी - २५-१०२

५) खेळातील भातुकलीचा दृष्टांत देऊन नाथ लिहितात -

*का लेकराच्या खेळाप्रति । तुळसीदळे घेऊनि हाती ।*

*वडे मांडे क्षीर तूप म्हणती । एकी कल्पिती अनेकत्व ।। २८.१७४।।*

अर्थात 'अध्यात्म नव्हे लेकुरांच्या गोष्टी ।' असे असले तरी गृहस्थी नाथ इथे लेकुरांच्या दृष्टांतातून अध्यात्म समजावून देत असून तुळसीपत्र घेऊन भातुकली खेळणारी ही लेकुरे भागवतोत्तम वैष्णवाच्या वाड्यातीलच आहेत याचे इथे सहजी दर्शन घडते.

**सूत्रबद्ध निष्कर्ष :**

नाथांच्या वाङ्‌मयीन आविष्काराचे विविधांगी दर्शन हे व्यापक-विस्तृत-चित्रदर्शी असले तरी शेवटी या सर्व विस्ताराचा पसारा सूत्ररूप व्याख्येच्या रूपात सारगर्भ ठरविण्याची शब्दसिद्धी नाथांच्या आविष्कारात दिसून येते. प्रचंड धनुष्याच्या बाणाचे टोक अणुकुचीदारच असावे लागते. त्यातून शब्दवेधातील शरसंधानाचा ''लक्ष्यवेध'' अचूकपणे सिद्ध होतो. नाथ भागवतातील अशा ''सूत्ररूप व्याख्या'' म्हणजे त्यांच्या आविष्कार शैलीच्या बाणाची टोकेच होत. त्यातून नाथांचे अल्पाक्षर रमणीय आविष्कार वैभव दिसून येते. उदा : सुख : विषयप्राप्ति जो हरिख । तया नाव म्हणती सुख ।। ११.८७

**दुःख :** *विषयविनाश तेंचि दुःख । परम असुख या नाव ।। ११.८७*

**मोह :** *नसते वस्तूचे ठायी जाण । मी माझे हा अभिमान ।*

*तेचि 'मोहाचे लक्षण' । ''ममता'' दारूण ते संधी ।। ११.७९ ।।*

**विद्या :** *निज बोधे येत बोधा । ब्रह्माहमस्मि स्फुरे सदा ।*

*ते जाण शुद्ध विद्या । जे अविद्याच्छेदक ।। ११.९८ ।।*

**गुरू :** *जो दे चिन्मात्र पूर्ण ब्रह्मासी । 'गुरू' नाम तयासी बोलिजे ।। १९.५४६ ।।*

**नारायण :**

*नराचा समुदाय गहन । त्यासी 'नार' म्हणती जाण ।*

*त्याचे अयन म्हणजे स्थान । म्हणोनि म्हणती 'नारायण' आत्मयासी ।। २.१४३ ।।*

सारांश संस्कृतशी होड मांडून सूत्र व्याख्यातून नाथांनी मराठीची मातब्बरी सिद्ध केली आहे. ग्रंथारंभी ''अखंड स्थिती''ची व्याख्या आली असून अ ०३१ मध्ये ''श्रीकृष्ण परम पदवी'' (३१.१५६, ५७) ची व्याख्या आली आहे. आद्यंतीच्या या सूत्रांची एकवाक्यता पाहिली की नाथभागवताच्या वाङ्‌मयीन आविष्कार शैलीचा घाट आणि थाट कुठे झोक ठेऊन उलगडला गेला आहे याचे प्रत्यंतर येते. ''मुक्तीवरील गुरुभक्ती''ची म्हणजेच ''पिका आलेल्या ब्रह्मरसाची'' परमोच्च अवस्थाच ''श्रीकृष्ण पदवीच्या'' ''अखंड स्थितीत'' परिणत झाली असून ही नाथभागवताच्या वाङ्‌मयीन आविष्काराची फलश्रुती आहे. ''ह्याचि भागवताचा कळस'' होय. नाथच सांगतात की -

*''जे गतीहून वरती । चढेना अधिक गती ।'*

*तीते 'परापदवी' म्हणती वेदशास्त्रोक्ती सज्ञान ।। ३१.१५६ ।।''*

हे श्रीकृष्ण परम पदवी ............ ३१.१५७

या परमऊर्ध्व गतीत वेदाचा जनिता वेद प्रतिपाद्य देवता आणि स्वये वेदवक्ता यांचे अद्वैत दर्शन घडविणे यातच नाथभागवताच्या वाङ्‌मयाविष्काराची परमशांती सामावली आहे.

संदर्भ : एकनाथी भागवताचा अभ्यास (कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणे.)

प्रा. डॉ. दा. वि. कुलकर्णी
''सिद्ध प्रसाद'' भारत सूतगिरणीसमोर,
कुपवाड, मु. पो. कुपवाड.

# संतश्रेष्ठ एकनाथांचे कुंडलीतील ग्रहयोग

**पंडित हिंगे**

साहित्य विशारद, ज्योतिष विशारद, ज्योतिषपंडित, ज्योतिषभास्कर, होरा कमल विशारद व ज्योतिष महामहोपाध्याय (संपूर्ण भारत), सामाजिक ज्योतिष विषयक वेगवेगळ्या मासिकांत, वृत्तपत्रांत लेखन, सहसंपादक-स्नेहांकित व इंद्रायणी काठी, नागरी संरक्षण दलात वार्डन पोस्ट, सायरन ऑपरेटर व ऑर्गनायझर - भारत-पाक १९७१ च्या युद्धात उत्तम कामाबद्दल ब्रौंझ व सिल्व्हर मेडल प्रदान - अखिल भारतीय ज्योतिष संमेलनात, सन्मान व पुरस्कार.

"एकीकडे ज्योतिष हे थोतांड आहे" असे म्हणायचे पण ह्या कार्यक्रमाला प्रचंड होणारी गर्दी पाहिल्यावर असे वाटते खरोखरच 'ज्योतिष' हे शास्त्र आहे की नाही अन् उच्च शिक्षितही जेव्हा हे शास्त्र जाणून घेऊ लागतात आणि त्यात निश्चितपणे तथ्य आहे असे जेव्हा त्यांच्याकडून कळते तेव्हा मनाला समाधान वाटते कारण तसे नसते तर प्रत्येक मनुष्य हा कलावंत झाला असता, उत्तम वक्ता झाला असता अथवा मानवतावादी लोकसंग्रह करणारा झाला असता. परंतु तसे होत नाही हीदेखील एक विचार करण्याजोगीच गोष्ट आहे.

ज्योतिष शास्त्रद्वारा व्यक्तिचा पिंड, ज्ञान घेणेबाबतची पात्रता, आध्यात्मिक ओढ परोपकारी वृत्ती, मानवतावाद आणि लोकसंग्रह करणारा व विपुल प्रमाणात लेखन करणारा किंवा कसे? ह्या बाबतचे अनुमान ह्या शास्त्रावरून घेता येते. आजच्या लेखात महाराष्ट्रात जे अनेक संत होऊन गेले त्यापैकी ज्यांची अभंगाबरोबरच भारुडे प्रसिद्ध आहेत, आजही अनेक कार्यक्रमातून ती गाईली जातात असे अलौकिक, विद्वान, प्रतिभावान, मानवतावादी असे महान संत एकनाथ ह्यांच्या कुंडलीत असे कोणते ग्रहयोग आहेत की ज्यामुळे ह्या संताला, साधुपुरुषाला मानवतावादी संत म्हणून ओळखले जाते हे आपण पाहणार आहोत.

फल ज्योतिष शास्त्रात कालपुरुषाच्या कुंडलीची बैठक प्रथम समजावून घेणे इष्ट ठरेल.

फलज्योतिष शास्त्रात कुंडलीमध्ये धर्मत्रिकोण (१,५,९) अर्थत्रिकोण (२,६,१०) काम त्रिकोण (३,७,११) मोक्षत्रिकोण (४,८,१२) असे चार त्रिकोण प्रामुख्याने येतात हे आपणास वरील कुंडलीवरून दिसून येईल. कुंडलीतील पंचमस्थान, तेथे असणारे ग्रह, पंचमस्थानाचा मालक ग्रह, ह्यांचा परमार्थ आणि त्या मार्गातील उपासना, जपजाप्य, आन्हिक, नित्य उपासना ह्यांचा अत्यंत जवळचा संबंध आहे.

पंचमस्थानावरून श्रद्धा, भक्ती, उपासना यांचाही विचार केला जातो. परमार्थातील भक्तिचा कारक ग्रह 'शुक्र' आहे. भक्ती तत्त्वाचे ज्ञान आणि स्वरूप समजावून सांगणारा ग्रह 'गुरू' आहे. शनी आणि केतू हे ग्रह वैराग्य संपन्न करणारे आणि परमार्थात पूर्ण करणारे ग्रह मानलेले आहेत.

पंचम स्थानाचा स्वामी पंचमस्थानीच असेल अथवा पंचम स्थानाच्या स्वामीचा शुभ ग्रहाबरोबर शुभ योग झाला असता तसेच पंचमात चंद्र, बुध, गुरू, शुक्र असता व्यक्तिच्या जीवनात नामस्मरण, नित्योपासना ह्या गोष्टींना स्थान प्राप्त होते. वरील प्रकाराशिवाय कुंडलातील चतुर्थ, अष्टम आणि व्यय (म्हणजेच ४, ८, १२) स्थानातील ग्रहांचाही वरील गोष्टीकरता संबंध येत असतोच !

मेष, वृश्चिक, वृषभ, तूळ, धनु, मीन ह्या राशीत केतू परमार्थाकरिता फलदायी होतो, कारण महातपाचे कारकत्व केतूकडे दिलेले आहे. कुंडलीत केतू ग्रह (चंद्र कुंडलीकडून) पाच, नऊ आणि बाराव्या स्थानी असेल आणि त्यावर जर गुरू ह्या ग्रहाची पूर्ण दृष्टी असेल तर ती व्यक्ती मात्र निश्चितपणे अध्यात्माकडे वळते.

पंचम, दशम स्थानातील ग्रह आणि लग्न (प्रथम) नवम, दशम, ही स्थाने बलवान असता व्यक्तिस चार वेद आणि धर्मशास्त्र आवड निर्माण होऊन तो अंतर्ज्ञानी विद्वान होतो. पंचम आणि द्वादश स्थानातील ग्रहांचे युति, लाभ आणि जर नवपंचम योग होत असतील तर ईश्वर भक्तीदेखील घडू शकते. चंद्र नेपच्यून युती तसेच गुरुची नेपच्यून बरोबर होणारी युती, लाभ व नवपंचमसारखा योग व्यक्तिस अध्यात्म प्रगतीकरता लाभदायक ठरतो. कुंडलीतील धर्म व मोक्ष त्रिकोणस्थानेच अध्यात्मिक प्रगतीकरता अत्यंत उपयोगी पडतात. काल पुरुष कुंडलीत धनु, मकर, कुंभ आणि मीन ह्या महत्त्वाच्या अशा अध्यात्मिक राशी आहेत.



पंचमस्थानावरून धर्म, मंत्रशास्त्र प्रगती तर भाग्य स्थानावरून धार्मिक आचार, धर्मश्रद्धा, दानधर्म यांचा बोध होतो. दशमावरून कृती, तपाचरण आणि व्यय स्थानावरून परलोक प्राप्ती, मोक्ष प्राप्ती आणि ईश्वरोपासना इ. चा विचार केला जातो. परलोक सुखासाठी चतुर्थ स्थानातील मोक्ष त्रिकोणातील गुरू हा मोक्ष प्राप्तीचा पाया असला तरीदेखील कळसापर्यंत पोहचण्यासाठी, तपाचारासाठी मात्र शनीची आवश्यकता असतेच !

ज्योतिष शास्त्रावरून अध्यात्माचा विचार वरीलप्रमाणे करतात तेव्हा संतश्रेष्ठ श्री. संत एकनाथ ह्यांच्या कुंडलीत असे कोणते ग्रह योग आहेत की ते एक अलौकिक गृहस्थाश्रमी तर होतेच शिवाय "साधुपुरुष, श्रद्धावान, दयाळू, परोपकारी आणि मानवतावादी" होते ते आपण पाहू !

श्री संत एकनाथ
शके १४५४ फाल्गुन वद्य ६ रविवार
१६ मार्च १५३३ रात्री ७।४५, पैठण, मूळ नक्षत्र




वरील कुंडलीत पंचमस्थानी परमार्थ मार्गातील भक्तिचा कारक ग्रह शुक्र असून परमार्थातील भक्तीतत्त्वाचे ज्ञान आणि स्वरूप समजावून सांगणाऱ्या गुरू ग्रहाशी तो लाभ योग करीत असून गुरू स्वतःच्या धनु ह्या परमार्थाच्या राशीत असून चंद्राबरोबर त्याची युती झालेली आहे. परमार्थात पूर्ण करणारा ग्रह केतू हादेखील शुक्राबरोबर अध्यात्मिक कुंभ राशीत असून पंचमेश शनि हा बुधाच्या मिथुन राशीत भाग्यस्थानी असून शुक्र-केतू बरोबर त्याचा नवपंचम योग आहे. ह्या योगामुळे परमार्थाकडे ते वळलेले होते आणि नामस्करण नित्योपासना ह्याची आवड होती. व्यवस्थान आणि भाग्यस्थान ह्यांचा स्वामीग्रह बुध हा परमार्थ मार्गातील भक्तिकारक ग्रह शुक्राच्या युतियोगात केतूसह आहेच. त्यामुळे ह्यांना परलोकप्राप्ती झालीच !

पंचमस्थानी शुक्र, बुध असून त्यांचा पंचमेश शनीबरोबर त्रिकोण योग झालेला आहे. धनेश मंगळ पंचमेश शनीचे राशीत असल्याने स्पष्टवक्तेपणाबरोबरच त्यांच्या हातून अनेक अभंग आणि भारुडे ह्यांची निर्मिती झाली. दशम स्थानाधिपती चंद्र गुरुबरोबर पराक्रमात त्यामुळे उत्तम लोकसंग्रह तर झालाच त्याबरोबरच मानवतावादी वृत्ती आणि क्षमाशील दयाळूपणा आणि उत्तम परोपकारी होते. चतुर्थ स्थानाचा स्वामी शनी हा भाग्यस्थानी असून त्यावर गुरुची पूर्ण दृष्टी तसेच अष्टम स्थानाचा स्वामी, चतुर्थ स्थानाचा स्वामी आणि व्यय स्थानाचा स्वामी ह्यांचे एकमेकांशी झालेले जोरदार नवपंचम योग अध्यात्माकडे वळविण्यास कारणीभूत ठरले.

लग्नस्थानाचा स्वामी शुक्र पंचम ह्या विद्यास्थानी बुध केतूच्या युती असून त्यांच्याशी चंद्र-गुरुचा लाभ योग असल्याने प्रतिभावान, श्रद्धावान, अलौकिक असे व्यक्तिमत्त्व निर्माण झाले. तसेच लग्नेश व पंचमेश याचा नवपंचम योग झाल्यामुळे त्यांना उत्तम कीर्ती मिळाली. कुंडलीत चंद्र-हर्षलचा झालेला प्रतियोग त्यांच्या अध्यात्म प्रगतीसाठी तसेच भविष्य ज्ञान, सिद्धीकरता लाभदायक ठरला.

तहानलेल्या गाढवाला पाणी पाजले, तसेच त्यांच्या अंगावर अनेकदा थुंकलेल्या व्यक्तिवर न रागवता त्याला क्षमा केली. एवढा शांत आणि नम्रपणा असलेल्या ह्या संताच्या कुंडलीत असणारे अनेक बोलके ग्रहयोगच ह्याला कारणीभूत आहेत.

पंडित हिंगे (साहित्यिक / ज्योतिषी / पत्रकार)
अमरबाग सोसायटी, श्री सद्गुरु स्वामी समर्थ,
फ्लॅट ई / १३, गाडीतळ, हडपसर - पुणे ४११ ०२८.
दूरध्वनी - (०२१२) - ६१०४३५

ॐ

# संत श्री एकनाथ यांचे राजभवन - एक आध्यात्मिक रूपक

**प्रा. प्रभाकर म. उपाध्ये**

B.A. प्रथमवर्ग प्रथम, भाऊदाजी व आचार्य पारितोषिक विजेते. M.A. (संस्कृत) झाला, वेदान्त पारितोषिक, जैनरामायणावर पी.एचडी. प. पू. प्रा. गुरुदेव रानडे यांचा साक्षात संबंध. संस्कृत प्राकृत व संत साहित्यावर लेखन. ४२ वर्षे संस्कृत - पाली, प्राकृत भारतीय संस्कृतीचे प्राध्यापक ५-७ विद्यार्थी पी. एच. डी. झाले.

जनी जनार्दन पाहणारे साक्षात्कारी संत श्री एकनाथ महाराज यांची ग्रंथसंपदा विपुल असून त्यात वैविध्य आढळून येते. अभंग, भारुडे, चतुःश्लोकी भागवत, एकादश स्कंधावरील टीका, रुक्मिणी स्वयंवर व भावार्थ रामायण हे महत्त्वाचे ग्रंथ आहेत. या सर्व ग्रंथात संत एकनाथांनी अध्यात्मशास्त्र आपल्या कौशल्याने नटविले असून त्यात, साहित्य-काव्य व भक्ती ओथंबलेली दिसून येते. *"गृहाश्रमु न सांडिता । कर्मरेखा न ओलांडिता । निज व्यापारी वर्तता । बोधू सर्वथा न मैळे ॥"* असे त्यांचे वर्णन करता येईल. गृहस्थाश्रम न सोडता, कर्म-मर्यादा न उल्लंघिता, आपल्या व्यवहारात ते वागले तरी त्यांचा आत्मबोध मलीन झाला नाही. असे त्यांचे जीवन होते. नाथांचे ग्रंथ भक्तिप्रधान असून त्यामध्ये भक्तिविना काहीच नाही असे म्हणणे सार्थ आहे. जगाच्या उद्धरणासाठी रामकथा अर्थात भावार्थ रामायण त्यांनी लिहिले. नाथांचे जीवन आदर्श असून त्यांचा आत्मापण 'राम' असावा. ते स्वतःच म्हणतात. की *'ग्रंथाचे नामाभिमान । शुद्ध भावार्थ रामायण* (६-५५-१२५) त्यांचा हेतू असा की ही शुद्ध रामकथा सर्वांनी आपल्या कल्याणासाठी ऐकावी, तिचे मनन करावे व या नरदेहाचे कल्याण करून घ्यावे. या ग्रंथाचे कर्तृत्व श्री एकनाथांनी स्वतःकडे न घेता ते म्हणतात की भावार्थ रामायणाचा कर्ता-करविता श्रीरामच होय. या ग्रंथात श्री एकनाथ स्पष्टपणे सांगतात की रामनाम हेच खरे औषध व अमृतसंजीवनी आहे. (भावार्थ रामायण - युद्धकांड ४९-१३४-१४४) इतर ठिकाणी या ग्रंथातच त्यांनी नामस्मरणाची महती गायिलेली आहे. उदाहरण द्यावयाचे झाल्यास *'रामनामाक्षर द्वयासी। भेटी होताची रसनेशी । जाळोनी कल्पषांच्या राशी । मोक्षश्रियेशीवरी स्वये* (भा. रा. युद्धकांड - ८९-२२)

श्रीनाथ सांगतात की चराचराला व्यापून उरणारी वस्तू म्हणजेच भगवंत असून प्रपंचात परमार्थ पाहावा. मारुतीने वरदान मागितले व प्रभु श्रीरामचंद्रांनी ते आनंदाने दिले, असे सांगून श्रीनाथांनी भावार्थ रामायण संपविले आहे. रामकथा हेच आपले जीवन असून जोपर्यंत रामकथा पृथ्वीवर आहे तोवर आपले प्राण शरीरात असावे. सर्वसर्वांगानी श्रीरामाचे सदोदित स्मरण करावे, ज्यांच्या मुखी रामनाम आहे त्यांनी सुखसंपन्न असावे, अधर्मांचे वाईटपण व दुष्टांची दुष्ट प्रवृत्ती नाहीशी होऊन सर्व विश्व सुखी व्हावे असे वरदान मारुतीने मागितले. हे समजून घेताना संतश्रेष्ठ ज्ञानेश्वरमहाराजांनी विश्वात्मक देवापाशी जे पसायदान मागितले त्याची आठवण होणे साहजिकच आहे. सर्व संत हेच पसायदान मागतात. ज्ञानेश्वर असोत किंवा तुकाराम-एकनाथ असोत, सर्वांना विश्व-कल्याण अभिप्रेत असते. संत निराळे असतात, त्यांची भाषा निराळी असते. परंतु अंतःकरण मात्र भक्तिभावाने भरलेले असते व जगाचे कल्याण व्हावे हाच त्यांचा प्रयत्न असतो. याची प्रचिती आपल्याला श्रीनाथांच्या वाङ्मयावरून येईल.

भावार्थ-रामायण हा एकनाथांचा अखेरचा ग्रंथ असून त्यातील पहिली पाच कांडे व सहाव्यातील ४४ अध्याय लिहून झाल्यावर त्यांनी देह सोडला व यानंतरची रचना त्यांच्या गावबा नावाच्या शिष्याने केली व ग्रंथ पूर्ण केला. एकनाथांचे भावार्थ रामायण वाल्मीकिकृत रामायणाचा अनुवाद नाही तर नाथांनी रामकथेवर एक विस्तृत आध्यात्मिक रूपक रचले. या ग्रंथास 'अध्यात्म-रामायण' असे नाव सार्थ ठरेल यात शंका नाही. ज्याप्रमाणे या रामयणात आध्यात्मिक अर्थ आहे, तद्वत् सामाजिक अर्थपण आहे. म्हणूनच प. पू. गुरुदेव रानडे यांनी आपल्या 'एकनाथ-वचनामृत' ग्रंथात (पृ. ७) गौरवाने म्हटले आहे की, एकनाथांचे भावार्थ रामायण म्हणजे एकनाथकालीन महाराष्ट्राचा पारमार्थिक उषःकाल होय.

भावार्थ रामायणातील श्रीनाथांनी वर्णन केलेली भक्ती अपूर्व, अलौकिक असून त्यात नवविधा भक्ती व भावना यांचा सुंदर संगम आढळून येतो. नाथ भक्तिभावाने म्हणतात की *ग्रंथकथा ग्रंथ कविता । श्रीराम ग्रंथ लिहविला । वदनी वदविता स्वयें श्रोता । परिसविता श्रीरामु।* किंवा *श्रीनाथ म्हणतात संतकथा परिपूर्ण । अगाध कथा रामायण । ते वदावियां मी अतिदीन । श्री जनार्दन स्वयें वदवी ।* अशी नम्रता व्यक्त करतात. श्रीनाथ अत्यंत नम्र असून सर्व करणे ईश्वराचे आहे असे मानतात. हाच तो भक्तियोग होय. श्रीनाथांना राम-सीता यात अद्वैत दिसून येते. नाथ मानतात की प्रभुरामचंद्र शिव असून सीतामाई शक्ती आहे. *श्रीराम शिव सीता शक्ति । येरयेरांची जाणती गती । तेहि लोकरक्षणार्थी ! राम-सीता यांचे अद्वैत कसे आहे याचे वर्णन करताना नाथ सांगतात की श्रीरामाच्या मनोगता । अनुकूले वर्ते सीता । सीतेचिये मनोरथा । परिपूर्णता श्रीराम ।* श्रीरामरसे रसज्ञ सीता । सीतेच्या रसना श्रीराम भोक्ता । श्रीराम देखणे डोळस सीता । श्रीरामे सीता शोभे सांगू । सीता सर्वांग श्रीराम । सीता क्रिया श्रीराम कर्ता . . . . . . . सीता

ज्ञान श्रीराम ज्ञाता । एकात्मता अतिप्रीती । . . . . . . . कैसी प्रीती अलौकिक । एकीएक अनन्य. . . . . अशा शब्दांत सीता-राम यांच्या भक्तियुक्त अंतःकरणाने श्रीनाथांनी भक्तिभाव प्रगट केला आहे. सीतामाईने प्रभुरामचंद्रांना अद्वैत भक्तीनेच जिंकले पण अन्य साधारण भक्तांचे काय असा विचार करून श्रीएकनाथांनी सामान्य साधक भक्तांच्या आत्मोन्नतीसाठीही श्री रामचंद्रांना कसे वश करून घ्यावे हे रूपकाद्वारे भावार्थ रामायणात सुंदर वर्णन केले आहे. श्रीनाथांच्या मते श्रीराम सर्व जीवांचे जीवन आहे. राम म्हणजे भक्तांचे माहेर, ज्ञानाचे निधान, ब्रह्माचे सार, सूक्ष्माहून सूक्ष्म रामच होय. हा नाथांचा आत्माराम राजमहालात असतो. त्याला भेटण्यासाठी या महालात जाण्यासाठी सात दरवाजे आहेत. ते ओलांडून गेल्यावरच प्रभुरामचंद्र दिसतील. सुमंत मंत्री रामचंद्राला भेटण्यासाठी गेला त्या वेळी प्रत्येक दरवाजाशी त्याला काहीनाकाही मागे ठेवावे लागते. त्या त्या गोष्टींचा त्याग करूनच सुमंताला राममंदिरात प्रवेश मिळाला. प्रथम त्याने रथ सोडला, दुसऱ्या दारापाशी छत्रे-चामरे ठेवली. तिसऱ्या दारापाशी पादत्राणे तर चतुर्थ द्वारापाशी वैभव, पाचव्या द्वारापाशी स्वार्थ, सहाव्या दारापाशी सर्व साधने ठेवली व शेवटी मीपणाचा त्याग करून तो श्रीराम महालात गेला. *तेचि भेटे रघुनाथ । मुख्य परमार्थ या नाव* असे नाथ सांगतात. श्रीरामाच्या प्राप्तीसाठी विषयांचा त्याग करणे आवश्यक आहे. ज्ञानाचा गर्व सोडून या महालात जाणे योग्यच आहे. सात द्वारांचा असा सुंदर पारमार्थिक अर्थ श्रीनाथांनी वर्णन केला आहे. श्रवण, साधन, नित्यानित्यविवेक, मनन, निदिध्यासन, वैराग्य व साक्षात्कार याप्रमाणे रामाच्या राजभवनाचे सात दरवाजे ओलांडून जावे तेव्हाच रामदर्शन होणार अन्यथा नाही. रामप्राप्तीच्या मार्गात विषयासक्ती आड येते. अहंकार षड्रिपू पण मार्गावर असतात. म्हणूनच सावधपणे मार्ग आक्रमून रामदर्शनासाठी सात दरवाजे ओलांडून जाणे हेच साधन योग्य आहे असे भक्तांना वाटते. म्हणूनच प. पू. गुरुदेव रानडे म्हणतात की राजभवनाचे सात दरवाजे ओलांडून रामदर्शन घेणे हाच परमार्थ होय. (एकनाथ वचनामृत - पृ. २२३ तसेच भा. रा. अयोध्याकांड ५-४७-५३) *याचि मार्गेचे परिपाटी । श्रीरामाची होय भेटी* असे एकनाथ म्हणतात.

राजभवनाचे असे आध्यात्मिक रूपक रचून श्रीनाथांनी रामभेटीचा राजमार्ग उपदेशिला आहे. हा राजमार्ग म्हणजे नाथांना अभिप्रेत असलेली भक्तीच आहे. भक्तीला निष्काम कर्माची आवश्यकता आहे. देवाला सात्विक अहंकार आवडत नाही. नाम-श्रीराम-नामच तारकमंत्र आहे. फार काय सर्व भवरोगांवर श्रीरामनामासारखे दुसरे औषध नाही. श्रीरामनामानेच दूषणाचे भूषण ठरते. त्यासाठी भक्तांचा भावार्थ शुद्ध व निस्वार्थ असावा लागतो असेही एकनाथ सांगतात.

*गाळीव भावाचा भावार्थ । सर्वभूती श्रीभगवंत । हाचि मुख्य परमार्थ । निजस्वार्थ परमार्थ ।*

हाच भक्तियोग श्रीएकनाथांना अभिप्रेत आहे. श्रीनाथ भक्तियुक्त भावनेने शेवटी सांगतात की,

*आता सकळांसी हेचि प्रार्थना । अहर्निशी स्मरा श्रीरघुनंदना । म्हणोनि घालितसे लोटांगणा । तुम्हा संत चरणासी.* . . . . . . .

यापेक्षा अधिक संत काय सांगणार?

श्रीनाथांचे वाङ्मय विपुल आहे व त्यात अध्यात्म किंवा परमार्थ ठासून भरले आहे. शब्दापेक्षा आचरण मोठे असे मानणारे तत्वज्ञ संत श्री एकनाथ महाराज मराठी भाषेचे भूषण आहेतच पण ते क्रांतिकारी समाजसुधारक असून भारुड, अभंगांमार्फत लोकशिक्षणाचे ज्ञानदूत ठरले आहेत. सर्वच जीवन ध्येयासाठी अर्पण करणारा हा महात्मा समाज-सुधारणा खऱ्या अर्थाने करणारा कल्याणकारी संत होय असे म्हणणे सार्थ ठरेल.

शेवटी 'राजभवन' संदर्भात एका गोष्टीचा उल्लेख करणे आवश्यक आहे. प. पू. गुरुदेव रानडे यांच्या मते अध्यात्मशास्त्राला भाषेची, धर्माची कोणत्याही प्रकारची मर्यादा नाही. कारण ते शास्त्र विश्वात्मक असून दिक्-काल मर्यादा ओलांडून जाते. संतांच्या अनुभव-विश्वात हा भाव स्पष्टपणे दिसून येतो. भाषा भिन्न असली किंवा काळ मागे-पुढे असला तरी हे सत्य बाधित होत नाही.

सोळाव्या शतकात युरोपमध्ये सेंट टेरेसा नावाची संत होती व तिने एक ग्रंथ लिहिलेला आहे. त्याचे नाव 'इन्टिरिअर कॅसल' असे आहे. प्रा. शं. गो. तुळपुळे यांनी त्याचे भाषांतर केले असून ते ग्रंथाला 'राजभवन' असे म्हणून संबोधितात. या ग्रंथात संत टेरेसा हिनेपण 'राजभवन' कल्पनेचा विकास केला आहे. त्यामध्ये एक सविस्तर आध्यात्मिक रूपक रचिले आहे व त्यामार्फत संपूर्ण परमार्थ विशद करून दाखविला आहे. बद्धावस्थेपासून प्रारंभ करून एक-एक पायरी चढत शेवटी साधकाला परमेश्वराचा साक्षात्कार कसा होतो व जीवा-शिवाचे मीलन कसे होते याचे उत्कृष्ट वर्णन संत टेरेसाने केले आहे. राजभवनात एकनाथांप्रमाणे सात मंदिरे, द्वारे आहेत. पहिल्या मंदिरात जाताना मोहाविषयी, पापाविषयी प्रेम असते म्हणून प्रथम मंदिरात काही काळ घालवावा लागतो. दुसरे मंदिर प्रार्थनेचे असून साधकाला परमार्थ प्रगती करण्याची इच्छा होते. त्यामुळे तो श्रवण, मनन, सत्संग इत्यादी साधनांच्यासंगे पुढे जातो. तिसरे मंदिर साधकाला नियमबद्ध जीवन शिकविणारे असते. त्यात यम-नियम, तप, क्षमा अशा साधनांनी साधक बरीच प्रगती करतो. चौथ्या मंदिरात साधकाला दैवी शक्तीचा अनुभव येतो व त्याला ईशप्रेम हेच खरे जीवन वाटू लागते. पाचव्या मंदिरात जीवरूपी वधू व शिव हा वर यांचा वाङ्निश्चय होतो व शेवटी ध्यानाच्या अभ्यासाने साधक ऐक्यभक्तिपर्यंत जातो. सहाव्या मंदिरात जीव-शिवाची दीर्घकाळ भेट होऊन त्यांचा दृढ-परिचय होतो. त्यामुळे जशी देवाची कृपा वाढते तशी त्याची प्रगती होते. देवाच्या अंतरंगात शिरण्याची त्याची ओढ वृद्धिंगत होते व सातव्या म्हणजेच शेवटच्या मंदिरात जीवा-शिवाचे मीलन होते. दोन ज्योती एकवटतात. पाण्यात पाणी मिसळून जाते. हीच परमार्थाची उत्कृष्ट अवस्था होय. किंवा हीच पराभक्ती होय. डॉ. तुळपुळे म्हणतात की संत टेरेसाचा हा ग्रंथ म्हणजे परमार्थाची सप्तपदी असून त्यात प्रार्थना, नम्रता, आत्मपरीक्षण,

शरणागती, स्थितप्रज्ञता इत्यादी अनेक पारमार्थिक विषयांवर प्रसंगोपात विवेचन आढळते. हाच अभिप्राय संत एकनाथांच्या भावार्थ रामायणातील राजभवनासाठी देता येईल इतके राजभवनाचे महत्त्व आहे.

प. पू. गुरुदेव रानडे सांगतात की अध्यात्मशास्त्र विश्वव्यापक आहे याची प्रचीती आपल्याला संत एकनाथांच्या भावार्थ रामायणात दिसून येते. राजभवनाचे सात दरवाजे ओलांडून रामदर्शन घेणे हाच परमार्थ व संत टेरेसा हिने राजभवनातील सात दरवाजे ओलांडून गेल्यावरच जिवा-शिवाचे ऐक्य होते असे जे वर्णन केले आहे यात साम्य आढळून येते. या दोहोतील आध्यात्मिक विचारांचे साम्य चिंतनीय आहे. त्याचप्रमाणे परमार्थ-मार्ग विश्वव्यापक असून ईश्वरप्रणीत मार्ग हा सर्वंकष असतो असे मानणे योग्य ठरेल यात शंका नसावी.


प्रा. प्रभाकर म. उपाध्ये
(प. पू. गुरुदेव रानडे, चरणानुदासाचा दास)
१०, स्नेहवर्धिनी, गोरेगाव पूर्व
मुंबई - ४०० ०६३.


## श्रेष्ठ

*हरी हरी म्हणता हरितो चिंता*
*असा श्रेष्ठ तू कमलाकांता*
*कसे म्हणावे श्रेष्ठ तुला पण*
*नाथा घरी घाशितोस चंदन*
*नाग तुझ्याहुनी श्रेष्ठ कसा पण?*
*गर्दभास करी गंगा अर्पण*
*क्षुद्र जिवातून दिसे जनार्दन*
*संत मनाचे लोभस दर्शन*
*मनी नाथांच्या तूच नांदसी*
*श्रेष्ठ तुझ्याहुन नाथा करिसी*


**सौ. मंजिरी कुलकर्णी,**
अटल सोसायटी, विववेवाडी रोड, पुणे ३७.
फोन - ४१० २१६

# अद्वैत आणि गृहस्थाश्रम

**डॉ. विनायक य. कुलकर्णी**

सेवानिवृत्त पर्यवेक्षक, नू. म. वि. प्रशाला, पुणे. सार्वजनिक संस्थांशी संबंध, विश्व हिंदुपरिषद, गीताधर्ममंडळ, चिन्मय मिशन, विवेकानंद केंद्र. संत जीवनावर १२ कादंबऱ्या (ज्ञानदेव, नामदेव, एकनाथ, तुकाराम, रामदास, कान्होपात्रा, तुलसीदास, मीरा, भगवान श्रीकृष्ण इ.) प्रबंध लेखन. गीता स्वाध्याय, भारतीय कला. माऊलींचे गीता चिंतन, प्रवास - सिलोन, इंग्लंड.

## शंकराचार्यांचा अद्वैत सिद्धान्त

शंकराचार्यांच्या तत्त्वज्ञानाला 'केवल द्वैतवाद' म्हणतात, हा सर्वश्रुत सिद्धान्त आहे. त्यासाठी त्यांनी दिलेला 'रज्जु-सर्प दृष्टांन्त'ही सर्वांना सुपरिचित आहे. 'ब्रह्म हेच एकमेव सत्य मानले तर अन्य पदार्थ आभास वा मिथ्याच' मानावे लागतात. शिवाय हा आभास अज्ञानाचा परिणाम होय, हेही मान्य करावे लागते. या सिद्धान्ताची परिणती 'संन्यासवादात' होणे अपरिहार्य आहे.

माऊलीने आचार्यांचा 'अद्वैत सिद्धान्त' स्विकारला आहे, पण 'जगन्मिथ्यावाद' स्विकारलेला नाही. काहींना वाटते की, ब्रह्म हे एकमेव सत्य मानले तर अटळतेने मायावाद स्वीकारणे भाग पडते. जगाला 'माया' (आभास) ठरविणे हा अद्वैताचा उपसिद्धान्त मान्य करायलाच हवा ! माऊलीने - आणि अर्थातच त्यांनंतर नाथांनी - अद्वैत-सिद्धान्त स्विकारून मायावाद मात्र ओल्या हाताने पुसून काढला आहे. त्यासाठी माऊलीने नवे दृष्टान्त दिले आहेत. ते चिंतनीय आहेत.

आचार्यांच्या मताप्रमाणे 'ईश - जगत् - संबंध' 'रज्जु - सर्पवत्' होय ! माऊलीने 'ईश - जगत् - संबंध' च वेगळ्या दृष्टान्ताने दर्शविला आहे -

*देव देऊळ परिवारु । अवघा कीजे कोरोनि डोंगरू*
*तैसा भक्तीचा वेवहारु । का न होआवा ।। (अमृतानुभव)*

एकाच कातळात 'देव, देऊळ, परिवार' अशा सौंदर्यमूर्ती घडवितात, तसा 'भक्तीचा व्यवहार' व्हावा ! -

ध्यानात घ्या की, 'रज्जु - सर्प' दृष्टान्तात 'सर्प' मिथ्याच असतो. ती आभासात्मक निर्मिती अज्ञानजन्य आहे. डोंगरातील लेणी ही कलापूर्ण सौंदर्य-निर्मिती ज्ञानातून असून ती मिथ्या आभास नसते ! अशा रीतीने अद्वैताच्या अधिष्ठानावर ज्ञानभूमिकेवरून सौंदर्यपूर्ण कलानिर्मिती होऊ शकते ! 'अज्ञानजन्य', 'मिथ्यासर्प' विनाकारण 'भीती' निर्माण करतो, म्हणून तो 'त्याज्य' आहे. तद्वत् जगताचा संन्यासच अपेक्षित आहे. परंतु ज्ञानात्मक कलेतून निर्माण झालेल्या मनोहर शिल्पमूर्ती आनंददायक असतात, म्हणून त्या त्याज्य ठरत नाहीत. उलट त्या प्रीतिविषय बनून जातात ! तद्वत् जगत् ही भगवत्-प्रीतिचा आस्वाद ठरणारी, आत्म्याचा साक्षात्कार घडविणारी निर्मिती असल्याने या 'जगतातच भक्तीचा व्यवहार' होऊ शकतो !

अशा रीतीने आचार्यांचा 'अद्वैत सिद्धान्त' महाराष्ट्रीय संतांनी स्विकारला. परंतु जगन्मिथ्यावाद व संन्यासवाद बाजूला सारला. उलट अद्वैतवादास नवा दृष्टान्त देऊन गृहस्थाश्रम व समाजजीवन हा सौंदर्यपूर्ण, कलापूर्ण, आनंदपूर्ण असा भक्तीचा व्यव्हार ठरविला.

नाथांनी आपल्या गृहस्थाश्रमात या 'ज्ञानोत्तर भक्तीचा' वस्तुपाठच दिला आहे. ब्रह्मानुभव हृदयात मुरला असेल तर त्याची अभिव्यक्ती कशी होते, 'ज्ञानाधिष्ठित भक्तीचा वेवहारू' कसा होतो, हे नाथांच्या चरित्रावरून स्पष्ट होते.

## ब्रह्मानुभव असतो तरी कसा?

ब्रह्मानुभव आपल्या सामान्य प्रापंचिक जीवनात येऊ शकतो काय? होय. येऊ शकतो.

'समंब्रह्म' असे सूत्र आहे. ब्रह्म सम आहे. म्हणून समतेचा अनुभव हा ब्रह्मानुभव असतो. कवी प्रतिभेने ही समता पाहतो. 'चंद्रासारखे मुख' वा 'कमलासारखे डोळे' या उपमा दोन भिन्न पदार्थांतील 'सम-ता' म्हणजेच 'ब्रह्म' पाहतात ! कवींना प्रतिभेने ब्रह्मदर्शन घडते. वैज्ञानिकाला बुद्धीने, प्रयोगाने असेच ब्रह्मदर्शन (सम-दर्शन) घडते. दोन भिन्न पदार्थांतील अणु-परमाणू वा विद्युत्-अणु समान आहेत, असे त्याला 'दर्शन' होते. योग्याला असेच समदर्शन ध्यानाने घडते. *'प्रतीतिच्या सागरी । तू आपणयाते कल्लोळु करी । मग पाहसि चराचरी । तूचि आहासी'* (ज्ञाने. अ. ८) चराचरात त्यास 'सम-दर्शन' (स्वरूपदर्शन) होते. तर संतांचा तो साक्षात्कारच असतो ! *'विष्णुमय जग, वैष्णवांचा धर्म । तेथ भेदाभेद भ्रम अमंगळ'* अशी त्यांची अनुभूती असते !

ब्रह्मानुभव घेता येतो, हे उघड आहे. म्हणून 'समं ब्रह्म' ही जीवनदृष्टी ठेवून 'भक्तीचा व्यवहार' करता येतो आणि ब्रह्मानंदाचा आस्वाद घेता येतो. याच वृत्तीतून समन्वयशीलता, समतोलता, समता नि शांती जन्माला येते. ब्रह्मानुभूतीचा तो सहज आविष्कार आहे.

## नाथांचे सम-दर्शन

नाथ-चरित्रातील काही घटनांकडे सामाजिक दृष्टीने पाहिले जाते; परंतु त्याच घटना त्यांच्या आध्यात्मिक दृष्टीने स्पष्ट करणाऱ्या आहेत.

सुप्रसिद्ध कथा आहे की, गोदावरीच्या वाळवंटात महाराचे पोर उन्हाने थयथय नाचत होते. नाथांनी त्याला उचलून घेतले. त्याच्या घरी पोचवले. जाती-जातीत त्यांची 'सम-दृष्टी' होती.

त्यांनी 'हिंदु-तुर्क' संवाद लिहिला आहे. 'हिंदू' आणि 'तुर्क' असा फरक कशासाठी करावा? 'मंदिर' म्हटले की ते 'देवाचे' असते, म्हणून ते पाडावे किंवा त्याची 'मशिद' बनवावी, की ते 'अल्लाचे' झाले

!! हा विचारच हास्यास्पद आहे. त्या सर्व संवादातून नाथांनी धर्मातील समानता पाहिली.

नाथांनी काशीहून आणलेली गंगा गाढवाला पाजली ! 'ब्राह्मण, गाय, हत्ती, कुत्रा, चांडाल, यांचेकडे समदृष्टीने पंडित पाहतात' असे गीता सांगते. नाथांनी 'गाईला गंगा' पाजली असती, तर विशेष कौतुक नव्हते; कारण गोमतेच्या पोटात देवांची वसती आहे, अशी श्रद्धाच आहे. परंतु नाथांनी गाढव व गाय - किंवा गाढव व मानव यातही भेद केला नाही. सारे जीव समानच ! ज्ञानदेवांनी म्हटले आहे, 'गाय पुरात सापडली तर तिला वाचवावे. ती धड आहे की भाकड आहे, हे पाहू नये. जीव वाचवावा. तो ब्राह्मण आहे की अंत्यज आहे हे पाहू नये !' याचा प्रत्ययच नाथचरित्रात येतो.

आपणास ज्ञात असेलच की, नाथांनी युद्धही केले आहे ! याचा अर्थ असा की, 'ब्राह्मण व क्षात्र धर्म' यांचाही आपल्या ठिकाणी समन्वय दाखविला आहे.

'विरुद्धा पाहूणेर सदाचे घरी' (अमृतानुभव) या माऊलीने ब्रह्माचे वर्णन केले आहे. परस्पर विरोधी गोष्टी एकत्र येतात व आपला तोल सांभाळतात असे ब्रह्म असते. नाथचरित्रात त्याचा प्रत्यय येतो.

## नाथांचे कौटुंबिक जीवन

'अद्वैतम् आत्मनस्तत्त्वम' (आत्मतत्त्व एकच एक आहे -) असे माऊलीने सांगून तिथेच 'कोण कुणाचा अर्थ आहे हे सांगता येत नाही, अशी संलग्न शिव-शक्ती ही दंपती उद्भवते ' ! शिव-शक्ती ही दंपती 'दोन मिळून एक' अशी 'अद्वय' आहे ! माऊलीने म्हटले आहे, 'पावले दोन चाल एक, ओठ दोन शब्द एक, डोळे दोन दृष्टी एक, टिपऱ्या दोन नाद एक - तसे शिव-शक्ती (शिव-पार्वती) आहेत !' -

'अनाथांचा नाथ' या नावाची नाथांच्या जीवनावर कादंबरी आहे. नाथांचा विवाह झाला. लोकांनी नाथांना उखाणा घ्यायला सांगितले, असा प्रसंग त्या कादंबरीत रेखाटून नाथांच्या तोंडी उखाणा घातला आहे -

*ज्ञान आणि योग यापेक्षा श्रेष्ठ आहे भक्ती ।*
*आमच्या संसारात मी शिव, तर गिरिजा माझी शक्ती ।।*

खरोखरीच 'एकनाथ व गिरिजा' हे शिव-शक्तीस्वरूप होते. इतकी उत्कृष्ट साथ क्वचितच लाभते. नाथांवर एवढा प्रगाढ विश्वास आणि इतकी अबोल प्रीती ! संसाराची काही वर्षे उलटली की, पति-पत्नीत 'मित्रत्वाचे नाते' सुरू होते. मग पत्नीही आपली मते परखडपणे मांडू लागते. आवडी-निवडी सांगू लागते. पतीच्या वागण्या-बोलण्यावर कडवट प्रतिक्रिया व्यक्त करते. हे अगदी स्वाभाविक आहे. ती तिचं मन मोकळं करीत असते. गिरिजेने नाथांच्या वर्तनाला कधीच कसा विरोध केला नाही? त्या काळाच्या दृष्टीने नाथ अत्यंत प्रगत विचारांचे होते. 'महाराच्या घरी भोजनास जाणे' व 'श्राद्धासाठी ब्राह्मणांच्या पानांवर हरिजनांना बसविणे' ही कल्पना त्या काळात कोणालाही पेलवणारी नव्हती. त्यांनी प्रत्यक्ष आचरली. मला आश्चर्य वाटते ते गृहिणी गिरिजाबाईंचे ! साधारणतः स्त्रिया परंपरावादी असतात. त्यातून त्या एका शास्त्री घराण्यातील होत्या. त्यांना ही नाथांची झेप कशी मानवली, याचे कौतुक वाटते !

अशा एक की दोन गोष्टी ! एका आचरट ब्राह्मणाने जेवता-जेवता गिरिजाबाईच्या पाठीवर उडी मारली होती. त्या वेळी त्या म्हणाल्या होत्या, 'मला हरीला पाठुंगुळी घेऊन वाढायची सवय आहे !' एकदा नाथांच्या कीर्तनाला आलेले एक कामगार जोडपे नाथांच्या पलंगावरच झोपी गेले. नाथांनी नि गिरिजाबाईंनी खाली जमिनीवर आपली पथारी पसरली. रात्री चोरीसाठी आलेल्या चोराला भूक लागली म्हणून त्यांनी मध्यरात्री पिठले-भाकरी करून पोटभर जेवू घातले ! नाथांच्या कीर्तनाला येणाऱ्या एका वारांगनेच्या निमंत्रणावरून नाथ तिच्या माडीवर गेले. हरिपंडिताचा संताप झाला; परंतु गिरिजाबाईंना लवमात्र संशय आला नाही.

या आणि अशा अनेक प्रसंगांनी एकनाथ-गिरिजाबाई यांची प्रगाढ निष्ठा, प्रीती नि परस्पर विश्वास सुस्पष्ट होतो. शिव-शक्तीप्रमाणे खऱ्या अर्थाने 'अ-द्वय' भूमिकेवरील हा गृहस्थाश्रम धन्य होय.

## उद्धव-श्रीखंड्या-गावबा

नाथांच्या चरित्रात या तीन व्यक्तींचेही स्थान अढळ आहे. गिरिजाबाईच्या माहेराकडील उद्धव ही एक व्यक्ती ! नाथांनी आपलेपणाने ठेवून घेतली. हरिपंडिताला 'बाळकृष्ण' या नावाचा एक तरुण भेटला. नाथांना 'भेटायला' येत होता ! हरिपंडिताने त्याला 'हौद भरायचे काम' दिले. नाथांनी प्रेमाने त्यालाही ठेवून घेतले आणि त्याला 'देवपूजेसाठी श्रीखंड (चंदन) उगाळण्याचे' काम दिले. श्रीखंड उगाळणारा म्हणून श्रीखंड्या ! तो कोण, कुठला ते ठाऊक नाही. पण त्याचे नाव 'बाळकृष्ण' होते, तो नाथांकडे काही वर्षे राहिला होता, हा इतिहास आहे. लोकश्रद्धेप्रमाणे तो साक्षात भगवान श्रीकृष्ण होता !

तिसरी व्यक्ती 'गावबा' एका गरीब बाईचा छोटा मुलगा म्हणून नाथांकडे आला. नाथांच्या घरी त्याला 'पुरणपोळी' मिळाली. 'ज्यांच्या घरी पुराण करतात ते पुराणिक' अशी या बाळाची कल्पना होती ! त्याला 'पुरण आवडते' हे ऐकून नाथांनी त्याला घरीच ठेवून घेतले. देवाच्या नैवेद्याला पुरणा-वरणाचा स्वयंपाक होई ! गावबाला रोज पुरणपोळीचा नैवेद्य मिळे ! असा हा भोळा-भाबडा जीव ! दुपारी नाथांचे प्रवचन ऐके. नाथांनी 'भावार्थ रामायण' रचिले. पाच कांडे आणि सहाव्याचे ४४ अध्याय रचल्यानंतर नाथांचे महाप्रयाण घडले. विशेष असे की, 'उर्वरित भाग लिहून गावबाने ग्रंथ पूर्ण केला' ! नाथलिखित भाग संपला कुठे आणि गावबालिखित भाग सुरू झाला कुठे, हेदेखील लक्षात येऊ नये, इतक्या बेमालूमपणे हे लेखन झाले आहे.

माझ्या मनात येते, 'रेड्यामुखी वेद वदविले' आणि 'गावबा मुखी रामायण वदविले' हे दोन्ही चमत्कार तसे सारखेच ! भगवान श्रीकृष्णाने श्रीखंड्याच्या रूपाने कावडीने पाणी भरणे, गंध उगाळणे, सडा-संमार्जन करणे, उष्ट्या पत्रावळी काढणे, धोतरे धुणे अशी कामे केली. माऊलीचा हरिपाठ आहे ना?

*'देवाचिये द्वारी उभा क्षणभरी, तेणे मुक्ती चारी साधियेल्या । ज्ञानदेव म्हणे व्यासांचिये खुणे, द्वारकेचे राणे, पांडवा घरी ।।'*

त्या हरिपाठाची आध्यात्मिक अनुभूती नाथांच्या गृहस्थधर्माने

घेतली आहे. 'द्वारकेचे राणे' 'पांडवाच्या घरी' असतात हे 'व्यासांनी संकेताने सांगितले' आहे ! अर्थ असा की, भगवान प्रत्येक अनन्य भक्ताचे घरी राबतो ! हा अनुभव नाथांनी घेतला होता. तत्पूर्वी जनीनेही घेतला होता.

अशा रीतीने नाथांनी ''प्रपंच आणि परमार्थ'' एक केला होता. *'प्रपंच खाणोनि सांडावा । मग परमार्थू मांडावा । हा संदेहो नलगे करावा । प्रपंचूचि आपला परमार्थ होय !'* असे त्यांनी म्हटले आहे.

**नाथांनी अद्वैत-विचार अधिक व्यापक केला.**

शंकराचार्यांच्या अद्वैत विचारात 'विश्वाला'च स्वरूप नाही. अर्थातच संसाराचा त्यागच अपेक्षित आहे. कौटुंबिक जीवन, सामाजिक जीवन, ही शक्यतो बालपणीच टाकावी. 'सर्वकर्मसंन्यास' करावा, भिक्षाटन करावे, अरण्यवास पत्करावा, एकान्तसेवन करावे, अशी त्यांची एकान्तिक शिकवण आहे. ती सर्व मानव जीवनाला नि सर्व मानवी भाव-भावनांना स्पर्श करीत नाही. आपोआपच त्यांच्या तत्त्वज्ञानात 'मोक्ष' हा एकमेव पुरुषार्थ उरतो. 'अद्वैत विचारांची ती अपरिहार्य तर्कसंगत परिणती आहे', असे अनेक वेदान्त्यांना वाटते. महाराष्ट्रात प्रथमतः माऊली नि नंतर नाथांनी 'अद्वैताच्याच अधिष्ठानावर' विश्व सिद्ध केले; 'नित्य संन्यासाच्या भूमिकेवरून' *'आता गृहादिक आघवे, हे काही नलगे त्यजावे'* असा क्रांतिकारक विचार मांडला.

नाथांनी तो प्रत्यक्ष आचरणात आणून 'अद्वैत आणि गृहस्थाश्रम' यांचेही अद्वैत कसे स्थापन होऊ शकते, किंबहुना 'अद्वैतात खऱ्या अर्थाने व्यक्तिगत, सामाजिक, राष्ट्रीय आणि आध्यात्मिक जीवन कसे सामावले जाऊ शकते' याचाच व्यापक वस्तुपाठ दिला.

आचार्यांच्या मायावादाने 'जगत् हे ब्रह्मावरील विवर्त होय' अशी मांडणी केली. ब्रह्म हे एकमेव सत्य आहे. म्हणून सारी विविधता, साकारता, जडता, परिवर्तनशीलता ही मिथ्या आहे असे विवर्तवाद सांगतो. सारे जगत् अज्ञानजन्य नि आरोपित आहे. वास्तविक 'सारे शून्य' (मृगजळ वा स्वप्न) होय, असे त्यांचे प्रतिपादन आहे. विश्वाच्या विविधतेमागील 'एकमेव' 'अद्वितीय' ब्रह्माचा तर्कशुद्ध शोध लावायला मायावाद उपयोगी पडतो; परंतु जीवन हेतुशून्य, पुरुषार्थशून्य आणि निरर्थ बनून जाते !

ज्ञानदेवांनी 'शिव-शक्तीच्या' अनुरागातून जगत-निर्मिती दाखविली आहे. आचार्यांच्या ब्रह्मसंकल्पनेत विश्वोत्पत्ती ही विपत्तीच मानली जाते. ''प्रकृती विविध रूपाने नटते आणि प्रकृतीच्या आरशात माऊलीने शिव स्वरूपानंद भोगतो.'' असे म्हटले आहे -

*द्वैतदशेचे आंगण । अद्वैत वोळगे आपण*
*द्वैत तंव तंव दूण । अभेदासी ॥ (अमृतानुभव)*

(अद्वैत आपण होऊनच द्वैतदशेस येते. विशेष असे की, द्वैत... अपरंपार विस्तार अद्वैतच सिद्ध करतो !!)

याचा अर्थ असा की, कौटुंबिक जीवन, सामाजिक जीवन, सारे विविध व्यवसाय या सर्व 'विविधतेने' 'अद्वयानंदाचा आस्वाद घेणे', हे खरे आध्यात्मिक जीवन होय. नाथांनी आपल्या साहित्यात हाच विचार प्रामुख्याने मांडून अद्वैताचा विचार अधिक व्यापक केला. माऊलींच्याच भाषेत सांगायचे झाले तर म्हणता येईल, 'अद्वैताचा तट गाठला !'

नाथांनी भारुडांची रचना केली. त्यात महार, महारीण, कोल्हाटीण, डोंबारी, गारुडी, वैदू, मांग, जागल्या, माळी, जोशी, वासुदेव, भटीण, तसेच जंगम, मानभाव इत्यादी अनेक जाती-जमातींचे लोक आहेत. वेगवेगळ्या स्तरांतील लोकांची भारुडांचे विषय म्हणून त्यांनी निवड केली. त्या त्या समाजाला आकर्षित करणे हा त्यामागे हेतू असावा. त्याचप्रमाणे त्या स्तरातील प्रत्येक व्यक्तीला आपल्या रचनेत आणि भक्तिमार्गात कुठेतरी लक्षणीय स्थान आहे, याची जाणीव करून द्यावी, हाही हेतू असावा. अशा रीतीने त्यांनी अनेक जाती आणि व्यवसाय यांना एका भक्तिसूत्राने ओविले.

नाथांनी वेदान्तातील मायावादाची, कर्मबंधनाची, कर्मसंन्यासाची परिभाषा कायम ठेवूनही संन्यासवादाकडे झुकलेल्या तत्त्वचिंतनाला कर्मयोगावर आणले; गृहस्थाश्रमाला सुप्रतिष्ठित केले आणि समाजजीवनात चतुर्विध पुरुषार्थाची जिद्द निर्माण केली. ज्ञान व कर्म ही तमःप्रकाशवत् आहेत, असे शंकराचार्य म्हणतात; तर नाथांनी ज्ञानोत्तर कर्म, एवढेच काय ज्ञानोत्तर गृहस्थधर्माचेही पालन करणे शक्य आहे याचे जोरदार प्रतिपादन केले. भक्ती हे सर्वप्रेरक व सर्वसमावेशक असे जीवनमूल्य मानले. अशा रीतीने प्रपंच व परमार्थ यांच्यातीलही द्वैत संपविले.

डॉ. विनायक कुलकर्णी
१२९, शनवार पेठ,
पुणे ४११०३०.

# श्री एकनाथ महाराजांचे समाज-प्रबोधन

**श्री. चं. प. भिशीकर**

पुणे तरुणभारत दैनिकाचे सेवानिवृत्त संपादक. राजकीय, सामाजिक व अध्यात्मिक विषयांवर सुमारे २५ पुस्तके प्रसिद्ध. आध्यात्मिक चिंतन, लेखन व प्रवचन यांत काळ व्यतीत करतात.

आपल्या महाराष्ट्र भूमीत १६ व्या आणि १७ व्या शतकात जो इतिहास घडला, त्यात संतांनी केलेल्या वैशिष्ट्यपूर्ण कामगिरीमध्ये एक लक्षणीय संगती दिसते. इ. स. १२९६ मध्ये श्री ज्ञानेश्वर महाराजांनी 'आळंदी' येथे संजीवन समाधी घेतली. त्यानंतर सुमारे अडीचशे वर्षांनी म्हणजे १५३३ साली एकनाथ महाराजांचा जन्म झाला. हा मधला काळ इस्लामी आक्रमणाच्या वाढत्या उग्रतेचा आणि हिंदू समाजाच्या पराभूत मनोवृत्तीचा आणि मानसिक दौर्बल्याचा. या मानसिकतेतून समाजाला बाहेर काढण्याचा, त्यांची सांस्कृतिक, अध्यात्मिक आणि राष्ट्रीय अस्मिता जागविण्याचा महान प्रयास संत एकनाथांनी केला. नाथांनंतर सतराव्या शतकांत समाजागृतीचे आणि राष्ट्रीय अधःपतनाला कारणीभूत ठरणारे समाजातील दोष निपटून काढण्याचे कार्य तुकाराम महाराज व श्री समर्थ यांनी ईश्वरभक्तीचे पोषण आणि राजकारण अशा दोन्ही अंगांनी पुढे नेले. आधी ज्ञानदेव-नामदेव आणि नंतर एकनाथ-तुकाराम-रामदास अशी ही एकाच विचारांची आणि कार्याची परिपूर्ती आहे.

एकनाथ महाराजांनी प्रवर्तित केलेल्या क्रांतिकार्याची यशस्वी परिणती कै. डॉ. शं. दा. पेंडसे यांनी मार्मिकपणे शब्दांकित केली आहे. ते लिहितात, 'एकनाथ आणि त्यांची परंपरा व त्यांचे कार्य पुढे चालविणारे तुकोबा आणि रामदास या तीन सत्पुरुषांनी महाराष्ट्राच्या मनोभूमिकेत जी क्रांती घडवून आणली तिचेच पर्यवसान शिवकालीन राजकीय क्रांतीत झाले. तुकोबांनी सामाजिक सुधारणेकडे विशेष लक्ष दिले कारण समाजातील सर्व रीतींच्या विषमतेमुळे व दोषांमुळेच विघटन होऊन राजकीय पारतंत्र्य येत असते. रामदासांना हरिकथा निरुपणाचे म्हणजे समाजाची मनःशुद्धी करणाऱ्या भक्तीचे पहिले स्थान मान्यच होते. पण त्यानंतर राजकारणाला दुसरे स्थान देणे त्यांना आवश्यक वाटले. तुकोबांनी महाराष्ट्राच्या भागवतधर्म मंदिरावर आपल्या कार्याने भागवतातील भक्तिप्रधान भागवतधर्माचा सोनेरी कळस चढविला, तर रामदासांनी या मंदिरावर गीतेतील कर्मप्रधान भागवत धर्माचा तेजस्वी ध्वज उभारला आणि हाच धर्मध्वज मराठी स्वराज्याचा ध्वज झाला.'

अर्थात एकनाथ महाराजांनी सामाजिक आणि पारतंत्र्यविरोधी राजकीय अशा दोन्ही स्वरूपाच्या कार्याला आपल्या अलौकिक प्रतिभेने आणि गुणसमृद्ध जीवनाने एकाच वेळी हात घातला, असे म्हणावे लागते. प्रायः एकाकी अवस्थेत त्यांना विलक्षण साक्षेपाने हे महाराष्ट्राची मनोभूमिका बदलण्याचे कार्य करावे लागले. त्यांचा प्रत्यक्ष मुलगा हरिपंडित भागवतावर लोकभाषेतून - मराठीतून - भाष्य लिहिण्याच्या विरुद्ध होता यावरून तत्कालीन शास्त्रीपंडितांनी धर्माच्या स्वयंभू मक्तेदारांनी धर्मविचारांचा कसा कोंडमारा केला होता यावरून याची कल्पना येईल. ही कोंडी ज्ञानेश्वरी लिहून ज्ञानदेवांनी एकदा फोडली होती. पण पुन्हा कर्मठपणा व कर्मकांड याच्या विकट कात्रीत समाज सापडला होता. काशीला जाऊन व तेथे आपला भागवत ग्रंथ थोर थोर पंडितांच्या मान्यतेने पूर्ण करून नाथांनी पैठणच्या अहंमन्य पंडितांना यायासपूर्वक शह दिला होता. ज्ञानेश्वरांच्या ज्ञानेश्वरीचे जणुकाही विस्मरण समाजाला झाले होते. नाथांनी ज्ञानेश्वरी 'प्रतिशुद्ध' करून ती पुनःश्च समाजाच्या हाती दिली. सामान्यजनांना समजेल अशा स्वरूपात दिली.

नाथांचे जीवनच विलक्षण चाकोरीपेक्षा वेगळे. सद्गुरु कृपेची उत्कट ओढ बालपणीच निर्माण झाली आणि घर त्यांनी सोडले. सद्गुरु श्री जनार्दन स्वामींचा शोध त्यांनी घेतला. श्री जनार्दन स्वामींच्या आध्यात्मिक अधिकाराची जाण फारच थोड्यांना त्या वेळी होती. नाथ त्यांच्याजवळ राहिले व आपले जीवन त्यांनी घडविले. अध्यात्माच्या शाश्वत अधिष्ठानावर ते उभे केले. त्या काळाची गरज जाणून नाथांना गृहस्थाश्रमी होण्यास त्यांच्या सद्गुरुंनी सांगितले. चारचौघांसारखा प्रपंच करणारा पण ईश्वराभिमुख आणि लोकाभिमुख जीवनाचा उत्तुंग आदर्श होऊन राहणारा थोर महात्मा त्या काळी समाजाला हवा होता. धार्मिक आणि सामाजिक क्षेत्रात आदर्शहीनता होती. दिशा शून्यता होती आणि जीवन विघटित व नाना दोषांनी निस्तेज होऊन गेले होते. कर्तव्यविस्मृत झाले होते. नाथांनी भागवतधर्म परोपरीने चेतविला आणि भावार्थ रामायणांत राक्षसांविरुद्ध रामाने केलेली विजयशाली मोहीम आवेशपूर्ण शब्दांत वर्णिली ती समाजात तेज, ओज, आत्मश्रद्धा आणि कर्तव्यनिष्ठा निर्माण करण्यासाठीच. समाजपरिवर्तनाच्या कार्याचेच हे एक अभिन्न अंग होते. समाजोन्नतीसाठी निर्माण केलेल्या नाथांच्या साहित्यात दंभाचार, धर्माच्या नावावर बोकाळलेल्या विषमतेवर, स्वार्थांधतेवर आणि अमानुषतेवर नाथांनी कडक टीका केली आहे. कारण धर्माच्या अभ्युत्थनासाठी या सर्व दोषांपासून समाज मुक्त व्हावा अशी त्यांची तळमळ होती.

नाथांच्या काळी शब्दज्ञानी दांभिकांचे प्रस्थ फार वाढले होते. अद्वैतावर पांडित्यपूर्ण प्रवचने करणारी माणसे होती. पण त्यांच्यात वासना व विकार यांचेच प्राबल्य होते. अशा वाचाळांपासून नाथांनी समाजाला सावध केले. स्वधर्मच्युत ब्राह्मणांवर तर त्यांच्या टीकेचा रोख विशेष आहे. नाथांची पुढील काही वचने पाहा -

*सांगता ब्रह्मनिरूपण । सात्विकाचे परमार्थी मन ।*
*व्याख्याता तो वांछी धन । विपरीत ज्ञान निरूपणा ।*

*सांगे आन करी आन । तेथे कैचे ब्रह्मज्ञान ।*
*जेथ वसे धनमान । तेथ आत्मज्ञान असेना ।*
*नाना पद व्युत्पत्तिविंदाच । एके श्लोकी दशधा व्याख्यान ।*
*पोटी असता मानाभिमान । ब्रह्मताप त्या कैचे?*

अशी माणसे तत्कालीन समाजात होती म्हणूनच नाथांना हे लिहावे लागले ना ?

एकनाथ महाराज हे स्वतः 'कर्तेसुधारक' होते. याचा अर्थ असा की तत्कालीन सर्व समाजविघातक प्रवृत्तींच्या विरुद्ध ते ठामपणे उभे राहिले आणि कोणाच्या टीकेची, कुचाळकीची, निंदेची वा आघातांची आणि व्यक्तिगत मानापमानाची चिंता न करता ते विशुद्ध भक्तीने आणि धार्मिकतेने वागत राहिले. त्यांच्या सर्व आचारधर्माचे अधिष्ठान भागवत धर्माची शिकवण व त्याची आत्मानुभूती हेच होते. रडणाऱ्या अंत्यजाच्या मुलाला त्यांनी कळवळ्याने उचलून घेतले. अंत्यज वस्तीत ते भोजनाला गेले. तहानेने तडफडणाऱ्या गाढवाच्या मुखात त्यांनी गंगेची कावड ओतली आदी अनेक कथा प्रसिद्ध आहेत. त्यांचे हे सहज वागणे होते. आपण काही विशेष करतो आहोत, हा भावही त्यांच्या ठायी नव्हता. पण कथा-कीर्तनात ते जे सांगत असत त्याच्याशी त्यांचा हा सगळा व्यवहार सर्वस्वी सुसंगत होता.

ज्ञानेश्वर महाराजांनी प्रवर्तिलेला व नाथांनी अंगीकारलेला भागवत धर्म भेदाभेद मानत नाही. त्या धर्मात महत्त्व आहे ते विशुद्ध भक्तीचे आणि विहित कर्तव्याचा जागरुकपणे निर्वाह करणाऱ्या स्वधर्मप्रवण जीवनाचे. हा मार्ग समता शिकविणारा, सर्व भूतास भगवंत पाहण्याची ज्ञानदृष्टी देणारा आणि ईश्वर शरण होऊन दुःखमुक्त होण्यास प्रेरित करणारा आहे. या धर्मानुसार वागणारा अंत्यज असो की श्रवणच असो, तो सर्वांभूती भगवद्भाव नसणाऱ्या ब्राह्मणापेक्षा श्रेष्ठ होय, असा नाथांचा अभिप्राय आहे. '*ते जरी वर्णांमाजी अग्रणी । तरी पतनी पडतील*' असे नाथांचे शब्द आहेत. यावरून ध्यानात येईल की नाथ कर्ते सुधारक का होऊ शकले. 'सर्वांभूती भगवद्भाव' हा तर भागवत धर्माचा प्राण आहे. या भगवद्भावाचा आधार अद्वैत तत्त्वज्ञान हा आहे. हे अद्वैत दृश्य विविधतेतील आंतरिक एकत्व पाहते. आधी स्वरूपबोध झाला. म्हणजे एकच आत्मतत्त्व सर्व प्राणिमात्रांत व्याप्त आहे हा बोध अनुषंगानेच होतो. अशा प्रकारे सर्वत्र भगवद्भाव निर्माण झाला की जीवनात एक विलक्षण परिवर्तन घडून येते. भागवत धर्मातील समतेचा, करुणेचा, सेवेचा, स्वधर्मनिष्ठेचा आधार उभा होतो. एकनाथ महाराजांनी अध्यात्मज्ञान सांगितले आणि ते ज्ञान जीवनात कसे आविष्कृत व्हावे हेही सांगितले. आचरून दाखविले. संतांच्या सामाजिकतेचे हेच मर्म आहे. स्वार्थ जाईल, विकारांना लगाम बसेल असा विवेक त्यांनी दिला व सदाचाराची ओढ निर्माण केली. याच मार्गाने समाजाचे उत्थान होत असते.

नाथकाली खरे संकट हे होते की यावनी आक्रमणामुळे माणसाला आपल्या परंपरागत धर्मात राहणे आणि त्या धर्माचे पालन करणे अवघड होऊन गेले होते. हजारो सूफी सांप्रदायिकांची लाट दक्षिणेत घुसली होती आणि हिंदूंना परंपरागत आचार-विचारापासून तोडण्याचा सपाटा त्यांनी लावला होता.

*दावल माल्काची पूजीली गदा । वर्णातून फकीर हे एकदा ।*
*मग डोला होता थंडा । स्वाती मलिदा हिन्दू तुर्कांचे खरकाटे ।*

अशा शब्दांत नाथांनी हिंदूंच्या भ्रांत, आत्मविस्मृत अवस्थेचे वर्णन केले आहे.

ज्ञान, सदाचार आणि स्वधर्मनिष्ठा समाजातील तळागाळापर्यंत पोचवून सर्वत्र जागृती निर्माण करण्यासाठी नाथांनी लोकभाषेतील 'भारुड' या प्रकाराचा अत्यंत प्रभावी वापर केला. त्यांत अठरापगड जाती-जमातींतील पात्रे व त्यांच्या देवता त्यांनी आणल्या. हा प्रयोग येवढा यशस्वी झाला की भारुड या काव्य प्रकाराशी नाथांचे नाव कायमचे निगडित होऊन गेले आहे. मुसलमानी आक्रमण, हिंदूंची होत असलेली बाटवा-बाटवी आणि हिंदू समाजाची दयनीय अवस्था यांची वेदना नाथांच्या अंतःकरणात होती. त्यांचे 'हिंदू-तुर्क' संवाद या नावाचे एक प्रकरण प्रसिद्ध आहे या प्रकरणात तत्कालीन परिस्थितीवर प्रकाशझोत आहे आणि बळजबरीने धर्मांतर करणारांना कानपिचक्याही आहेत.

*हिन्दू करिता खुदा चुकला । त्याहून तुमच्या थोर अकला ।*
*हिन्दूस मुसलमान केला । गुन्हा लाविला देवासी ॥*

नाथांनी हा युक्तिवाद केला तरी मूळ समस्या हिंदूंच्या मानसिकतेची आहे याचे विस्मरण मात्र त्यांना कधीही झाले नाही. सत्ता व संपत्तीचा अनावर लोभ, उच्चवर्णियांचा कनिष्ठ वर्णियांशी तुच्छतेचा व्यवहार, सामाजिक विषमता व अंतःकलह यामुळे धर्मांतरे सुलभ होतात व राजकीय पारतंत्र्यही मानगुटीवर बसते हे नाथ जाणत होते. भागवत धर्मातील समतेच्या शिकवणुकीचा त्यांनी उद्घोष आपल्या साहित्यातून केला तो याच सामाजिक दुर्गुणांच्या निर्मूलनासाठी.

संत एकनाथ महाराजांनी समाजात नवी चेतना फुंकण्याच्या उद्देशाने जी विविध रचना केली त्यात त्यांच्या आदिमाया-आदिशक्तीवरील 'बया दार उघड' हे पालुपद असलेल्या विस्तृत भारुडाचा मुद्दाम उल्लेख करावा लागेल. नाथ हे दत्तसंप्रदायी. पण भागवत धर्माला आधारभूत ते झाले आणि पंढरीच्या विठ्ठलाचे नाव त्यांनी गर्जविले, नाथ माहात्म्य गायीले. परंतु या भारुडांत एक गंमत आहे. त्यांनी विठ्ठलालाही त्यात आदिशक्ती रणचंडीच्या, दैत्यसंहारक अंबेच्या रूपात पाहिले आहे.

*पंढरपूर निवासिनी लक्ष्मी । दार उघड बया दार उघड*

अशी आकांताने साद घातली आहे. पुढे श्रीसमर्थांना पंढरीच्या राउळात श्रीराम दिसले, त्याचे स्मरण या निमित्ताने होते. नाथ आणि समर्थ यांची प्रेरणा एकच. ज्यांनी प्रचंड पराक्रमाने मी-मी म्हणणाऱ्या अन्यायी, अत्याचारी, क्रूरकर्मा 'राक्षसां'ना रणांगणात कंठस्नान घातले अशा प्रतापी दैवतांना साद घालून पर्यायाने जनतेस प्रतिकाराची इच्छा आणि विजयाचा विश्वास जागृत करावयाचा. एरवी सौम्य, शांत भासणाऱ्या नाथांची ह्या भारुडातील भाषा पाहा -

*त्वां रणकुंड जबडा पसरिला । आहुती घेती दोनी दळां ।*
*रथ, घोडे, कुंजर तुला । नारळे आर्पियली ॥*

नाथांनी ज्या राक्षसांचा किंवा दैत्यांचा निर्देश केला ते सांप्रतकाली कोण आहेत हे जनतेला कळणे काय अवघड होते? श्रीसमर्थांनीही तुळजाभवानीला उद्देशून

*पूर्वी जे दंडिले होते । तेचि आता कळावले ।*

असे म्हटले नाही का? 'मूळ सामर्थ्य ' दाववी असे आवाहन केले नाही का? पैठण येथील सातवाहन सम्राटांनी शतकानुशतके दक्षिणेतील परकीय आक्रमण रोखून धरले येवढेच नव्हे तर शक, यवन, पल्हव यांना दूरवर पिटाळून लावले या तेजस्वी इतिहासाची पार्श्वभूमी नाथांच्या प्रेरक शब्दांना आहे. नाथांचे 'भावार्थ रामायण' तर अत्याचारी, धर्मद्रोही आणि राष्ट्रद्रोही शासकांविरुद्ध विजयाच्या विश्वासाने झुंजण्याची प्रेरणा देण्यासाठीच लिहिण्यात आले की काय, असा भास होतो. खरोखर डॉ. शं. दा. पेंडसे यांनी म्हटल्याप्रमाणे, 'अत्यंत बिकट आणि विस्कळित परिस्थितीत शांतपणे मराठी जनता, धर्म, आणि संस्कृती संघटीत करून ज्याने सावरली आणि भावी स्वराज्याला पोषक अशी मनोभूमिका ज्याने आयुष्यभर खपून निर्माण केली त्या महापुरुषाचे लोकनरत्व किती वर्णावे?' धर्मसंस्थापनेचे कार्य करणारे राम व कृष्ण हे दोन अवतार आहेत. त्यांची चरित्रे वर्णून नाथांनी धर्माचे वास्तव स्वरूपच मराठी समाजापुढे ठेवले.

*ज्यांचेनि अधर्मभावे क्षिती । सदा आक्रंदत होती ।*
*दुष्ट दैत्य आणि दानव । धराभार राजे सर्व ।*
*वधिता झाला श्रीकृष्णदेव ।*
*निधडे यादव मेळवूनि जात । दैत्य निर्दाळा श्रीकृष्णे केले ।*

अशा स्वरूपात कृष्णावताराचे प्रयोजन नाथांनी समाजापुढे ठेवले आहे.

या कार्याला गीतेतील तत्त्वज्ञानाची बैठक आहे. नाथभागवत वाचत असताना त्या तत्त्वज्ञानाची किती परोपरीने उकल नाथांनी केली आहे आणि भागवत व गीता यांचा कालोचित समन्वय साधला आहे हे सतत जाणवते. प्रवृत्ती आणि निवृत्ती यांचाच विरोगी व जयिष्णु समाजधारणेला पोषक असा हा समन्वय होता, यात शंका नाही. प्रवृत्तीतील निवृत्ती, प्रपंचातील परमार्थ, कर्मातील अकर्म हे या समन्वयाचे वैशिष्ट्य म्हणून सांगता येईल. समाजपुरुष उभा करावयाचा तर त्याची सारीच अंगोपांगे महत्त्वाची. कोणीही उपेक्षणीय नाही. ब्रह्मवृंदांच्या अहंतेमुळे ज्या सामान्यजनांत न्यूनगंड निर्माण झाला होता व ज्या समाजाची अंगे दीनवाणी बनून गेली होती, त्या सर्वांपर्यंत परमार्थबोध नाथांनी महत्प्रयासाने नेला व त्यांना आत्मभान आणले. एक प्रकारे जनाबाईने 'लेकुरवाळ्या विठूला' ज्या स्वरूपात पाहिले, ते स्वरूप व्यवहारतः सिद्ध करण्याचा प्रयत्न नाथांनी आपल्या जीवनातून आणि लेखनातून केला. जनाबाईने वर्णिलेले लेकुरवाळ्या विठ्ठलाचे रूप

*निवृत्ती हा खांद्यावरी । सोपानाचा हात धरी ।*
*पुढे चाले ज्ञानेश्वर । मागे मुक्ताई सुंदर ।*
*गोरा कुंभार मांडियेवरी । चोखा जीवा बरोबरी ।*
*बंका कडियेवरी । नामा करांगुळी धरी ।*
*जनी म्हणे गोपाळा । करी भक्तांचा सोहळा ॥*

असे आहे. ही भक्तीची साऱ्यांना एकत्र आणणारी किमया आहे. विठ्ठलाला चोखा-बंका यांचा 'विटाळ' नाही. गोरा कुंभार व नामदेव त्याच्याबरोबर आहेत. हाच एकरसतेचा आदर्श नाथांनीही पुष्ट केला. त्यांच्या जिवाला भेदभावाचा, उच्चनीचत्वाच्या भावनेचा स्पर्शच कधी होऊ शकला नाही. सर्वांठायी एक भगवंतच त्यांनी पाहिला.

आपल्याला भारताच्या हजारो वर्षांच्या इतिहासात असे दिसते की आत्मज्ञानी, प्रात्यर्थ, संत महात्मे दया, क्षमा, शांती, करुणा जनीजनार्दन या सत्याच्या प्रचीतीने येणारा समत्वभाव, निरहंकारिता आणि विनम्रपणा आदि गुणांनी अलंकृत होऊन लोककल्याणार्थ जीवन वेचतात. 'उरलो उपकारापुरता' हीच अध्यात्मज्ञानाची सहज परिणती होऊन जाते. साऱ्यांनी एकाच स्वरूपाचे काम केले नसेल, पण ते 'सर्वभूतहितेरत' होतात हे निस्संशय. ज्या काळात माणूस वावरतो, त्या काळाचा संदर्भ त्यांच्या जीवनकार्याला प्राप्त होतो. एकनाथ महाराजांनी देश आणि धर्म यावरील दारुण संकटाची यथातथ्य जाण घेऊन समाजाच्या सर्व थरांना विशुद्ध भावजागरण व्हावे आणि कृतिशीलता यावी म्हणून आपला स्वतःचा आदर्श समाजापुढे ठेवून प्रयत्न केले. त्यांची परिपूर्ती करण्यासाठीच रामदास-तुकाराम या थोर समकालीन संतांचे अवतारकार्य घडले. यात परस्परपूरकता होती. कुठे विरोध नव्हता. आज आपण ज्याला 'समाजसेवा' म्हणतो (अनाथालय, शाळा, दवाखाने काढणे वगैरे) त्या स्वरूपाचे कार्य त्यांनी केले नसेल, पण उदात्त प्रेरणा त्यांनी जागविल्या व परिणामतः स्वार्थाच्या संकुचित परिघाबाहेर पडून देश-धर्मासाठी जीवन ओवाळून टाकणारी माणसे मोठ्या संख्येने समर्थ नेतृत्वामागे उभी ठाकली. त्यांनी जाणले होते की, पारतंत्र्य आणि अधःपतन हा चारित्रिक सद्गुणांच्या ऱ्हासाचा परिणाम असतो. म्हणून आध्यात्मिक अधिष्ठानावर व्यक्तिगत व सामाजिक सद्गुणसंवर्धन आणि अवगुण निर्मूलन करण्याच्या मूलगामी कार्याकडे ते वळले. मला वाटते की या संतकार्याचा, संतबोधाचे लोण समाजात सर्वत्र प्रसृत करण्याची आजही सामाजिक व राष्ट्रीय पुनरुत्थानाच्या कार्याला अत्यंत आवश्यकता आहे. त्याविना राजकारण आणि समाजकारण यांचे शुद्धीकरण होणार नाही आणि भौतिक दृष्ट्या जी प्रगती व्हावयास हवी आहे तीही होणार नाही.

श्री. चं. प. भिशीकर
९१७/१९ गणेशवाडी, पुणे ४११ ००४.



# एकनाथी भागवत

**सौ. जयश्री गोडसे**

एम.ए. मराठी, क्लासेसमधून सातवीपर्यंत संपूर्ण विषय शिकविले आहेत. श्री. के. वि. बेलसरे यांच्या पुस्तकांवर संशोधन करण्याचा मानस.

## एकनाथी भागवत व त्याचे स्वरूप

भागवत पुराणाच्या एकादश स्कंधावर एकनाथांनी मराठी ओवीबद्ध टीका लिहिली व पुढे ती एकनाथी भागवत या नावाने प्रसिद्ध झाली. हा ग्रंथ म्हणजे नाथांच्या वाङ्मय रत्नमालेतला मेरुमणीच होय. तो सागराप्रमाणे विशाल, गंभीर व रत्नगर्भ आहे. या ग्रंथाची ओवीसंख्या १८,८४६ इतकी आहे. पैठण येथे या ग्रंथाचे लेखन सुरू होऊन पहिले पाच अध्याय लिहिले गेले. पुढचा सर्व ग्रंथ काशी येथे लिहिला गेला.

एकनाथी भागवताचे स्थान भारतीय भक्तिसाधनेच्या समग्र इतिहासात अनन्यसाधारण ठरते. युगसापेक्ष तत्त्वज्ञानदर्शन कालोचित मार्गदर्शन आणि सम्यक युगप्रवर्तन या सर्व दृष्टींनी श्रीएकनाथी भागवत उत्तुंग हिमशिखराप्रमाणे महाराष्ट्र सारस्वतात अभिमानास्पद ठरले आहे.

*एका आला ब्रह्मरस । हाचि भागवताचा कळस ॥*

अशा शब्दांत तुकाराम महाराजांनी नाथभागवताचे गौरवस्तवन मांडले. ''मुक्तीवरील गुरुभक्तीच्या'' अनुसंधानात लोकोद्धाराचा महान आदर्श उभा केला आहे. मूळ एकादश स्कंधातील कथान्तर्गत पानांच्या अंतरंगात शिरून नाथांनी नामभक्तीचे रहस्योद्घाटन केले आहे. ते स्वतः 'ज्ञानाचा एका' असल्याने त्यांचा हा भाष्यग्रंथ भारवत्ता, अर्थवत्ता व गुणवत्ता या सर्व दृष्टींनी महत्त्वाचा ठरला आहे. ज्ञानेश्वरातील विराट करुणाच एकनाथी भागवताच्या रूपाने पुनःश्च प्रकट झाली आहे.

मूळ भागवताप्रमाणे हेही भागवत भक्तिप्रधान आहे.

नाथांचा हा सर्वात महत्त्वाचा ग्रंथ आहे. ह्या ग्रंथामध्ये गुरुभक्तीमहिमा आवर्जून सांगितला आहे. त्यांनी कृष्ण आणि उद्धव या गुरु-शिष्यांच्या एकान्तातला मंत्रोपदेश सांगितला आहे. या ग्रंथाची त्या काळी खूप ख्याती झाली. तुकाराम महाराजांनी तर या ग्रंथाची पारायणे केली.

ल. रा. पांगारकर म्हणतात त्याप्रमाणे - ज्ञानेश्वरीचे यथार्थ आकलन होण्यास नाथ भागवत अवश्य वाचावयास पाहिजे. दोन्ही ग्रंथ मिळून एकच ग्रंथ आहे. इतकी यामध्ये साम्यता आहे. 'ज्ञानाचा एका' ही उक्ती या ग्रंथाने सार्थ केली.

हा सर्व ग्रंथ टीकात्मकच आहे. ग्रंथाचे मंगलाचरण नाथांनी २०२ ओव्या लिहून पूर्ण केले आहे. कवित्वापेक्षा भागवताचा अर्थ सुगम करून सांगण्याकडे नाथांनी अधिक लक्ष पुरविले आहे.

## ॥ सांप्रदायिक महत्त्व ॥

वेदांतासारखे गहन विषय सोपा करून सांगणारी शैली नाथांनी आत्मसात केली आहे. ती शैली भागवतात आली आहे.

कलियुगात अधर्माचरणी राजे फार झाले. त्यांना धर्म व नीतीची चाड राहिली नाही. हा अनर्थ भगवंतास सहन होईना म्हणून पूर्वी धर्मरक्षणार्थ भगवंतांनी वेगवेगळे अवतार घेतले. त्याप्रमाणे या युगात भगवंतांनी विठ्ठल रूपाने अवतार घेतला. भगवंताच्या अवताराच्या योगाने प्रकट होणारा धर्म म्हणजे भागवत धर्म होय. या भागवत धर्मात स्वधर्म व स्वकर्म यांचे ऐक्य साधलेले आहे. एकनाथी भागवत हा वारकऱ्यांच्या 'प्रस्थानत्रयीत' मोडतो. ज्ञानेश्वरीइतकेच या ग्रंथाला सांप्रदायिक महत्त्व प्राप्त झालेले आहे. ज्ञानेश्वरीचा दुसरा अवतार एकनाथी भागवत आहे. नाथांनी भाविकजनांना सोप्या शब्दांत वेदांत समजावून दिला आहे.

## ॥ एकनाथी भागवताची रचना ॥

या ग्रंथाचे एकूण ३१ अध्याय आहेत. याची विषय विभागणी पाहता त्यात चार गट दिसून येतात. अध्याय पहिला वैराग्योपादनार्थ आला आहे.

*तेथ प्रथमाध्यायी अनुक्रमा । वैराग्य उत्पत्तीचा संभ्रम ॥*
*कुलक्षयासी पुरुषोत्तम । करी उपक्रम ब्रह्मशापे ॥*

अध्याय २ ते ५ मध्ये संवादरूपाने परमतत्त्व निरुपण मांडले आहे. अध्याय ६ ते २९ मध्ये श्रीकृष्ण-उद्धव संवादरूपाने आत्मज्ञानोपदेश मांडला आहे.

*महायोग्याचे योग भांडार । परमज्ञाने ज्ञान-गंभीर ॥*
*निजसुखाचे सुखसार । केवळ चिन्मात्र अठ्ठाविसावा ॥*
*एकादशाचा निजकळसु । भक्तिप्रेमाचे अतिविलासू ॥*
*एकोणतिसावा सुरस ससु । ज्ञानोपदेश भक्तियुक्त ॥*

अध्याय ३० ते ३१ - शेवटच्या दोन अध्यायात ब्रह्मशापाने कुळनिर्दाळण घडण्याचा कथाभाग आहे. भागवताची संपूर्ण विभागणी पूर्वार्ध व उत्तरार्ध ह्या दोन भागांत केली आहे.

अध्याय १ ते १५ पूर्वार्ध व अध्याय १६ ते ३१ उत्तरार्ध होय. या पूर्वार्ध व उत्तरार्धाच्या मध्यावर म्हणजे १६ व्या अध्यायात नाथांनी ३१ अध्यायांची अवतरणिका सादर केली आहे. त्या अवतरणिकेत त्यांनी प्रत्येक अध्यायात आलेला विषय सूत्ररूपाने निर्देशिला आहे.

## ॥ एकनाथी भागवताची अपूर्वता ॥

हा ग्रंथ म्हणजे आध्यात्मिक विचारांचा मराठीतील एक ज्ञानकोश आहे असे म्हणता येईल. ''मानस जाणिजे बोले'' ह्या उक्तीप्रमाणे नाथांच्या पवित्र हृदयातील अनेक दालने या ग्रंथाच्याद्वारे परमार्थी साधकांकरिता खुली झाली आहेत. प्रपंच व परमार्थ या कोणत्याही

भूमिकेवर आरूढ झालेला पुरुष असो त्यास या ग्रंथरूपी आदर्शात आपले प्रतिबिंब मूर्तरूपाने दिसेल, असे या ग्रंथाचे वेगळे वैशिष्ट्य जाणवते. ज्ञानेश्वरीप्रमाणे शांतरस हा या ग्रंथातील प्रमुख रस आहे. या ग्रंथाचा मुख्य भर अध्यात्मावर आहे. त्यांच्या काव्यात अनुप्रास श्लेषादि शब्द व अर्थालंकार जागोजागी विखुरलेले दिसतात.

या ग्रंथाच्या अपूर्वतेचे आणखी एक महत्त्वाचे कारण म्हणजे त्या ग्रंथाचा अलौकिक व आदरणीय इतिहास आहे. काशीसारख्या महान क्षेत्रात या ग्रंथाचा फार मोठा सन्मान झाला आहे. तसेच या ग्रंथाचा आणखी एक विशेष म्हणजे ज्ञान, कर्म, भक्ति, विवेक, वैराग्य, योग, तप इत्यादी साधनांचे स्वतंत्र महत्त्व प्रतिपादलेले आहे. ते असूनही त्यांचा परस्पर एकवाक्यतेचा संबंध दिसून येतो. तसेच आत्मज्ञानाचे महत्त्व सर्वत्र दिसून येते.

**॥ वैशिष्ट्यपूर्ण मंगलाचरणे ॥**

प्रत्येक अध्यायाच्या आरंभी मंगलाचरणे आहेत. प्रत्येक मंगलाचरणात मागील अध्यायाचे महत्त्व सांगून तो पुढच्या अध्यायास जोडला आहे. एकनाथी भागवताची पहिली ओवी श्री गुरुवंदनाने पावन झाली आहे.

*ॐ नमो श्री जनार्दना । नाही भवअभव भावना ।*
*न देखोनि मी तू पणा । नमन श्री चरणा सद्गुरुराया ॥*

ज्ञानेश्वरांनी मंगलाचरणात आत्मरूपी ओंकाराला नमन केले आहे. प्रणाम केला आहे. पण एकनाथांनी मात्र आपल्या गुरुविषयी आदर व्यक्त केला आहे. यामध्ये जवळ-जवळ १४० ओव्या सरस्वती, संतसज्जन, कुलदैवत, संस्कृत कवी यांचेवर आहेत. ग्रंथारंभी मंगलाचरण असावे असा रूढ संकेत आहे. ते सर्व रूपकात्मक आहे.

प्रत्येक अध्यायाच्या मंगलाचरणात काहीतरी वेगळेपण दिसते. तिसऱ्या अध्यायाच्या मंगलाचरणात एकनाथ *'ॐ नमोजी गुरुराया । म्हणूनी सद्भावे लागे पाया ॥ '* अशी सुरुवात करून गुरुचे व देवाचे चरण कसे भवतारक आहेत त्याचे वर्णन करतात.

चवथ्या अध्यायाच्या मंगलाचरणात विशेष प्रतीती येते ती त्यांच्या ठिकाणी असलेल्या उच्च कोटीच्या तत्त्वज्ञानाची. ग्रंथ कर्तृत्वाच्या अनुषंगाने आपले व गुरुमाऊलीचे एकत्व वर्णन करण्यात नाथांना मोठा आनंद होतो आहे. नाथांच्या मनात सद्गुरु व देव हे एकरूपच आहेत. सहाव्या अध्यायाच्या मंगलाचरणात 'जनार्दन' ह्या नावाची नाथांनी चांगली फोड केली आहे.

*लिंग देहाचे मर्दन । तोचि जनाचे अर्दन ॥* असे ते म्हणतात. आठव्या अध्यायाच्या मंगलाचरणात सद्गुरुला 'घटित' पाहणारा ज्योतिषी म्हटले आहे. हा ज्योतिषी नुसते घटित पाहून थांबत नाही, तर चैतन्यरूपी जीवाचे ब्रह्माशी लग्न लावून देतो. इथे नाथ अद्वैत प्रतिपादक विवेचन करताना दिसतात.

नवव्या अध्यायाच्या मंगलाचरणात सद्गुरुचे ठिकाणी इंद्राची अमरपतीची उपमा दिली आहे. एकापेक्षा एक सरस कल्पना करून इंद्रादी देवतांची व त्यांच्या ऐश्वर्याची तुलना करून दाखविली आहे. ते स्वतः या रूपक योजनेत रंगून जातात. गुरुकृपा हीच कामधेनू, श्रद्धा हेच तिचे वासरू अशी रूपके दिसतात.

दहाव्या अध्यायात उपमा उत्तम वैद्याची - धन्वंतरीची आहे. भवरोगाच्या भ्रमाने जन भ्रमले आहेत. त्यांची ज्ञानशक्ती क्षीण झाली आहे. वारंवार विषयाचे पाणी मागत आहेत. त्या जनतेची 'गोड परमार्थ झाला कडू' अशी स्थिती झाली आहे. यावरती एकनाथ औषध आणि पथ्य सांगतात.

अकराव्या अध्यायाच्या मंगलाचरणात नाथ सद्गुरुला सत्चित्घन असे म्हणतात. गुरूचे आनंदघन स्वरूपाचे वर्णन सहजसोप्या भाषेत करतात. बाराव्या अध्यायात गुरुला नाविन्यपूर्ण वसंत ऋतुची उपमा दिली आहे. प्रत्येक ओवी प्रसाद व माधुर्य यांनी नटलेली आहे. ओव्या अनुप्रासयुक्त आहेत.

*वसंत उल्हास तरुवरा । उनेनी लागल्या स्वानंदधारा ॥*

चौदाव्या अध्यायातील मंगलाचरण विशेष महत्त्वाचे आहे. येथे गुरूला 'क्षीरसागर' कल्पिले आहे. त्यातून ज्ञानरूपी चंद्राचा उदय होतो. अविद्येचा अंधार नाहीसा होतो. हे सांगून सागरमंथनावर त्यांनी चांगले रूपक लिहिले आहे. त्यातून ज्ञानरुपी चंद्राचा उदय होतो. अविद्येचा अंधार नाहीसा होतो. रूपके लिहिण्यात एकनाथांचा हातखंडा होता. केवळ जनार्दन स्वामींच्याच कृपेने मला भागवत लिहिण्याची स्फूर्ती मिळाली, असे ते आपल्या मंगलाचरणात म्हणतात. भागवत हे 'शुकमुनींचे श्रेष्ठ फळ आहे. त्याला साल नाही. कोय नाही. हे नुसते माधुर्यच अंतर्बाह्य ओसंडून राहिले आहे.'

सोळाव्या अध्यायाच्या मंगलाचरणात *''माझे मराठी आरीख बोल । सद्गुरुंनी केले सखोल ॥''* ही प्रसिद्ध ओवी आली आहे. ह्या अध्यायात त्यांनी पूर्वार्धातील १५ अध्यायाच्या विषयांचे सूत्र सांगितले आहे आणि पुढील १५ अध्यायांचे सार सांगितले आहे. एकनाथांनी अकराव्या स्कंधावर जवळ-जवळ १५ हजार ओव्यांची अतिविशाल टीका लिहिली आहे. या संख्यात्मक बृहदाकारातून नाथांच्या व्यासप्रतिभेचे आपणास दर्शन घडते.

**॥ एकादश स्कंधावरील टीकेचे प्रयोजन ॥**

एकादश स्कंधावरील टीकेचे प्रयोजन स्पष्ट करताना सुरुवातीला एकनाथ म्हणतात :

*एकादशाच्या तात्पर्यार्थी । संक्षेप विस्तरे-मुक्ती*
*बोललीसे आद्यंती । परमात्मास्थिती निजबोधे ॥*

मुक्तीचा म्हणजे परमात्मस्थितीचा निजबोध करून देताना कथारूपाने गुरु-शिष्यांच्या जोड्या नाथांनी उभ्या केल्या 'मुक्ती आणि मुक्तीवरील गुरुभक्ती' नाथांनी आपल्या विषयोपन्यासात स्पष्ट मांडले आहे. अशामध्ये स्वकाळाचे भान असल्यामुळे भागवताचे युगसापेक्ष प्रयोजन लक्षणीय ठरते. त्यांच्या विषयांमध्ये त्यांच्या काळात घडत असलेले सर्व करुण विषय नाथांनी आपल्या डोळ्यांसमोर ठेवून लिखाण केले आहे. त्यामध्ये 'पतिव्रतेचे वस्त्रहरण' ही घटना मांडताना ते लिहितात :

*पतिव्रतेचे वस्त्रहरण । तेणे तत्काळ पावे मरण ।।*
*हेचि कलहाचे कारण । कुळनिर्दळण येणे कर्मे ।।*

पारतंत्र्याच्या काळातील लूटालूट, स्त्री-संरक्षण, जाळपोळ, कत्तल हे सर्व जाणून देण्यासाठी ते लिहितात :

*द्रौपदी वस्त्रहरण पाहा हो । हा मुख्य अन्यायो कौरवा ।।*

नंतर त्यांनी साधु-संतांच्या सन्मान प्रतिष्ठेची थोरवी आवर्जून सांगितली. परचक्रभयांकित यवनक्रांत 'कठीण काळ युगधर्म' असलेल्या काळात संतांचा व संतमांदियाळीचा अपरंपार महिमा त्यांनी प्रकर्षाने वर्णिला आहे. आदर्श समाजशिक्षक असलेल्या नाथांच्या भागवत प्रयोजनाची दिशा समाजहितैषी द्रष्टेपणातून कशी अवतरली आहे याचे प्रत्यंतर इथे दिसते.

*धरा तळी ब्रह्म ब्राह्मण । त्यांचे वचन प्रमाण ।*
*हे सत्य करावया श्रीकृष्ण । कुळ निर्दळण स्वये दावी ।।*

तसेच एकनाथी भागवतात भगवान श्रीकृष्णाचे सद्गुरु पातळीवरून उपरोक्त दर्शन घडते. त्याबरोबरच एकनाथांचेही दर्शन घडते. ॐकाररूप सद्गुरुशी एकाकार झालेल्या नाथांचे दर्शन मुक्तीवरील गुरुभक्तीचे श्रीकृष्ण परमपदवी प्राप्त झालेल्या शांती ब्रह्माचेच साक्षात दर्शन होय. तसेच कलियुगात काय पण चारही युगात नाथांच्या गृहस्थश्रमाला तोड नाही. नाथांची कुलदेवता रेणुकामाता असून ती शक्तिपितीस्वरुपिणी आहे. नाथांचा वंश भगवंतप्रिय आहे. गायत्री मंत्रासाठी प्रतिसृष्टी निर्माण करणारे विश्वामित्र हे त्यांचे गोत्रऋषी आहेत. त्यांचे घराणे सूर्योपासक आहे. नाथांचे पंढरीप्रेम हे त्यांच्या भावजीवनातील स्वतंत्र दालन आहे. पंढरीचा पांडुरंग, भीमानदी, भक्तराज पुंडलिक या सर्वांविषयी त्यांना माहेरचा अपार जिव्हाळा आहे. सारांश असा की, गृहस्थाश्रमी नाथांचे दर्शन नाथ भागवतात आद्यंती व्यापून राहिलेले दिसते.

**॥ नाथांचा कर्मयोग ॥**

कर्मयोग हे नाथांच्या उपदेशाचे सारसर्वस्व आहे. कर्म मोक्षप्रद आहे एवढीच नाथांची भूमिका नसून कर्म ब्रह्मस्वरूप आहे असा त्यांचा सिद्धांत आहे. 'कर्म करीत करीत शंभर वर्षे जगावे व अनासक्तीने जीवनातील सुख-दुःखांचा उपभोग घ्यावा. यासारखा दुसरा कोणताच मार्ग प्रशस्त नाही', असे विचार उपनिषदात आढळतात. परंतु याची प्रतिक्रिया म्हणून पुढे कर्मसंन्यास किंवा कर्मत्याग सुरू झाला. कर्मसंन्यास हेच ज्ञानी माणसाची खरी निष्ठा होय. या भूमिकेस महत्त्व आहे. परंतु पुढे भगवद्गीतेत मात्र निष्काम कर्मयोगाचा भगवंतांनी आग्रह धरला आहे. त्यानंतर कर्मयोगाचे पुनरुज्जीवन भागवताने भक्तिस प्राधान्य देऊन केले आहे. ईश्वरार्पणपूर्वक कर्माने ज्ञानाची व भगवंताची प्राप्ती होते, असा निर्वाळा दिला आहे. यालाच नाथ 'स्वधर्म' या नावाने संबोधतात. स्वधर्माचे अधिष्ठान कर्मास असणे आवश्यक आहे. भक्तीची आणि कर्मयोगाची सांगड गीता आणि भागवत या दोन्ही ग्रंथात घालण्यात आली आहे. नाथांनी एक उपदेश भागवतात सांगितला तो असा की कर्मानेच कर्मबंधातून मुक्तता मिळवायची असते. कर्मत्यागाने नव्हे. फक्त ते कर्म निष्काम असावे. "कर्म करवी ब्रह्मार्पण" कर्मानेच भक्ती घडते व भक्तीने कर्मबंधनातून मुक्तताही लाभते.

**॥ एकादश स्कंधाचे महत्त्व ॥**

सर्व विवेचनावरून एकादश स्कंधामध्ये सर्वत्र प्रामुख्याने भक्तीयोगाचेच विवेचन दिसते. भारतीय भगवद्गीतेतील भक्तियोगाचा भागवतीय भगवद्गीतेमध्ये असलेला विस्तार म्हणजेच एकादश स्कंध होय व हेच एकादश स्कंधाचे महत्त्व आहे.


सौ. जयश्री गोडसे
८२६ सदाशिव पेठ, अन्नपूर्णा अपार्टमेंट,
पुणे ४११ ०३०.


---

## एकनाथी भागवत

*एकनाथांच्या भागवताचा स्वाद मुखे चाखिला*
*नाथकृपेने हृदयविणेवर सूर नवा मज सापडला.*
*कंस-कालिया जर्जर केले*
*गोपगोपिना खेळ दाविले*
*सांदिपनींचा शिष्य खरोखर योगेश्वर जाहला.*
*द्वारकापुरी स्वये उभविली*
*स्वकरे हरिने पुन्हा बुडविली*
*अलिप्ततेचा श्रीरंगाने दिव्य मार्ग सुचिवला.*
*व्याधबाण कृष्णास लागला*
*क्षमा करुनि त्या स्वर्गी धाडिला*
*परोपकारी तो मधुसूदन, निजधामा गेला.*
*कृष्णाने उद्धवास कथिले*
*गुरुभक्तीने नाथ बोलिले*
*भगवंताच्या समचित्ताचा अर्थ खरा उमगला.*
*नाथकृपेने हृदयविणेवर सूर नवा मज सापडला.*
*रचनाकाल फाल्गुनवद्य षष्ठी*
*(नाथषष्ठी १९७६)*


**सौ. सुखदा ऋषी**
क-३, 'शाद्वल', चंद्रिका गृहरचना,
६८६/१ब, बिबवेवाडी मार्ग, पुणे - ३७.

# नाथांच्या चतुःश्लोकी भागवतातील भक्तिवर्म

प्रा. डॉ. नरेंद्र कुंटे

एम्.ए.पीएच.डी. मराठी विभागप्रमुख, दयानंद कॉलेज सोलापूर. गेली २६ वर्षे अध्यापन. ८ वर्षे सोलापूर संचार व समाचारमध्ये सहसंपादक. आध्यात्म विषयावर विपूल लेखन. १० पुस्तके प्रसिद्ध झाली. संतकृपा, सज्जनगड, प्रसाद इ. मासिकांत लेखन, व्याख्यान व प्रवचन. अनेक ठिकाणी १९७८ पासून श्रीस्वामी समर्थ अक्कलकोट महाराज यांचे वार्षिक पुण्यतिथीचे संयोजन. निबर्गी संप्रदायाचे श्रीगुरुदेव रानडे यांचेकडून अनुग्रह.

शांतिब्रह्म श्रीसंत एकनाथमहाराज यांनी चतुःश्लोकी भागवतात भगवंताने ब्रह्मदेवास केलेला हितोपदेश सूत्रस्वरूपात प्रकट केला आहे. त्यात 'तप करा, तप करा... तरच अनुभवरूप सृष्टीचे दर्शन होईल,' असा भक्तिसिद्धांत सांगितला आहे. नाथभागवत हा चतुःश्लोकी भागवताचाच विस्तार असून तिथेही 'साधक व्हा.. भक्तिनौकेत बसा... गुरु हाच भक्तिनौकेचा कर्णधार आहे... भजन, कीर्तन, नामस्मरण ही साधना आहे... त्यायोगे ईश्वरदर्शन होऊन सुख, आनंद, शांती लाभेल. कलियुगातली दुःखमुक्ती ही यापेक्षा वेगळी नाही, हे नाथांनी विशद केले आहे. इथे चतुःश्लोकी भागवतातील भक्तिवर्म उलगडून दाखविण्याचा विनम्र प्रयत्न केला आहे. तो उपकारक ठरावा.''

श्रीएकनाथमहाराज यांनी विपुल भक्तीरचना केली असून त्यांचे मुख्य ग्रंथ म्हणजे १) चतुःश्लोकी भागवत, २) एकादशस्कंधावरील टीका (नाथभागवत), ३) रुक्मिणीस्वयंवर, ४) भावार्थ रामायण. या सर्व ग्रंथांतून भक्तिमार्गाने देव कसा मिळवावा? याचाच विचार त्यांनी प्राधान्याने मांडला असून त्याला 'भक्तिशास्त्र' असेही म्हणता येईल. इथे मात्र 'चतुःश्लोकी भागवतातील भक्तिशास्त्र' पाहावयाचे असल्याने त्याचेच विवरण अधिकतः केले आहे.

**पूर्वपीठीका आणि ग्रंथस्वरूप...**

वेद, उपनिषदे, गीता हीच प्रस्थानत्रयी श्रीएकनाथांच्याही वाङ्मयाची मूलाधार आहे. 'चतुश्लोकी भागवत' ही नाथांची पहिली रचना. व्यासमहर्षीकृत भागवत पुराणाच्या द्वितीयस्कंधातील, नवव्या अध्यायातील, श्लोक ३२ ते ३५ श्लोकावरील भाष्य मराठीतून श्रीनाथांनी १०३६ ओव्या लिहून केले आहे. भगवंत / नारायण : ईश्वर /... हा सृष्टी निर्माण होण्यापूर्वीही होता, हे त्यांत सांगितले असून त्याला प्राप्त करून घेण्याचा साधनमार्ग कोणता? याविषयी भगवंताने ब्रह्मदेवास केलेला उपदेश त्यात पाहावयास मिळतो. भगवंत / नारायण / विष्णू.... एक. त्यांच्याच बेंबीतून उत्पन्न झालेला त्यांचा पुत्र म्हणजे ब्रह्मदेव. यास भगवंताने चार श्लोकांत भक्तिवर्म सांगितले, म्हणून ग्रंथास 'चतुःश्लोकी भागवत' म्हटले गेले आहे. या ग्रंथात श्रीनाथांनी श्लोक ३० आणि ३१ मध्ये गुह्यज्ञान सांगण्याचा 'प्रस्ताव' केला आहे. ३२ ते ३५ या चार श्लोकांत भक्तिवर्म सांगितले आहे. ३६ वा श्लोक उपसंहार म्हणून येतो. हे गुह्यज्ञान गुरु-शिष्य परंपरेनुसार पुढीलप्रमाणे दिले गेले आहे. भगवंताने ब्रह्मदेवास... ब्रह्मदेवाने नारदास... नारदाने व्यासास... व्यासाने शुक मुनीस... शुकमुनीने परीक्षीत राजास... हे ज्ञान दिले. श्रीनाथांनी 'चतुःश्लोकीभागवत' ग्रंथ लिहून हे गुह्यज्ञान १०३६ ओव्यांतून सर्वांसाठी खुले केले. पुढे भागवताच्या एकादशस्कंधावर टीका लिहिताना श्रीनाथांनी १८,००० ओव्यांचा ग्रंथ लिहिला. भक्तिवर्म उलगडून दाखविले. तोच 'नाथ भागवत' म्हणूनही ओळखला जातो. त्यात श्रीकृष्ण-उद्धव संवादातून भक्तिशास्त्र सविस्तरपणाने विवरून सांगितले गेले आहे. म्हणून 'चतुःश्लोकीभागवत' व 'नाथभागवत' यांचा बीजवृक्षन्यायाने अन्योन्यसंबंध आहे. थोड्या वेगळ्या परिभाषेत बोलायचे तर ज्ञानेश्वरी आणि हरिपाठ किंवा दासबोध आणि मनाचे श्लोक यांचा संबंध जसा आहे, तसाच तो नाथभागवत-चतुःश्लोकीभागवत यांचाही आहे. बृहत्ग्रंथात जे विवरले गेले आहे, तेच सूत्ररूपाने छोटेखानी ग्रंथात मांडलेले आहे किंवा उलटपक्षी बीजवृक्षन्यायाने छोटेखानी ग्रंथातील सूत्रेच बृहत्ग्रंथात विवरून सांगण्यात आली आहेत, असे म्हणता येईल.

**सातश्लोकातील तत्त्वसार...**

सृष्टीच्या प्रारंभी आदिदेव म्हणजेच भगवंत / नारायण / विष्णू आणि जगाचा परमगुरु जो ब्रह्मदेव यांच्यात 'सृष्टी कशी उत्पन्न करावी?' याचा विचार सुरू झाला होता. त्या वेळी 'तप कर, तप कर... म्हणजेच तपाचरण कर' असा ध्वनी ब्रह्मदेवाने उदकातून ऐकला. ध्वनीचा वक्ता कोण आहे? हे त्याला दिसले नाही. म्हणून ही आदिनारायणाची आज्ञा आहे असे मानून त्याने कठोर तपश्चर्या केली. त्यावर भगवंत प्रसन्न झाले. त्यांनी ब्रह्मदेवास दर्शन दिले. दिव्य लोक दाखविला. ते भक्तावर अनुग्रह करण्यास उत्सुक होते. त्यांनी आपणच तुला 'तप कर' अशी आज्ञा दिल्याचे सांगितले. 'तप हीच माझी शक्ती. तप म्हणजे साक्षात् मीच. विश्वाची उत्पत्ती, पालन, संहार हा मीच तपाने करतो.' असे सांगून भगवंतांनी ब्रह्मदेवास चार श्लोकांत हे 'परमगुह्यज्ञान' सांगितले. तेच चतुःश्लोकी भागवत होय. त्यांचे तत्त्वसार पाहायचे, तर पुढीलप्रमाणे ते सांगता येईल. 'माझे अत्यंत गुह्यज्ञान मी सांगतो. मला प्राप्त करून घेण्याची साधनेही सांगतो. माझे स्वरूप कसे ? माझी सत्ता केवढी ? हेही सांगतो. सृष्टीपूर्वी मीच होतो. नंतरही जे सर्व आहे, त्यात मीच

सर्वत्र आणि सदैव भरून राहिलो आहे. माझ्या विस्मरणाने भ्रम, अज्ञान, अविद्या निर्माण होऊन माया भासते. मला जाणावे. त्यासाठी भक्ती करावी. तप करा, तप करा तरच सृष्टी निर्माण करता येईल. मुळात सृष्टी आहेच. तू फक्त ती पाहू शकशील हे तुझे भाग्य.' ब्रह्मदेव हा भगवंताचा सहोदर पुत्र. त्यांने प्रश्न विचारला की, सृष्टी कशी निर्माण करू ? त्यावर भगवंताने हा बोध केला. त्यामुळे प्रश्न असा निर्माण होतो की, 'तप कोणते ?' आणि 'सृष्टी म्हणजे काय ?' याचे उत्तर श्रीनाथांच्या चतुःश्लोकी भागवतात मिळते. भक्तिशास्त्र म्हणतात, ते यापेक्षा वेगळे नाही. म्हणूनच त्याचा मागोवा इथे घ्यायचा आहे.

(१) मी सदैव 'सिद्ध' आहे : तो कसा ? तर... उसाची गोडी असावी तसा. मी स्वयंभू. कांडी पेरण्यापूर्वी, रस चाखण्यापूर्वी गोडी सिद्धच आहे.

(२) मी 'सर्वत्र' आहे : तो कसा ? तर... सोने - अलंकार, तंतू-पट, मृतिका-घट, वट-पारंब्या, मी - जग... अशा अन्वयाने.

'तप करा, तप करा... म्हणजे माझी भक्ती करा... ती कशी? तर गुरुस शरण जाऊन, गुरुमंत्र घेऊन, मंत्राचे स्मरण करून... भजन, कीर्तन, नामस्मरण हाच साधनमार्ग होय. त्याद्वारे मला प्राप्त करून घ्यावे.' असा भगवंताने ब्रह्मदेवास बोध केला आहे. श्रीनाथांनी तो विवरून दाखविला आहे.

## पहिल्या ओवीतच 'तत्त्वबोध'...

चतुःश्लोकी भागवताचा प्रारंभच ज्या गुरुस्तवनाच्या ओवीने झाला आहे, त्या ओवीतच तत्त्वबोध पूर्णत्वाने प्रकटला असून पुढे त्याचा विस्तार होत गेला आहे, हे लक्षात येते. श्रीनाथ म्हणतात, *'गुरुचरणप्रतापे पुण्यपापे जळाली। त्रिभुवन समतीर्थे ज्ञानगंगे मिळाली । शुभाशुभ पाहता भावना राम झाली। निशिदिनी गुरुराया उन्मनी झोप आली।'* (ओवी १) दुःखमुक्तीसाठी परमार्थमार्ग हा उपकारक आहे. त्यावरील वाटचालीत आणि त्याच्या प्राप्तव्यात (देवदर्शन) सुख, आनंद, समाधान, शांती भरून राहिलेली आहे. म्हणूनच प्रथम सद्गुरुस शरण जावे. त्याच्याच कृपाशक्तीने पुण्य लाभते. पापे नष्ट होतात. म्हणजेच पुण्यप्राप्तीचा मार्ग हाती येतो. पापबुद्धी नष्ट होऊ लागते. त्रिभुवनातील सर्व तीर्थक्षेत्रांचा संगम ज्ञानरूपी गंगेतच प्राप्त होतो. ही ज्ञानगंगा कोणती? तर गुरुबोध हीच गंगा. मंत्र हेच तिचे पावित्र्य. स्मरण हेच तिचे प्रवाहरूप आणि ईश्वरदर्शन हेच तिच्यातले पुण्यस्नान, पवित्रस्नान, शुद्धस्नान. त्यायोगे मुक्ती मिळते. शुभाशुभ हा भेद ईश्वरदर्शनाशिवाय नष्ट होत नाही. सर्व गोष्टी 'राममय' पाहता येणे ही सोपी बाब नव्हे. पण असे जर अनुभवता आले तर त्यातूनच आत्मानंदाची उन्मनी अवस्था लाभते. ईश्वरदर्शनाच्या समाधीसुखाचा हा सोहळा प्रतिदिनी / प्रतिक्षणी अनुभवता येणे हेच सृष्टीदर्शन होय. सर्वांभूती भगवंत पाहणे आणि मनबुद्धी एकाग्र करून भजन करणे, हा श्रीनाथांच्या शिकवणुकीचा मुख्यार्थ आहे. श्रीनाथांनी या ओवीत प्रस्तावही केला आहे आणि परिपूर्तीही केली आहे. जी माणसे केवळ देहाहंकाराने जगतात ते आपला देह आणि देवाचा... म्हणजे सद्गुरुंचा... देह एकच मानतात. तसे मानणे चुकीचे आहे. जीव आणि जगन्नाथ हे एकच कसे? रत्न आणि गार एकच कशी ? दोन्हीही दगडच मानणे हा मूर्खपणा नव्हे काय ? असे म्हणत म्हणत श्रीनाथांनी पुढे स्पष्टच सांगितले आहे की, *'ऐसेही जे जडमूढ मूर्ख । भावार्थे झाल्या भजनोन्मुख । त्याचे निःशेष झडे दुःख । ते निजात्मसुख पावती देखा ॥'* (ओवी ४४) भजन केल्यास अज्ञानजन उद्धरती हे त्यांचे सूत्रभाष्य होय. गुरुगोष्ट (गुरुमंत्र) ऐकली, तरच चैतन्यसृष्टी (देवदर्शन) दिसते, हा सिद्धांत त्यांनी मांडला आहे. गुरुगोष्ट ऐकायची म्हणजे गुरुस शरण जायचे. कृपामंत्र घ्यायचा. त्या मंत्राचे अहर्निश स्मरण करणे ही साधना होय. तरच तेज, रूप, रस, गंध, नाद, स्पर्श हे अनुभव येतील. तीच चैतन्यसृष्टी होय, हे जाणावे.

## सृष्टी आणि सृष्टीकर्ता

गुरुकृपा दृष्टी आणि अनुभवसृष्टी यांचे एक अन्योन्य नाते आहे. त्यामुळे गुरुभेट होऊन गुरुमंत्र दिला गेला तर ती गुरुने शिष्यावर / साधकावर / भक्तावर केलेली कृपादृष्टी होय. गुरुदृष्टी आणि गुरुकृपादृष्टी यांतही काहीसा भेद आहे. गुरुदृष्टीने श्रीकृष्णाने अर्जुनाला विश्वरूपदर्शन दिले होते. पण अर्जुन भ्याला. त्याला नित्य पाहता येईल असे 'दर्शन' हवे होते, दर्शनाने सुख व आनंद मिळावा ही त्याची इच्छा होती. म्हणून त्याने पुन्हा श्रीकृष्णास ते रूप आवरते घेऊन नेहमीचे सगुणरूप दाखव, असे म्हटले. मग श्रीकृष्णाने त्याचेवर कृपादृष्टी ठेवली. त्यायोगे अर्जुनाने श्रीकृष्णाचे रूप पाहिले. नित्य पाहिले. त्याला सुख झाले. आनंद झाला. 'रघुत्तमरायाची कृपादृष्टी पडली तो देश, ती भूमी पावन होय.' असे श्रीसमर्थ रामदासस्वामींनी म्हटले. ती सृष्टी एक वेगळी. गुरुकृपादृष्टीने साधकाला ईश्वराचे अनुभव येऊ लागतात ती सृष्टी आणखीच वेगळी. दृष्टीने सृष्टी पावन होते, असा एक अनुभव श्रीनिंबरगी महाराजांच्या समाधीस्थापनेच्या संदर्भात श्री. भाऊसाहेब महाराज उमदकीर यांनी स्पष्ट केला आहे. श्री निंबरगी महाराजांची समाधी देवनिंबर्गी इथे होती. तिथल्या पाटलीणीने ती समाधी उध्वस्त केली. तेव्हा श्री. भाऊसाहेब महाराज उमदीकर यांनी तिथलीच एक चिमूटभर माती उचलली व ती इंचगेरी येथे आणून तेथे श्रीनिंबरगी महाराजांची समाधी स्थापन केली. दृष्टी-सृष्टी हा असाही एक अन्वय आहे. आता प्रश्न आहे तो असा की, सृष्टिकर्ता कोण? सृष्टिकर्ता कोणास म्हणावे? त्याविषयीचा एक संदर्भ श्रीभाऊसाहेब महाराज यांच्या आरतीत सापडतो. आरतीकर्त्याने असे म्हटले आहे : अष्टदिक्पालकर ओडयाने । सृष्टीकर्ता... सृष्टीकर्ता हे विशेषण.' श्रीभाऊसाहेब महाराज उमदीकर यांना उद्देशून जोडले गेले आहे. श्रीभाऊसाहेब महाराज उमदकीर यांचे शिष्य व नंतर गुरु पदवीला पोहोचलेले थोर, साक्षात्कारी संत व तत्त्वज्ञ श्री गुरुदेव रानडे यांनी सृष्टीकर्ता हे सद्गुरुंना जोडलेले विशेषण पाहून अत्यंत आनंद व्यक्त केला. आरतीकर्त्याची पाठ थोपटली. आरतीचा समावेश आपल्या नित्यउपासनेत केला. पुढे ते असेही म्हणाले की, सृष्टीकर्ता हा सद्गुरु खरा. पण त्याला नुसते सृष्टीदर्शन (ईश्वरी अनुभव) असून भागणार नाही. त्याला ते अनुभव देण्याची शक्ती (कृपाशक्ती) असली पाहिजे. तर त्याला खरा संत म्हणावा. सृष्टी म्हणजे तेज, रूप, रस, गंध, नाद,

स्पर्श इत्यादी अनुभव साकार होणे होय.

**विवेक हवा, वैराग्य हवे...**

गुरुकृपा दृष्टी प्राप्त करून घेण्यासाठी गुरुदास्य हवे. म्हणजेच सद्गुरुंना शरण गेले पाहिजे. गुरुदास्य कोण करू शकतो? तर गुरुदास्य हे फक्त सभाग्यजन करू शकतात. सभाग्यजन कोण? तर जे नामधारक आहेत ते. म्हणजेच नामप्राप्तीने जे भाग्यवंत झाले आहेत ते. भाग्य हे ईश्वरदर्शन पाहणे हेच आहे. नामप्राप्ती झाली की, भक्तिमार्गावरच्या वाटचालीला प्रारंभ होतो. या वाटचालीत विवेक हवा, वैराग्य हवे. (१) प्रपंच आणि परमार्थ यात शाश्वतसुख कोठे आहे? हे शोधणे, ठरविणे हाच विवेक होय. सारासार वा योग्य विचार म्हणजेच विवेक. (२) वैराग्य म्हणजे परमार्थाकडे वळणे होय. प्रापंचिक मोह विषयावर राग काढून त्यापासून दूर जाणे म्हणजेच वैराग्यशील होणे होय. वैराग्यही हवे आणि विवेकही हवा. श्रीनाथमहाराज सांगतात, *'विवेकाविण वैराग्य आंधळे । वैराग्याविण विवेक पांगुळे । हे एकएका अवेगळे । झाल्याविण न कळे परमार्थ ॥'* (ओवी ७४) माणूस इंद्रिय व्यापारांनी विषयांध असल्यानेच त्याला हृदयस्थ नारायण प्राप्त होत नाही, हेच खरे. (ओवी ८१ चा अर्थ) गुरुस शरण जाऊन 'भावे करावे भगवत्भजन' हाच साधन मार्ग होय. प्रापंचिक आसक्तीतच भ्रम-मोह आहे. तो सोडला तरच परमात्मा भेटेल. भक्तीने जन्म-मरण फेरा चुकतो, असे म्हटले जाते. म्हणजे तरी काय? तर जन्माला आलेला रडतच जन्म घेतो. नवमास उदरी दुःख भोगले म्हणूनही तो रडतोच. जाणारा, मी खूप दुःख भोगले म्हणूनही रडतच जातो. किती दुःख भोगले? हे सांगायला तो परत येत नाही. आलाच तर मरताना वासना राहिली म्हणून पुन्हा जन्म घ्यावा लागला हेच सांगत- रडत तो जन्माला येतो. मग जन्म-मरण हा फेरा चुकतो याचा अर्थ काय? तर, या संदर्भात श्रीभाऊसाहेब महाराज उमदीकर यांचे शिष्य व श्रीगुरुदेव रानडे यांचे गुरुबंधू श्रीअंबुरावमहाराज यांनी या विषयीचा एक अर्थ स्पष्ट करून सांगितला आहे. तो असा की, वासना-इच्छा-आकांक्षा यांचा उद्‌भव म्हणजे जन्म होय. त्या अपूर्ण राहिल्या की, दुःख होते. तेच मरणप्राय दुःख असते. म्हणून त्याच जन्म-मरण फेऱ्यातून खरे तर माणसाला सुटका हवी आहे. भक्तिमार्गाने हा दुःखफेरा कमी होतो... चुकतो. म्हणून भक्तिमार्गाची कांस धरावी, असा उपदेश सर्वच संत-सत्पुरुष यांनी केला आहे. आत्मसाक्षात्कारी संत-सत्पुरुष मात्र या वासना-इच्छा-आकांक्षा यांच्या पलीकडे गेलेले असतात. ते पुन्हा जन्माला आले तरी जगतोद्धारासाठी येतात... देवाचे प्रतिनिधी म्हणून गुरुस्वरूपात येतात.

**निश्चित बुद्धीने तप करा...**

भक्तिमार्गावर वाटचाल करायची असेल तर निश्चित बुद्धीनेच तप केले पाहिजे. ही निश्चित बुद्धी कोणती? तर गुरुने कृपा करून दिलेली नामबुद्धी होय. (ज्ञानेश्वरीत तिचा उल्लेख श्रीज्ञानदेवांनी *'जैसी दीपकलिका धाकुटी । परी बहुतेजाते प्रकटी । तैसी सद्‌बुद्धी हे थोकटी । म्हणू नये'* (अ. २ ओवी २३८) या ओवीत केला आहे. परमात्मा हाच या निश्चित बुद्धीची अवधी होय. श्रीनाथमहाराज सांगतात, 'ब्रह्मदेवही याच निश्चितबुद्धीने निश्चय करून तपाला बसला' (ओवीचा अर्थ : ओवी क्र. ११४) ब्रह्मदेवाने त्यासाठी मन एकाग्र केले. तपासाठी मन आणि बुद्धी हीच एकाग्र करावी लागते. शरीर कुठे जात नाही. शरीर हे मनबुद्धी यांच्याच आधीन असते. 'मनोजय करणे अत्यंत आवश्यक आहे.' (ओवी क्र. ११२ हा अर्थ) हा मनोजय कसा करावा? याविषयी श्रीनाथमहाराजांनी एकनाथी भागवतात एक सुरेख दृष्टांत दिला आहे. तो 'अश्वदृष्टांत' म्हणूनच प्रसिद्ध आहे. ते म्हणतात, (१) गुरुस्वरूपी मन राखावे. २) अनुसंधान न मोडता मनाची इच्छा पुरवावी. मनाला विषयदान दिले नाही तर ते अधिकच प्रक्षुब्ध होते. म्हणून मनाची इच्छा पुरवावी. त्याचे अन्नपाणी समजून पुरवावी. त्याची मर्जी राखून त्याला ताब्यात ठेवावे. थोडी मोकळीक द्यावी, पण पुन्हा त्याला फटकारावे. घोड्याला चुचकारून पाहावे. भले-भले म्हणून पाठ थोपटावी. पण त्याचे पाऊल वाकडे पडले तर त्याला फटकारावे. पुन्हा थोडे सैल सोडावे. पुन्हा फटकारावे. मालक आपल्याला युक्तीने ताब्यात ठेवतो आहे हे घोड्याला समजते. मग लगामाशिवाय तो आपल्या धन्याच्या हुकुमात चालायला लागतो. (नाथभागवत, अ. २० ओव्या २१६ ते २२१) मन चंचल, त्याला लगाम घालून ताब्यात ठेवावे. पुढे ते आपोआपच आपल्या ताब्यात राहते. निश्चितबुद्धीने / नामबुद्धीने तप करताना आसन घालावे. निश्चयपूर्वक तप करावे. आसन म्हणजे निश्चयपूर्वक तप करण्याची सिद्धता : पूर्वतयारी होय. गुरुकृपा असलीच पाहिजे. ती नसेल तर आत्मज्ञानाची प्राप्ती होत नाही. *'तेचि तप माझे वचन । ऐकोनि केले अनुष्ठान । तेणे अनुष्ठाने मी आपण । जाणिजे संपूर्ण संतोषलो ॥'* (ओवी २९९) हे भगवंताचे अभिवचन आहे. तप कसे असावे? तर नित्ययुक्त असावे. ब्रह्मचैतन्य श्रीगोंदवलेकर महाराज म्हणत असत की, 'दगडावर एकदम एकेच दिवशी पाणी ओतून काय उपयोग? पाणी निघून जाते. दगड हा दगडच राहतो. पण रोज थोडे-थोडे पाणी त्यावर ओता. म्हणजे दगडसुद्धा झिजेल. एक दिवस विरघळून जाईल.' *'अस्तित्व निश्चयेपूर्ण । नित्यवाहे अंतःकरण । या नाव जप जाण । शरीर शोषण नव्हे तप ॥'* (ओवी ३१५) उपासतापास म्हणजे तप नव्हे. ज्ञानप्राप्ती हेच तप होय. नामानेच... म्हणजे स्मरणोपासनेनेच... देवदर्शन घडते.

**नित्यतप कसे करावे ?**

नित्यतप कसे करावे? हा अनेक संतांचा मुख्योपदेश आहे. श्रीनाथांनीही नित्यजप करा, हा आग्रह धरला आहे. मूळ चतुःश्लोकी भागवतात भगवंताने ब्रह्मदेवाला 'तप करा, तप करा' असे जे म्हटले त्यांत तप करण्याविषयी द्विरुक्ती केली आहे. त्यातच 'तपसातत्य' ठेवावे, असे सूचित केले गेले आहे. हे सातत्य कां ठेवावे लागते ? याचेही एक कारण श्रीनाथांनी दिले आहे. ते म्हणतात दिव्यावर येणारी काजळी सतत दूर करावी लागते. कारण काजळीच दिव्याच्या तेजाच्या आड येते. काजळी म्हणजे प्रापंचिक माया होय. तीही परमार्थाचीच विरूप छाया आहे. पण ती आड येते म्हणून तिला सतत दूर करावे लागते. ही माया भ्रम, अज्ञान, मोह या स्वरूपाची असते. नित्य तप करण्याने ज्ञान प्रकाशित होते. तप सातत्यपूर्वक करावे असे सांगताना

ते कसे करावे ? याचा एक सुरेख नि समर्पक दाखला श्रीनाथांनी नाथभागवतात दिला आहे. त्यांनी म्हटले आहे की, 'गाव तिथे देवालय असते. देवालयात मूर्ती असते, मूर्तीचा उत्सव होतो, उत्सवासाठी बाजार भरतो... जत्रा भरते... जत्रेत पाळणा असतो... तो वर-खाली फिरत असतो... त्यात बसले की, देवाची जत्रा दिसते... देवालयाचे दर्शन होते.' (नाथभागवत, अ. २७ ओवीबंध ३६५ ते ४०५) इथे एक प्रतीक ते सुचवितात. देह हे गाव, त्यांत आत्मा वसला आहे. तो दिसावा - कळावा म्हणून श्वासोच्छ्वासाचा पाळणा ईश्वराने तुम्हा-आम्हाला जन्माला घालतानाच दिला आहे. मग श्वासोच्छ्वासात सतत नाम घेतले तर देहातील आत्मस्वरूपाचे दर्शन होईल. मग लोकांनी तसे साधन का करू नये? अन्यत्र भटकण्याची काय गरज आहे. जवळच साधन दिले आहे. तसेच श्वासोच्छ्वास असेतोपर्यंत म्हणजे आयुष्यभर आपल्याला तप करता येते. माया ही अहंकारस्वरूपही असते. *'जैसी दीपासी काजळी । तैसी तुझी माया तुज जवळी । देहाभिमाने सवासकळी । मजही झांकोळी विषयासक्ती'* (ओवी ३४९/च. भा.) विषयासक्तीनेच नित्यतपासात अडसर उत्पन्न होतो. म्हणून सतत माझे स्मरण, कीर्तन, भजन करीत नित्य तप करावयास हवे. *'माझे नाम माझे स्मरण । माझी कथा माझे कीर्तन । माझ्या चरित्रांचे पठण । गुणवर्णन नित्य माझे'* हेच माझे भक्तिसाधन आहे. (ओवी ४०१) श्रीनाथांनी ओवी ४०० ते ४३० पर्यंत 'भक्तिवर्म' विशद केले आहे. जिज्ञासूंनी मूळ ओव्या जरूर पाहाव्यात. जप, स्मरण, नेम, ध्यान, कथा-कीर्तन, भजन-पठण, पोथी-पारायण ही सर्व भक्तीच आहे. सद्गुरुंनी अनुग्रह केल्यापासून (नाममंत्र देऊन कृपादृष्टी टाकल्यापासून) ते त्या अनुग्रहानंतरच्या नामाचे सातत्यपूर्वक स्मरण जो करील, त्याला सृष्टीदर्शन होऊ शकेल. 'श्रवणे परमार्थ जिवासी जोडे' हे त्यातले प्रधानसूत्र आहे. (ओवी ४३२) श्रवणे... म्हणजे साधकाने गुरुमंत्राचे श्रवण केल्यानंतर (अनुग्रहानंतर)... सतत नामस्मरण... तप, जप केले तर... परमार्थ म्हणजे गुह्यज्ञान हे जीवाला... साधकाला... कळून येऊन त्याला ईश्वरानुभवांचे दर्शन होते. भक्तिवर्म ते हेच होय. *'या रीती हे साधनधर्म । आचरता नाना कर्म । माझे प्राप्तीचे निजवर्म । नेणती संभ्रम देहाभिमानी ।। माझी पावावया निजप्राप्ती । अन्वये करावी माझी भक्ती । व्यतिरेके माझी स्वरूपास्थिती ।* सांगेन तुजप्रती गुह्यमाझे ।।' (ओवी ५७५ आणि ५७६) यांत अन्वय कोणता ? व्यतिरेक कोणता ? तर सर्वत्र मीच भरून आहे हा अन्वय होय. उदा. तांब्याचा नाग केला तरी मुख वा शेवटी इथे सर्वत्र मीच किंवा श्वानारूढ खंडोबा केला तर श्वानही मीच, खंडोबाही मीच. व्यतिरेक म्हणजे दोरीच सर्प भासणे. दोरीच नाहीशी केली की सर्पभीती संपली. अज्ञानाने दोरी सर्पाकार भासते व त्याचे भय वाटते. ज्ञानाने दोरी मिथ्या ठरली की, सर्पही नाही... भीतीही नाही... अशा दोन्ही अंगाने ईश्वराला जाणून घ्यायला हवे, श्रीनाथांनी हेच प्रतिपादिले आहे.

### लोकसंग्रहार्थ भक्ती करावी...

*'गुरुवाक्यचि निश्चिते । पूर्ण ब्रह्म'* हे सूत्र नामप्राप्ती, नामस्मरण, ईश्वरदर्शन या तिन्हींचाही विचार मांडणारे असे आहे. आता मुख्य प्रश्न असा की, भक्तीची सामाजिक अंगाने आवश्यकता का व कोणती? श्रीनाथांनी त्याचेही उत्तर चतुःश्लोकी भागवतात दिले आहे. ते म्हणतात, *'जे जे श्रेष्ठ आचरती । ते ते कर्म इतर करती । यालागी यमनियम प्रजापती । आचरे अनहंकृती लोकसंग्रहार्थ।।'* (ओवी ७७९) भक्ती ही समाजसन्मुखच हवी. नामस्मरण ही आध्यात्मिक साधना नैतिकतेबरोबरच चालू राहायला हवी. नैतिकशक्ती हीच समाजाचे रक्षणही करीत असते. (१) लोकसंग्रह म्हणजेच ईश्वरनिष्ठांचा मेळावा. (२) लोकरक्षण म्हणजेच सामाजिक नैतिकतेची पाठराखणी. या दोन्हीसाठी भक्ती आवश्यक आहे. समाजापुढे आदर्श म्हणून राहणारी थोर मंडळी, वडिल मंडळी ही ज्या मार्गाने जातील त्याच मार्गाने नंतरच्याही समाजाने यावे हीच अपेक्षा जीवनमूल्यांची निश्चिती करण्यामागे असते. संतवाङ्मयाने हीच निश्चिती केली आहे. ग्रंथाचे शेवटी श्रीनाथांनी भागवत कथानिरुपणाची परंपरा सांगितली आहे. ब्रह्मदेवापासून परीक्षितापर्यंत आलेले हे परमगुह्यज्ञान श्रीनाथांनी सर्वांसाठी खुले करून ठेवले आहे. *'गुप्तरूपे जे आली होती । तेचि प्रकट जगाप्रती '* (ओवी ९७०) असे श्रीनाथांनी नमूद केले आहे.

भगवंत आणि ब्रह्मदेव यातला परमगुह्य ज्ञानाचा हा संवाद कसा झाला? तर श्रीनाथमहाराज म्हणतात त्याप्रमाणे *'हृदयाहृदय एक झाले । ये हृदयींचे ते हृदयी घातले । यापरी न बोलता बोले । पूर्णत्व दिधले प्रजापतीसी* (ओवी ७१३) असा झाला.' गीतेत कृष्णार्जुन संवादही असाच झाला होता. सर्वच ग्रंथातील गुरु-शिष्य संवादात गुरुने शिष्याला परिपूर्णत्वाने ज्ञान दिले आहे, असेच पाहावयास मिळते. गुरुभजन, गुरुचरणसेवा, गुरुदास्य यामुळेच साधकाला देव भेटेल. त्यांनी सांगितलेल्या साधन मार्गानेच सृष्टी पाहता येईल. सृष्टी उत्पन्न करणारा ब्रह्मदेव सृष्टी पाहू शकला हेच त्याचे अहोभाग्य होय. कारण त्याने निर्माण करण्यापूर्वीही देव होता. नंतरही आहेच. सृष्टीनिर्मिती म्हणजे शेवटी आत्मसाक्षात्काराचा अनुभव येणे, हेच होय. ग्रंथातील मुख्यार्थ हाच आहे.

### गुरुंविषयी कृतज्ञता...

'चतुःश्लोकी भागवत' ग्रंथाचा समारोप करताना श्रीनाथमहाराजांनी सद्गुरु जनार्दन स्वामी यांच्याविषयी कृतज्ञता व्यक्त केली आहे. गुरुकृपा हीच ग्रंथ प्रेरणा जरी असली, तरी तीच ग्रंथसमाप्तीची अपारशक्तीही आहे. दोरीवरील सर्पभास हा दोरीच मिथ्या ठरल्याने नष्ट झाला. देह मिथ्या म्हणून देहाहंकारही मिथ्या. तप करून ईश्वरदर्शन झाले. हीच धन्यता लाभली. *'ऐसे सद्गुरुंनी नवल केले । माझे मीपण निःशेष नेले । शेखी माझे नावे ग्रंथ बोलिले । प्रेम आथिले ज्ञानार्थ रसे'* (ओवी ९९४) मूळ संस्कृतग्रंथातील चार श्लोकांचा हा प्राकृत मराठीत अनुवाद ग्रंथ केला. यात थोरवी सद्गुरुंची. गुरुंनी काय केले? *'माझे वाचे जे वचन । ते श्रीजनार्दन स्वये झाला'* असे त्यांनी केले. मी धावत असताना माझे पाऊल रिकामे पडू नये म्हणून त्यांनी मलाच कडेवर घेतले. अज्ञानाचा काटा पायात मोडू नये म्हणून त्यांनी गुरुबोधाचा खराटा घेऊन रस्ता स्वच्छ केला. शब्दापुढे ज्ञान धावले... ओवीपुढे

अर्थ धावला... अशी ग्रंथरचना झाली. चार श्लोकांवरचे.. हजार ओव्यांचे भाष्य... परिपूर्णतेने प्रकट झाले.

चतुश्लोकी भागवतानंतर हेच परमगुह्य ज्ञान नाथभागवतात प्रकट झाले आहे. अठरा हजार ओव्यांचा तो बृहत् ग्रंथ आहे. त्यातही भक्तिशास्त्राची त्रिसूत्री हीच आहे की, १) साधक होऊन भक्तिमार्गाकडे या. २) भक्तिनौकेत बसा... स्मरण, भजन, कीर्तन, पोथी-पारायण, प्रवचन इत्यादींमधून अनुसंधान ठेवणे हीच भक्ती. ३) त्यासाठी गुरु हाच भक्तिनौकेचा कर्णधार आहे. त्यालाच शरण जा. तो कृपा करील... नामस्मरणात्मक 'तप' केल्यास अनुभवस्वरूप 'सृष्टीचे दर्शन' घडून येईल. कृतार्थ व्हाल. दुःखमुक्त व्हाल. साधक, गुरु, साधना याचीच परिणती सृष्टीदर्शनात्मक-ईश्वरानुभूती होय.

## १) ससंदर्भ - स्पष्टीकरण :

'अष्ट दिक्पालकर ओड्यने । सृष्टीकर्ता' या संदर्भातील स्पष्टीकरण पुढीलप्रमाणे आहे :

श्रीभाऊसाहेब महाराज उमदीकर यांची कानडी भाषेतून केलेली आरती 'मंगल महालिंग उमदीशा' ही आहे. (नित्यनेमावली, ११ वी आवृत्ती, प्रकाशक : श्रीगुरुदेव रानडे समाधी विश्वस्त मंडळ, निंबाळ, ५८६२११ जिल्हा विजापूर, पृष्ठ क्र. ८०-८१) त्यातील 'सृष्टीकर्ता' हा शब्द (विशेषण) सद्गुरुंस उद्देशून आहे. हेच विशेषण श्रीभाऊसाहेब महाराजांप्रमाणेच श्रीगुरुलिंग जंगम तथा श्रीनिंबरगी महाराज यांनाही लागू पडते. सद्गुरुंच्या ठिकाणी असलेले हे सामर्थ्य जाणूनच श्रीगुरुदेव रानडे यांनीही त्याचे सद्गुरु श्रीभाऊसाहेब महाराज यांना उद्देशून म्हटले आहे की, 'आपणास भाऊसाहेब महाराज म्हणून हाक मारण्यापेक्षा आत्मज्ञान म्हणून हाक मारणेच जास्त चांगले होणार आहे... आपण केवळ देवरूपच झाला असल्याने आपणास आत्मदेव म्हणून हाक मारण्यास काय हरकत आहे?' (प्रा. रा. द. रानडे : चरित्र आणि तत्त्वज्ञान - लेखक डॉ. शं. गो. तुळपुळे, व्हीनस प्रकाशन, पुणे - २ पृष्ठ क्र. ११३.)

तप आणि सृष्टीकर्ता या संदर्भात श्रीगुरुदेव रानडे यांनी 'भगवद् गीता : साक्षात्कार दर्शन' या ग्रंथात एक संदर्भ नोंदविला आहे. तो पाहण्यासारखा आहे. ते म्हणतात, 'ईश्वरप्राप्ती झाल्यावरच विश्वाचे कोडे सुटते. हा ईश्वरदर्शनाचा सहावा परिणाम आहे. गीता सांगते : सर्व गोष्टी ईश्वरामध्येच केंद्रित झाल्या आहेत. त्याच्यामधून त्या जन्माला येतात आणि त्याच्यातच लय पावतात, हे पाहिल्यावरच ईश्वराची प्राप्ती झाली असे म्हणता येईल... सृष्टीकर्तृत्व सोडून ईश्वराच्या सर्व शक्ती साक्षात्कारी पुरुषाला प्राप्त होतात, असे बादरायणाने सांगितले आहे. परंतु सृष्टीकर्तृत्वाची शक्ती अंशतः तरी त्याच्या अंगी आली नाही तर, त्याला साक्षात्कार झाला असे म्हणणेच कठीण होईल.' (गीताधर्म मंडळात दिलेले व्याख्यान)

प्रा. डॉ. नरेंद्र कुंटे
.प्रज्ञा, ए-७४ आसरा सहकारी गृहनिर्माण संस्था,
होटगी रस्ता, सोलापूर ४१३ ००३.
दूरभाष : (०२१७) ६०० ००३

# मध्ययुगीन वाङ्मयातील संत एकनाथांचे स्थान

**सौ. आशा परांजपे**

एम. ए. एल. एल. बी., चिन्मयमिशन हाँगकाँग येथे ६-७ वर्षे मिशनचे काम केले. पूजा मासिकात गेले ६-७ वर्षे नियमित लेखन. भक्तिमहिमा हे इंग्रजी गोष्टीरूप पुस्तक लहान मुलांसाठी प्रसिद्ध. सध्या नामदेव अध्यासनात श्री. गोंदवलेकर महाराज यांचेवर संशोधनपर लेखन सुरू आहे.

संत ज्ञानेश्वरांनी ज्या धर्ममंदिराचा पाया रचला त्याला भक्कम आधार संत एकनाथांनी दिला. बहेणाबाईनी, संत ज्ञानेश्वरांनी स्थापन केलेल्या धर्ममंदिराला एकनाथांनी भागवत धर्माचा खांब दिला असे म्हटले आहे. भागवत धर्माची नाथांनी शास्त्रोक्त स्थापना केली व भागवतांना, वैष्णवांना एकत्र आणले. हे महत्त्वाचे कार्य त्यांनी आपल्या अनेक ग्रंथांद्वारे केले. नाथांनी आपले कार्य एक विशिष्ठ दृष्टी समोर ठेऊन केले होते. ज्या धर्माने सबंध समाजाची धारणा केली जाते तो भागवत धर्म अशीच भागवत धर्माची व्याख्या त्यांनी आपल्या डोळ्यांसमोर ठेवली होती. इतर साक्षात्कारी संतांप्रमाणेच नाथांच्या ठिकाणीचा सर्वसमभाव प्रकर्षाने दिसून येतो.

नाथकालीन महाराष्ट्रातील स्थिती पाहिल्यास त्यांनी केलेले समाज एकत्रीकरणाचे कार्य किती महत्त्वाचे आहे हे सहजपणाने दिसून येते. ज्ञानेश्वर व नामदेव यांच्यापेक्षा नाथांच्या काळातील परिस्थिती खूप गंभीर होती. मुसलमानी आक्रमणाने महाराष्ट्रीय संस्कृती व मराठी भाषेची गळचेपी झाली होती. हिंदू संस्कृतीवर त्याचा फार मोठा परिणाम झाला होता. हिंदू देवळे पाडून तिथे मशिदी बांधल्या गेल्या होत्या. तोच प्रकार मराठी वाङ्मयातही होऊ लागला. मराठी भाषा फारसीमिश्रीत होऊ लागली होती. ब्राह्मण आणि वैदिक ज्ञानी यांचे नैतिकदृष्ट्या अधःपतन होऊ लागले होते. त्यांचा परिणाम म्हणजे हिंदू धर्मात कर्मठपणाचा अतिरेक झाला होता. ब्राह्मणाच्या नावाखाली वर्णव्यवस्थेला ऊत येऊन धर्माबद्दलचे सामान्यज्ञानपण सर्व लोकांपर्यंत पोचेनासे झाले होते. त्याचा परिणाम म्हणजे नवससायास, बळी देणे या प्रकारांची वाढ झाली. ज्ञानेश्वरांनी सांगितलेल्या धर्माचा लोकांना विसर पडत चालला होता. अशा परिस्थितीत महाराष्ट्रातील हिंदूंची धर्मभावना जागृत करण्याचे काम संत महात्म्यांनी केले. नानामतांच्या व नाना वर्णाच्या लोकांना उच्च धार्मिक जीवनाची तत्त्वे समाजाला पचतील अशा सोप्या भाषेत सांगणे ही त्या वेळच्या काळाची गरज होती. लोप पावत चाललेल्या भागवत धर्माचे पुनरुज्जीवन करण्याचे अति महत्त्वाचे काम नाथांनी आपल्या गुरूंच्या - जनार्दन स्वामींच्या आज्ञेवरून केले. ज्ञानेश्वरांनंतर पुढच्या तीनशे वर्षांत अशा तऱ्हेचे काम म्हणावे तसे झाले नव्हते. एकनाथ पूर्व काळात फारच थोडी वाङ्मय निर्मिती झाली. दासोपंत, दत्तसंप्रदायातील सरस्वती गंगाधर व काही जैनधर्मीय कवींनी या काळात ग्रंथरचना केली.

समाजात माजलेल्या स्वार्थाचा, दंभाचा व अंधश्रद्धेचा, आंधळेपणाचा नाथांनी सडेतोडपणे समाचार घेतला. विस्कळीत झालेल्या बहुढंगी समाजाला एका भागवत धर्माच्या सूत्रात ओवण्याचे महत्त्वाचे काम नाथांनी केले. एकनाथ स्वतः परमार्थी असल्यामुळे त्यांनी समाजातील धर्मातील सर्व ढोंगे आपल्या वाङ्मयाद्वारे उजेडात आणली. एकनाथांच्या काळात मराठी भाषा एकीकडून फारसी तर दुसरीकडून संस्कृती याच्या कचाट्यात सापडली होती. अशा विळख्यातून मोठ्या अलगदपणाने त्यांनी मराठी भाषा बाहेर काढली एवढेच नव्हे तर तिला वेगळे स्थान मिळवून देण्याचा प्रयत्न केला. त्यांचे मराठीप्रमाणेच फारसी भाषेवरही प्रभुत्व होते. त्यांचे भाषाविषयक धोरण विशाल होते. मराठी भाषा प्राकृत म्हणून वेदांताच्या निरुपणासाठी तिचा उपयोग करण्याला संस्कृत पंडितांचा विरोध होता. एकनाथांनी या विरोधाला न जुमानता वेदांताचे सर्व निरुपण प्राकृत भाषेत केले व विद्वानांना स्पष्ट रोकडा सवाल केला, *'संस्कृत वाणी देवे केली । तर प्राकृत काय चोरापासोनि जाली ।'*

हरिकथा निरूपण ब्रह्मविद्येचा उहापोह ज्या भाषेद्वारे केला जातो ती भाषा पवित्रच असली पाहिजे असे त्यांनी ठासून सांगितले. त्यांच्या भागवतावरच्या मराठी टीकेवर विद्वानांनी मोठा गंभीर आक्षेप घेतला होता. त्या आक्षेपाचे निरसन त्यांनी विद्वत्तेने, नम्रपणाने व श्रद्धेने केले व विद्वानांची मने जिंकली. याचा परिणाम म्हणजे काशीक्षेत्री पंडितांनी नाथांच्या मराठी भागवताला पूर्ण मान्यता दिली व त्यांचा गौरव केला. या त्यांच्या कामगिरीमुळेच त्यांना मराठी भाषेचा नाथ म्हटले आहे.

नाथांचे वाङ्मय चौफेर होते. त्यांच्याइतकी प्रचंड मोठी, विविध प्रकारची ग्रंथरचना करणारा कवी क्वचितच सापडेल. त्यांच्या ओव्यांची एकूण संख्या पाहिली असता ती पाऊण लाखापेक्षाही जास्त आहे. बहुजनांच्या भावना लक्षात घेऊन त्यांच्यासाठी साहित्य रचणारा एक लोकसाहित्यकार कवी म्हणून नाथांना ओळखले जाते. नाथकालीन समाज, दुःख-दारिद्र्याने गांजून गेला होता. नाथांच्या लेखणीतून उतरलेली शब्दचित्रे त्यांच्या भारुडातून पाहावयास मिळतात. समाजाच्या तळाचा वर्ग त्यांनी यासाठी निवडला. त्या समाजाच्या आवडी-निवडी, सुख-दुःखे, नाथांनी नीटपणाने न्याहाळली व त्याच्याशी ते पूर्णपणाने समरस झाले. एकनाथी भारुडाच्या यशाचे मर्म यातच आहे. नाथांच्या पूर्वीच्या संतांनीही भारुडे रचली. पण भारूड म्हटले की, नाथांचेच नाव पुढे येते. कारण त्यांचे वैचित्र्य, व्यापकत्व, त्यातील रूपके आणि आत्मबोध देण्याची आगळी-

वेगळी पद्धत हे होय. बहुजन समाजाच्या नित्याच्या जीवनातील संसारातील उदाहरणे घेऊन त्यांनी त्या समाजाला भक्तीमार्गाची वाट दाखविली. तत्कालीन समाजात नित्य आढळणारी मंडळी म्हणजे ज्योतिषी, कोल्हाटी, डोंबारी, भुत्या, कडकलक्ष्मी, गारुडी, वासुदेव, फकीर व देवता म्हणजे मरीआई, सखाई या मंडळींच्या लोकप्रियतेचा आधार घेऊन त्या थराच्या लोकांना परमार्थ सांगितला, अध्यात्म शिकविले. त्यांच्या सर्व भारुडामधून एकनाथांच्या कविमनाची व्यापक व गाढ सहानुभूती व्यक्त होते. नाथांच्या वाङ्मयाचा व जीवनाचा सर्वस्वी हेतू भक्तीचा प्रसार करणे हाच होता. त्यांच्या वाङ्मयापैकी भारुडाच्या माध्यमातून ते काम त्यांनी अधिक प्रभावीपणे केले आहे.

प्राकृत भाषेतून ग्रंथरचना करण्याची ज्ञानेश्वरांपासून चालत आलेली परंपरा नाथांनीही पुढे चालविली आहे. भागवत संप्रदायाचे कार्य आणि साहित्य निर्मितीचे ध्येय या बाबतीत संत एकनाथ व संत ज्ञानेश्वर यांच्यात कमालीचे साम्य आहे. नाथांनी आपली वाङ्मय निर्मिती अनेक अंगांनी समाजातील अनेकविध लोकांसाठी केली. पंडित आणि विद्वान लोकांसाठी चतु:श्लोकी भागवत आणि एकनाथी भागवत लिहिले. चतु:श्लोकी भागवत हा त्यांचा गुरुआज्ञेवरून लिहिलेला पहिला ग्रंथ होय. भागवताच्या दुसऱ्या स्कंधामधील नवव्या अध्यायाच्या ३२ ते ३५ या श्लोकांवर नाथांचे हे १०३६ ओव्यांचे भाष्य आहे. सृष्टीकर्त्या ब्रह्मदेवाला आदिनारायणांनी जे ज्ञान दिले ते ज्ञान या चार श्लोकांत आहे.

एकादश स्कंधावरील त्यांचे विस्तृत भाष्य म्हणजे एकनाथी भागवत होय. याच ग्रंथाची समाप्ती काशीक्षेत्री झाली. विद्वानांनी त्यांना प्राकृत भाषेत वेदांत लिहिला म्हणून जोरदार आक्षेप घेतला होता पण अत्यंत प्रासादिक भाषा व त्यातील रसाळपणा पाहून तो विरोध मागे घेतला. या ग्रंथातून नाथांचे रूपक योजनेचे प्रभुत्व, नितांत गुरुभक्ती, भागवत धर्माबद्दलचे प्रेम व प्राकृत भाषेविषयीचा अभिमान प्रकर्षाने दिसून येतो.

या शिवाय त्यांच्या स्फुट लेखनातूनही अशाच प्रकारचा वेदांत वारंवार दिसून येतो. त्यापैकी हस्तामलक, स्तोत्रावरची टीका अशीच आहे. मध्यमवर्गीय समाजासाठी त्यांनी रुक्मिणी स्वयंवर व भावार्थ रामायण लिहिले. रुक्मिणी स्वयंवर हे नाथांचे पहिले आख्यान काव्य होय. भागवतातील दशमस्कंदाच्या १४४ श्लोकांवर हे अठरा अध्यायाचे लोकप्रिय आख्यान आहे. या आख्यानाद्वारे नाथांनी त्या काळातील अनेक चालीरीती, लग्नसमारंभाच्या पद्धती, युद्धाचे वर्णन बहारीने रंगवले आहे. या मुख्य ग्रंथाशिवाय हस्तामलक, स्वात्मसुख, शुकाष्टक, आनंदलहरी, गीतासार, चिरंजीवी पद, गीता महिमा ही स्फुट काव्ये, कीर्तनासाठी काही चरित्रे व आख्याने लिहिली आहेत. वेदांताची उत्कृष्ट मांडणी करणाऱ्या नाथांनी अनेक सरस भक्तीरसाने भिजलेल्या गौळणी व अनेक अभंग लिहिले आहेत. नाथांचे श्रीकृष्णाबद्दलचे गाढे प्रेम त्यांच्या कृष्णप्रेमाच्या पदांमधून सातत्याने दिसून येते. या सर्व वाङ्मयातून केवळ मनोरंजन व भक्तीदर्शन हा एकमेव हेतू नसून प्रपंचात गुरफटलेल्या समाजाला अध्यात्माची गोडी लावणे हा प्रधान हेतू असल्याचे प्रकर्षाने दिसून येते.

नाथांची ही प्रचंड ग्रंथसंपदा अष्टपैलू आहे. मराठी संतकवीमध्ये अशा तऱ्हेची विविध रचना करणारे फक्त एकनाथच आहेत असे म्हटल्यास अतिशयोक्ती ठरणार नाही. आपल्या आख्यानकाव्यातून त्यांनी मोठ्या प्रमाणावर जनजागृतीचे काम केले. या आपल्या श्रीमंत वाङ्मयाने त्यांनी मधल्या २००-२५० वर्षांत शिथील झालेल्या भागवत धर्माला चालना दिली व लोकांच्या मनात भक्तीभाव जागृत केला.

एकनाथांनी मराठी साहित्यात अनेक नवे प्रवाह सुरू केले. त्यांनी केलेल्या टीकात्मक वाङ्मयातून पुढे वामन पंडीत, शिवराम स्वामी यांनी प्रेरणा घेऊन काम केले. आख्यान काव्ये, गौळणी यांचा उदय पुढच्या काळात नाथांच्या वाङ्मयामुळे अधिक झाला. संत एकनाथांनी केलेले आणखी एक महत्त्वाचे काम म्हणजे ज्ञानेश्वरांनी सांगितलेल्या तत्त्वांचे पुनरुज्जीवन होय. मधल्या २५० वर्षांच्या काळात ज्ञानेश्वरांनी सांगितलेला भक्तीमार्ग थोडा मागे पडला होता. दोघेही संत मूळचे वेगळ्या पंथाचे पण भक्ती संप्रदायाचा धागा हा त्यांच्यातला फार मोठा दुवा आहे. ज्ञानेश्वरीच्या लेखनानंतर मधल्या काळात मूळ ज्ञानेश्वरीच्या अनेक नकला झाल्या होत्या. एकनाथांनी त्या बाबतीत संशोधनात्मक काम करून शुद्ध ज्ञानेश्वरी तयार करण्याचे अती अवघड व तेवढेच महत्त्वाचे काम केले.

भावार्थ रामायण हा एकनाथांच्या उत्तर काळातला शेवटचा ग्रंथ होय. एकनाथांच्या पूर्वीच्या काळात संपूर्ण रामकथा एकत्र लिहिलेला एकही ग्रंथ सापडत नाही. नाथांनी अनेक रामायणे, पुराणे यांच्या आधाराने हा ग्रंथ मोठा रंजक केला आहे. अध्यात्म रामायणाचा मुख्य आधार त्यात दिसतो. १६ व्या शतकाच्या शेवटच्या काळातील महाराष्ट्राची परिस्थिती पाहिली असता रामाचा आदर्श लोकांपुढे अतिआवश्यक होता. आदर्श राजा डोळ्यांपुढे ठेवून आदर्श राज्य निर्माण होणे आवश्यक होते. मराठी सरदार मंडळी मुसलमानांच्या जहागिरीत नोकरीला होती. महाराष्ट्राला मुसलमानी तावडीतून सोडविण्यासाठी अशा आदर्शांची जरुरी होती व ते त्यांचे स्वप्न होते. एकनाथांनी लिहिलेले भावार्थ रामायण या हेतूने प्रेरित झाले होते. समाज जागृतीचे एकनाथांनी सुरू केलेले काम पुढच्या काही वर्षांत आणखी वाढले व त्या जागृतीतूनच रामदासांच्या देशभक्तीपर कामाचा उदय झाला. काही टीकाकारांनी एकनाथांना 'महाराष्ट्र महोदयाचा अग्रदूत' म्हटले आहे त्या विधानाची सत्यता त्यांच्या कामावरून प्रत्ययास येते. समाजरचनेबद्दलची, चातुर्वण्याबद्दलची त्यांची तक्रार पुढे संत तुकारामांनी अधिक प्रखर व धारदार केली. एकनाथांच्या धार्मिक व वाङ्मयीन कार्याचे आगळेपण त्यांनी मराठी वाङ्मयाला जे नवे वळण लावले आहे त्यात दिसून येते. नाथ हे खरे लोकवाङ्मयकार होते. भक्तीचा संदेश समाजाच्या सर्व थरापर्यंत पोचावा हे त्यांचे धोरण अत्यंत वाखाणण्यासारखे आहे. नाथांच्या साहित्यातून वीर, करुण, वत्सल, शृंगार, भक्ती इत्यादी रसांचा आविष्कार प्रामुख्याने दिसतो.

नाथांनी केलेल्या वाङ्मयातून पुनरुक्ती व पाल्हाळपणा फार मोठ्या प्रमाणावर दिसतो. पण हे दोष त्यांच्या प्रतिभेचे नसून ग्रंथकाराच्या प्रचारकी थाटातून उद्‌भवले आहेत. भागवत धर्माचा प्रसार करून समाजाचे पुनरुज्जीवन घडविताना पुनरावृत्ती होणे स्वाभाविक आहे. त्यांच्या मराठीचे मराठीपण अनन्य साधारण आहे. टीकाग्रंथातून गंभीर दिसणारे नाथ भारुडातून, गौळणीतून खेळमेळीने वावरताना दिसतात. नाथांची महती सांगताना रा. द. रानडे म्हणतात,

"प्रपंच व परमार्थ यांची विलक्षण सांगड घालून संसारामध्ये असताना परमार्थ करावा हे नाथांनी शिकविले. मंदिराच्या प्राकारापासून सामान्य सांसारिकाच्या अंगणापर्यंत भक्तीची वाट नाथांनी तयार केली. त्यावर विवेकाचा सडा घातला. सामाजिक नीती व मानवतेचे वृक्ष लावले. आत्मज्ञान आणि भूतदयेच्या दीपांनी सारी अंतःकरणे उजळून टाकली."

आधार ग्रंथ - मराठी वाङ्मयाचा इतिहास - ल. रा. पांगारकर
मराठी वाङ्मयाचा इतिहास - नासिराबादकर


सौ. आशा परांजपे
ए-२२ अभिमानश्री सोसायटी,
पाषाण रोड,
पुणे ४११ ००८.

# युगसंजीवक नाथ

**डॉ. कुमुद गोसावी**, एम.ए.पीएच.डी.
ग्रंथ संपदा : १) संत एकनाथांचे स्फुट लेखन (महाराष्ट्र ग्रंथोत्तेजक संस्था, पुणे पुरस्कार)
२) मौनी प्राजक्त ३) संत कबीरांचे तीसायंत्र ४) अरूपे घेतले रूप (चरीत्र ग्रंथ) ५) चैतन्याचा धनु आदि ग्रंथ प्रकाशित
व्याख्याने, प्रवचने, परिसंवाद यात भाग. मासिके, वृत्तपत्रे आदि विपुल स्फुट लेखन
सचिव - श्रीएकनाथ संशोधन मंदिर, औरंगाबाद उपाध्यक्षा - श्रीदत्तधाम शूलभंजन पर्वत, खुल्ताबाद
संचालिका - श्रीसंत एकनाथ महाराज अभ्यासकेंद्र हरिमंदिर, हत्तरंगी - कर्नाटक शासननियुक्त विश्वस्त सदस्या - संत एकनाथ मंदिर, पैठण. आगामी प्रकाशने - १) संत हरिकाका गोसावी (उत्तररंग) चरित्र ग्रंथ ,२) संत एकनाथ महाराजांचे सहा स्फुट ग्रंथ

आज एकविसाव्या शतीच्या उंबरठ्यावर उभं असतानाही आपण सात शतींची कालदरी ओलांडून कधी तेराव्या शतीत डोकावतो. संत ज्ञानदेव माऊलीला न्याहाळतो. डोळ्यांत साठवतो तर कधी 'भानुदास एकनाथ' अशा नामगजरात सोळाव्या शतीत येऊन पोहोचतो. आपल्या मनाला संतवाणीनं ही जी गवसणी घातली आहे ती या कालखंडात मराठी भाषा आणि संस्कृती यांचं उत्थापन करणारं एक नवपर्व सुरु झाल्याची बोलकी साक्षच म्हणायला हवी.

महाराष्ट्राच्या मातीनं संतत्व केवळ जपलंच नाही तर त्या त्या काळातील संतांनी त्या त्या काळाचं आव्हानही स्वीकारलं अन् लोककल्याणकारी कार्याला वाहून घेतलं. त्यामुळे महाराष्ट्राच्या एकंदर जडण-घडणीत संतकार्याचाही मोलाचा वाटा आहे.

सोळाव्या शतकात नाथकाळात तर परचक्र, परधर्म, परभाषा यांनी केलेल्या आक्रमणांनी समाज अतिशय दुबळा बनला होता. दक्षिण काशी म्हणून मानली गेलेली प्रतिष्ठान नगरीही निजामशाहीच्या अमलाखाली नांदत होती. शेंदरी-हेंदरी देवतांचं प्रस्थ वाढलं होतं. नवससायास, जीत्रवळी, भोंदू साधू यांच्या आहारी गेलेल्या समाजात अंधश्रद्धा अधिक बळावली होती. अशा प्रतिकूल काळात नाथ जन्मले. वाढले.

*जेणे बालपणी आकळिला भानू । स्वये झाला चिदभानू ॥*

अशा सूर्योपासक भानुदास महाराजांच्या वंशातील सुसंस्कारांचे तेजोःकण त्यांनी वेचले. या सविताच्या श्रेष्ठ तेजाची उपासना सांगणाऱ्या भागवत धर्माच्या मूलमंत्राचा द्रष्टा विश्वामित्र हा केवळ स्वगोत्र पुरुष म्हणून नाथांना वंदनीय वाटला नाही तर त्या भावतधर्माचं त्यांचं प्रेममय भक्तिसूत्र त्यांच्या अंतरी गोवलं गेलं. म्हणून तर पुढील आयुष्यात त्यांनी केलेलं कार्य भागवत्धर्म प्रसाराचं. त्यांनी लोकमानसावर रुजवलेलं रोपटं आजही जेव्हा कळी-फुली आलेलं आपण बघतो तेव्हा मनोमन त्याची साक्ष पटते.

उपनिषदे, ब्रह्मसूत्रे, भगवदगीता ही वेदांताची प्रस्थानत्रयी तिचं तिच्यावरील भाष्यग्रंथांचं अध्ययन नाथांचं परिपूर्ण असूनही ते केवळ पांडित्यात अडकून न पडता आधी सद्‌गुरुंच्या दत्तभक्त जनार्दन स्वामींच्या सेवा-कृपाछत्रा खाली देवगिरी किल्ल्यावर येऊन राहिले. अखंड गुरुसेवा करून गुरु आज्ञेनुसार देवगिरी नजिक औरंगाबादपासून अवघ्या २५ कि. मीटर अंतरावर असलेल्या शूलभंजन पर्वतावर एक तप साधनेतही ते रमून गेले. तिथंच त्यांना साक्षात श्रीदत्तदर्शनाचाही लाभ झाला. ज्या शिळेवर बसून थंडी, ऊन, वारा, पाऊस याची क्षिती न बाळगता त्यांनी अतिशय एकाग्रतेने तपःश्चर्या केली ती शिळा आजही या स्थानी 'संगीत शिळा' म्हणून बघायला मिळते. तिच्यातून संगीतातील सा, रे, ग, म, प, ध, नी असे सप्तस्वर, त्यांची स्वरमंडलं या साधना शिळेनं जतन केली आहेत. याचं आश्चर्य व्यक्त करण्यात नव्हे तर, प्रत्यक्ष अनुभूती घेण्यातच खरा आनंद आहे.

साधनापूर्तीनंतर नाथांनी जी तीर्थयात्रा केली त्यातून त्यांना तत्कालीन समाजाचं जवळून दर्शन घडलं. आत्मतेज हरवलेल्या स्वतःचा चेहरा नसलेल्या समाजाच्या वेदनेची कळ त्यांच्या अंतरी उमटली. याचा प्रत्यय त्यांची अभंगवाणी देऊन जाते.

*वित्त न देववे कृपणता । काम न पुरवे पुरता ।*
*प्रीति न करवे तत्त्वता । भेटी मागुता तो नेदी ।*
*ऐशिया पासाव सुख । वांछिता वाटे परमदुःख ।*
*जळो त्यांचे न पाहे मुख । वोकारी देख येतसे ॥*

असं अत्यंत लाजिरवाणं लोकजिणं पाहून नाथांचं मन कळवळून आलं. समाजातील दुष्टपणा, दंभ, ढोंग, विषमता, स्वार्थ, द्वेष, मत्सर आदी दोषांची केवळ निर्भत्सना न करता त्यातून लोकांची सुटका करण्यासाठी त्यांनी ज्ञानदेव माऊलीनं मळलेली सुलभ भक्तीवाटच स्विकारली अन् जनसामान्यांसाठी मराठी भाषेतूनच त्यांनी लाखाच्या घरात रचना केली. त्यांचे असंख्य अभंग, पदे, गौळणी, भारुडं आदी रचना अत्यंत लोकप्रिय ठरल्या. महाराष्ट्रातील काना-कोपऱ्यापर्यंत त्यांच्या रचना विशेषतः भारुडं, गौळणी जाऊन पोहोचल्याचं आजही दिसून येतं. आजच्या संगणक युगातही महाविद्यालयीन युवक-युवती त्यांच्या वार्षिक स्नेहसंमेलनातून पॉपसंगीताबरोबर एकनाथी भारुडंही सादर करताना आढळतात. यावरून त्यांची कालातीत लोकप्रियता ध्यानी येते. अलीकडे साक्षरता अभियानासारख्या राष्ट्रीय उपक्रमातही या रचनाप्रकाराचा उपयोग मोठ्या कौशल्यानं केला जातो.

*सगुण गुण माया । आली कोल्हाटीण खेळाया ।।*

अशी या एकनाथी भारुडांतून कधी कोल्हाटीण अवतरते तर कधी 'सुया, पोती, बिबं घ्या. वाईच वाताचं औषध घ्या' असं म्हणून ललकारी देणारी वैदीण म्हणते,

बुरगुंड व्हईल बया ग । तुला बुरगुंड व्हईल ।
तुला बी व्हईल । अन् मलाबी व्हईल ।। बुरुगुंड ।।

असं म्हणत मोठ्या विश्वासानं स्वयंपाकघरातल्या गृहिणीला परस-अंगणात बोलवून घेऊन तिच्याशी समतेची भाषा बोलू लागते. 'बुरगुंड' या रूपकातील भाव दोघींचीही समपातळी दर्शवणारा. 'बुरगुंड' म्हणजे मूल ते होण्याचा मातृत्वाचा अधिकार जसा दोघींचाही समान आहे तसा 'बुरगुंड' म्हणजे ज्ञान हा अधिकारही दोघींचा समानच. ज्ञानापासून, भक्तीपासून वंचित असलेल्या वैदिणीसारख्या उपेक्षितांचं अंतरंग नाथांनी नुसतंच जाणलं नाही तर आपल्या भारुडासारख्या लोकगीत माध्यमातून त्यांनी ते बोलकं केलं. समाजातील सर्व स्तरांतील प्रतिनिधींना भारुडसूत्रात गोवून त्यांनी त्याद्वारा समाजातील अनिष्ट रुढी, विषमता, अंधश्रद्धा आदि बाबींचं प्रभावी दर्शन घडवलं. रंजनाला उद्बोधनाची झालर लावून त्यांची भारुडं विनटल्यानं लोकमानसाला आजही ती मोहिनी घालू शकतात.

लोकभाषा, लोकपरंपरा, लोकरुढी यांचा मुक्तपणानं आविष्कार करीत जशी लोकसंस्कृतीचे उपासक, वासुदेव, वाघ्या-मुरळी, भुत्या, जंगम, आदिंवर नाथांनी भारुडाची रचना केली तशी आंधळा, मुका, बहिरा अशा अपंगांपासून तो विंचू, सर्प अशा विषारी जीवमात्रांपर्यंत तीनशेहून अधिक विषयांवरील एकनाथी भारुडं मराठी मनाला साद घालून गेली.

भारुडांसारखी नाथांची मधुराभक्तिपर रचनाही गवळणींच्या रूपानं अजरामर झाली. 'तुझ्या मुरलीनं माझी तहान-भूक हरली' अशा थाटात आजही एकनाथी गवळण भजनात एक आगळाच रंग भरून जाते. त्या मुरलीधराच्या मंजुळ मुरलीरवानं गोकुळवासियांना जसा वेध लागला तसा सर्वांना लागावा, प्रापंचिक दुःखांचा त्यांना विसर पडून आनंद लाभ व्हावा या अंतःस्थ भावात भिजलेल्या एकनाथी गवळणीही विविध रूपानं विनटल्या आहेत.

*चला पाहू वेणू कुठे वाजला?*
*करीत मी होते घरकाम धंदा ।*
*शेणानं हात माझा भरलेला ।। चला पाहू वेणू ।।*

अशा वेणूस्वरब्रह्मात स्वतःला विसरणाऱ्या गोपींची कृष्णभक्ती नाथांनी नानापरींनी आपल्या या रचनेतून चित्रित केली आहे. प्रीति आणि भक्ती यांचा सुरेल समन्वय नाथांनी त्यांच्या या गवळण गीतांतून साधला आहे. त्यांतील नाट्यमय अनुभुतीमुळे एक आगळाच आनंद ती देऊन जातात. गोपींची ही असीम भक्ती जनसामान्यांना सहज समजण्यासारखी, अनुसरण्यासारखी असल्यानं नाथांनी या कृष्णभक्तीवर आपल्या रचनांमधून लोकांचं लक्ष वेधून घेतलं. त्यांनी त्यातून लोकरंजनाबरोबर लोकशिक्षणही साधलं. त्यामुळेच एकनाथी गौळणीही अधिक लोकमान्य पावल्या.

प्रपंचात राहूनही परमार्थ उत्तम साधता येतो याचा जसा नाथांनी आपल्या वाङ्मयातून लोकांसमोर आदर्श ठेवला तसा स्वतः प्रपंचात राहून 'आधी केले मग सांगितले' या उक्तीप्रमाणं प्रपंच-परमार्थातील निखळ, अद्वैत साधून लोकांना वस्तुपाठही दिला.

नेटका प्रपंच साधण्यासाठी नाथांनी षड्‌विकारांवर विजय मिळवून मनःशांतीचा कळसच गाठला. त्यांना राग यावा म्हणून पैजा मारणाऱ्यांनी एकदा माध्यान्हकाळी मुद्दाम एका गरजवंताला नाथांघरी पाठवून त्यांची मोठीच परीक्षा घेतली. नाथांच्या पंक्तीला भोजन करताना त्या गृहस्थानं अन्न वाढण्यासाठी त्याच्या ताटापुढं वाकलेल्या नाथपत्नींच्या - गिरिजा माऊलीच्या पाठीवर चढून बसण्याचा अक्षम्य गुन्हा केला असताही नाथ शांतपणानं पत्नीला म्हणतात,

'जरा सांभाळून घ्या हं. नसता पडतील बिचारे'

त्यावर 'काळजी नको हो. हरिपंताला - मुलाला नाही का मी बालपणी पाठीवर घेतलं?' असं जगावेगळं उत्तर देणारी या शांतिब्रह्माची पत्नीही शांतिब्रह्माची पुतळीच ठरते. आज आपल्याला त्यांच्यासारखं प्रपंचात राहून 'शांतिब्रह्म' जरी होता आलं नाही तरी आपला संसार सुखाचा होऊन आपला शेवटचा दिस गोड होण्यासाठी प्रत्येकाला मनःशांतीची नितांत गरज भासते. त्यासाठी भौतिक साधनं किती क्षणभंगुर ठरतात याचीही प्रचीती आपल्याला येते. म्हणून तर त्यासाठी आपल्याला आजही नाथांसारख्या समाजमनकवड्या संतवाणीचा आठव होतो.

*पाहता विठ्ठल रूप । अवघा निवारला ताप ।*
*ध्यानी आणिता ते रूप । अवघा विराला संकल्प ।।*

अशी मनाची अवस्था सामन्यातल्या सामान्य माणसालाही भक्तीमार्गानं साधता येते अशी ग्वाही नाथांनी जनलोकांना दिली. त्यासाठी त्यांनी भजन, कीर्तन, प्रवचन आदींच्या माध्यमातूनही लोकांशी संवाद साधला. आपल्या भागवत टीका-रचनेतून कर्मप्रधान भक्तीचा पुरस्कार केला तो मायबोली मराठी भाषेतून ग्रंथरचना करून. त्यासाठी त्यांना तत्कालीन पैठणवासी संस्कृत पंडितांबरोबर स्वतःच्या मुलाचा - हरिपंडिताचाही रोष सहन करावा लागला. त्याबरोबर काशीच्या पंडितांनी पकडवॉरंट पाठवून त्यांना काशीत बोलवून घेतलं असताना त्या प्रसंगालाही सामोरं जावं लागलं. मात्र त्या प्रसंगी त्यांचा भागवत ग्रंथ काशीतील पंडितांच्या केवळ कसोटीलाच उतरला नाही तर त्या ग्रंथाची काशीत हत्तीवरून मिरवणूकही काढण्यात आली. खरं तर मराठी ग्रंथाचा, मराठी भाषेचा, मराठी संताचा उत्तर काशीत झालेला हा अभूतपूर्व सन्मान सुवर्णाक्षरांनी नोंदवायला हवा.

वारकरी संप्रदायानं आपल्या प्रस्थानत्रयीत एकनाथी भागवताला स्थान दिलेलं असलं तरी जीवनातील असंख्य समस्यांना योग्य दिशा देणारा महान ग्रंथ असूनही तो जागतिक पातळीवर ज्ञानेश्वरीइतका परिचित असलेला जाणवत नाही हेही ध्यानी घ्यायला हवं.

शके १५०६ मध्ये नाथांनी ज्ञानेश्वरी प्रतिशुद्धीचं मौलिक कार्य करून ज्ञानेश्वर भक्तांना, मराठी वाचकांना कायमचं ऋणी करून ठेवलं आहे. तसाच त्यांनी ज्ञानेश्वरी परिभाषा कोषही तयार केला असल्याचं उपलब्ध प्रस्तुत विषयाच्या हस्तलिखित प्रतींच्या आधारे म्हटलं जातं. परंतु त्याकडेही कोणी फारसं लक्ष न घातल्यानं ते अद्यापही प्रकाशाच्या प्रतीक्षेत आहे. गेल्या संपूर्ण वर्षभर आपण ज्ञानदेव माऊलीचा संजीवन

समाधी सोहळा साजरा केला. त्यातही 'ज्ञानाच्या एका' कडं त्या दृष्टीनं फारशी कोणाची दृष्टी वळलेली दिसत नाही. वास्तविक ज्ञानदेव समाधी स्थानाच्या जीर्णोद्धारकार्याच्या संदर्भात आळंदीला घडलेल्या प्रसंगाचं वर्णन नाथ करतात,

*अजान वृक्षाची मुळी कंठास लागली । येऊनी आनंदस्थळी काढवेगी ॥*
*ऐसे स्वप्न होता आलो अलंकापुरी । तव नंदी माझारी देखिले द्वार ।*

यावरून हे समाधी स्थान सिद्धेश्वरासमोर होते व त्याला जाण्याची वाट सिद्धेश्वरासमोरील नंदीखालून होती हे स्पष्ट होते.

*उठविला नंदी शिवाचा ढवळा । उघडिली शिळा विवरीची ॥*
*आजी देखिली पाउले । सुख जाहले समाधान ॥*
*समाधि सोहळा देखिला । एका जनार्दन सुखावला ॥*

नाथांच्या या अभंगावरून त्यांना ज्ञानेशांच्या मूर्तीचं दर्शनसुख याचिदेही याचि डोळा लाभलेलं दिसतं. त्यांनी जनार्दन स्वामींप्रमाणे ज्ञानदेवांनाही मनोमन गुरु मानलं होतं हेही स्पष्ट होतं.

*कैवल्याचा पुतळा । प्रगटला भूतळा ।*
*चैतन्याचा जिव्हाळा । ज्ञानोबा माझा ।*
*गुरु सेवेलागी जाण । शरण एका जनार्दन ॥*

असा आपल्या अंतरीचा प्रेमभावही नाथांनी मोठ्या जिव्हाळ्यानं व्यक्त केलाय. आदिगुरु शंकर, मत्स्येंद्र, गोरक्ष, गहिनी, निवृत्ती, ज्ञानदेव या परंपरेनं आलेलं जीवा-शिवाचं ऐक्य मानणारं अद्वैत तत्त्वज्ञान अन् भक्तीच नाथांनी सांगितली असल्यानं - ज्ञानदेवांनी भागवतधर्म मंदिराचा पाया रचून सर्वसामान्य माणसालाही भक्ती-मुक्तीचा समान अधिकार असल्याची जी ग्वाही दिली त्या भागवत धर्माला नाथांनी आपल्या कार्यानं आधारस्तंभ देऊन बळकट केलं असं जे संत बहिणाबाई यांनी एका अभंगातून वर्णन केलंय त्याचाही प्रत्यय येतो.

भागवतधर्माच्या आधारे समाजाला खऱ्या माणुसकी धर्माचेच धडे गिरवायला लावण्यासाठी नाथांनी आपल्या भागवत भावार्थरामायण, रुक्मिणी स्वयंवर आदि प्रबंध ग्रंथांपासून तो हरिपाठातील अभंगांपर्यंत जे जे भावलं ते ते रचना माध्यम म्हणून स्वीकारून मराठी शारदेची अनेक दालनं त्यांनी आपल्या साहित्यानं समृद्ध केली.

जे जे भेटेल भूत । ते ते मानिजे भगवंत ॥

असा समभाव समाजाच्या अंतरी ठसावा म्हणून अवघं आयुष्य वेचलं. वाळवंटात तापलेलं अंत्यजाचं मूल कडेवर उचलून घेणं, तहानलेल्या गाढवाला गंगाजल पाजणं, भुकेलेल्यांना श्राद्धान्न वाटून देणं आदि एकनाथी चरित्रातील प्रसंगातून जसा नाथांच्या अंतरीचा सर्वांभूती समभाव प्रत्यक्ष आचारातून ओथंबताना दिसतो तसा त्यांच्या संपूर्ण वाङ्मयातूनही तो ठायी-ठायी निथळताना गवसतो. कधी तो संत चोखोबांच्या चरित्र रचनेतून चोखोबांना 'माझ्या जीवीचा जीवलग' म्हणून जातो तर कधी 'तुझे नि माझे माय-बाप एकच असल्याचं जोहार' सारख्या भारुडांतून, हिंदू व तुर्क संवादासारख्या रूपकातून कधी ठासून व्यक्त होतो. त्यादृष्टीनं पाहू जाता नाथांचं हे क्रांतिकार्य समाजाला आजही अत्यंत प्रेरणादायी असंच आहे. सर्वसमभावाची, परस्परप्रेमभावाची स्फुल्लिंगं सतत तेवती ठेवण्यातच त्यांचा खरा आठव नाही काय?

डॉ. सौ. कुमुद गोसावी
'स्नेहकुंज', ११ सरस्वती कॉलनी पूर्व,
औरंगाबाद ४३१ ००१. दूरभाष : ३३४२९०

# शांतिब्रह्म : एकनाथ

**डॉ. मंगला वैष्णव**

प्रपाठक आणि विभागप्रमुख (मराठी) सरस्वती भुवन कला व वाणिज्य महाविद्यालय औरंगाबाद. 'संत कवी शिवदीन केसरी व्यक्ती आणि वाङ्मय प्रबंध प्रकाशित १९८४' लेखन, व्याख्यान देणे हा छंद. भूतपूर्व पंतप्रधान मा. श्री. अटलबिहारी बाजपेयी यांच्या कवितांचा मराठी अनुवाद केला असून त्या कविता प्रकाशित होण्याच्या मार्गावर आहेत.

**एकनाथकालीन समाजस्थिती**

चौदाव्या शतकाचा उत्तरार्ध हा संत एकनाथांच्या कर्तृत्वाचा कालखंड होय. या कालखंडात जवळ-जवळ भारतभर यवनी राजसत्तेचे जाळे हळमूल झालेले होते. राष्ट्र पारतंत्र्याच्या ग्रहणाने ग्रासले होते. धर्माला ग्लानी आली होती. लोकांच्या मनात मरगळ दाटली होती. समाजाचे आचार, विचार आणि भाषा राजसत्तेच्या तंत्राने चालताना दिसत होती. पारंपारिक समाजोद्धारक सामाजिक संस्था निष्प्रभ झाल्या होत्या. अशा बिकट परिस्थितीत एकनाथांनी समाजाला संघटित आणि सुस्थिर करण्याचा कृतिशील प्रयत्न केला. वादळात सापडलेल्या संस्कृतीचे तारू नाथांसारख्या तत्त्ववेत्त्या आणि कृतिशील संताने सावरण्याचा प्रयत्न केला.

बहामनी काळाच्या अस्मानी सुलतानी संकटाने ग्रासलेल्या महाराष्ट्राला आपल्या ग्रंथ बळाने, विचार बळाने आणि आचार बळाने दिशा दाखविली. कोणत्याही का कारणाने असेना किंकर्तव्यमूढ झालेल्या समाजाला उन्नतीचा, प्रगतीचा, स्वोद्धाराचा केवळ कोरडा उपदेश देण्यापेक्षा कृतिशीलतेकडे प्रवृत्त करणे, एकनाथांना महत्त्वाचे वाटत होते. त्या दृष्टीने त्यांनी समानतेच्या तत्त्वावर उभारलेल्या भागवत संप्रदायाची फेर उभारणी केली. आपल्या जीवन शैलीतून समाजासमोर आदर्श निर्माण केला.

*"नाना मते पाखंड । कर्मठता अति बंड*
*तयांचे ते ठेवणे तोंड । हरिभजने ॥"*

एकनाथी अभंगगाथा - आवटेप्रत - १४२

**कुलपरंपरा**

पैठणच्या श्रेष्ठ अशा भागवतभक्त संत भानुदास महाराजांच्या कुळात एकनाथांचा जन्म झाला. पूर्वपरंपरेने भानुदासाच्या कुळात हरिभक्तीची परंपरा होती. तिचा स्त्रोत एकनाथांपर्यंत आला, ह्यात नवल ते काय? भक्तीचे बाळकडू एकनाथांना लहानपणापासूनच मिळाले होते. एकनाथांना बालपणातच माता-पित्याच्या कृपाछत्राला पारखे व्हावे लागले. तरीही आजी-आजोबांनी आपल्या या नातवाला वात्सल्याची उणीव भासू दिली नाही. उलट या नातवाला दुधावरच्या सायीसारखे जपले आणि उत्कृष्ट संस्कार केले. घरात सातत्याने चालत असलेल्या प्रवचन कीर्तनातून भगवत्भक्तीचा संस्कार एकनाथांवर आपोआप होत गेला. त्यामुळे एकनाथांच्या ठिकाणी मुळात असलेली भक्तिभावनेची वेल, ह्या संस्कारांनी बहरास आली. नाथांची भक्ती डोळस आणि समाजसन्मुख अशी राहिली. त्यांच्या मनात स्वोद्धाराबरोबर समाजोद्धार झाला पाहिजे, असा विचार सतत असे. केवळ शब्द पांडित्याने हे होणार नाही. समानतेच्या विचारांची पाळेमुळे समाजमनात रुजवायची असतील तर त्या समाजमनाचा विश्वास आपल्या वागण्यातून मिळवला पाहिजे असे त्यांना वाटे. स्वतःच्या मार्गदर्शनासाठी आधी आपणच गुरूंचा धांडोळा घेतला पाहिजे. त्यांच्या मार्गदर्शनाने लोकांना दिशा दाखविता येईल अशा विचारांनी एकनाथांना ग्रासले. नाथांनी गुरु प्राप्तीचा मार्ग चोखाळला.

**सद्गुरू**

आध्यात्मिक मार्गात सद्गुरूला अनन्य साधारण असे महत्त्व आहे. सद्गुरुप्राप्तीची पहिली पायरी म्हणजे गुरुसेवा. गुरुप्राप्तीच्या ओढीने एकनाथ पैठणहून निघाले ते थेट देवगिरीस आले. तिथे जनार्दन स्वामींची सेवा त्यांनी आरंभली. सेवेने तृप्त झालेल्या स्वामींनी एकनाथांवर कृपा केली. गुरुंसमवेत एकनाथांनी गीता, भागवत, उपनिषदे, योगवासिष्ठ इ. ग्रंथांचे वाचन, चिंतन, मनन आणि परिशीलन केले. त्या ग्रंथातील विचार आपल्या अंगी उतरविण्याची पराकाष्ठा केली. सद्गुरुंच्या आज्ञेने एकनाथांनी तपश्चर्या केली. तीर्थयात्रा केल्या. तपश्चर्येने नाथांच्या ठिकाणी असलेल्या संदेहांचा निचरा झाला. तीर्थयात्रेच्या निमित्ताने समाजाचे, समाजमनोवृत्तीचे, आचार-विचारांचे निरीक्षण नाथांना करता आले. या अभ्यासामुळे नाथांना आपल्या जीवनातील पुढील कार्याचा आराखडा आपल्यासमोर तयार करता आला.

एकनाथांचे लौकिक गुरु जनार्दनस्वामी असले तरी मानस गुरु संत ज्ञानेश्वर आहेत. तेराव्या शतकात भागवत संप्रदायाचे सामाजिक समतेचे जे कार्य ज्ञानेश्वरांनी सुरू केले होते ते मध्यंतरीच्या कालखंडात काहीसे खंडित झाले होते. ते कार्य एकनाथांना पुढे न्यायचे होते. त्या दृष्टीने त्यांच्या कार्याची वहिवाट सुरू होती.

ज्ञानेश्वरांनी तेराव्या शतकात आपला विचार परंपरागत कर्मकांडात, मठामंदिरात बंदिस्त न करता अठरापगड जाती असलेल्या बहुजन समाजापर्यंत नेला. नुसता नेला नाही तर त्यांच्या मनःकोषात बिंबवला. ज्ञानेश्वरांचे हे कार्य एकनाथांनी आपल्या काळात कृतिशीलतेतून पुढे नेले.

*"ज्ञानदेवे येऊनि स्वप्नात । सांगितली मात मजलागि*
*दिव्य तेजःपुंज मदनाचा पुतळा । परब्रह्म केवळ बोलतसे।*
*अजान वृक्षांची मुळी कंठास लागली । येऊनी आळंदी काढ वेगी ।*
*एका जनार्दनी पूर्व पुण्य फळले । श्री गुरू भेटले ज्ञानेश्वर।"*

ह्या अभंगाचा अभिधाशक्तीने जो अर्थ सांगितला जातो तो असा की, ज्ञानेश्वरांच्या आळंदी येथील समाधीस अजानवृक्षाच्या मुळीचा

बिळखा बसला होता. तो काढण्यासाठी नाथांना ज्ञानेश्वरांनी स्वप्नात सांगितले. या अर्थापेक्षा वरील अभंगाचा रूपकात्मक अर्थ आपण घेतला तर तो अधिक चपखलपणे लक्षात येतो, तो असा, एकनाथकालीन समाजमनावर अज्ञान, अंधश्रद्धा, कर्मकांडे इ. मुळ्या खोलपर्यंत गेल्या होत्या. ह्या सर्व गोष्टीत अडकलेल्या समाजाला ज्ञानी करावयाचे असेल तर काही वेगळा कृतिशील विचार त्यांच्यासमोर ठेवणे आवश्यक होते. ते कार्य नाथांनी केले. ते कार्य एकनाथांच्या कृतिउक्तीतून समाजासमोर आले. आदर्श गृहस्थाश्रमाचा वास्तुपाठ लोकांसमोर एकनाथांच्या गृहस्थधर्माच्या माध्यमातून आला. अशा रीतीचा वेगळा अर्थ वरील अभंगाचा काढला तर एकनाथांच्या कार्याचे वेगळेपण सहज दृगोचर होते. एकनाथ काळात प्रतिकारशून्य झालेल्या हिंदू समाजामध्ये कार्यक्षमता आणि अस्मिता जागविण्याचे दुष्कर कार्य नाथांना करावयाचे होते. यासाठी कोणाची मदत वा सहानुभूती मिळेल, ही त्यांना अपेक्षा नव्हती. आपण आपले कार्य आपल्या वागण्यातून करावे, आचरणातून दाखवावे, त्याचा परिणाम समाजावर होईल आणि तो आचार-विचार समाजाला पटला तर तो विचार समाज पटकन उचलून धरेल हीही खात्री त्यांना होती. एकनाथांची ती खात्री सार्थ होती. त्यांच्या काळापूर्वी निष्प्रभ झालेल्या धर्म, भाषा, वाङ्मय आणि संस्कृती इ.ना नाथकाळात चैतन्य मिळाले. लोकांच्या मनातील आपल्या संस्कृती, धर्म इ. विषयीची अस्मिता पुनर्जागृत होत होती. या सांस्कृतिक पुनरुज्जीवनाचे प्रवर्तक एकनाथ होत. स्वोद्धार आणि लोकोद्धार करण्यासाठी काही वेगळे प्रयास करण्याची आवश्यकता नाही, घर-संसार सोडून कुठेही जावे लागत नाही. विहित कर्मे, गृहस्थधर्म करीत असतानाही आपले ईप्सित साध्य करता येते असा त्यांचा विश्वास होता.

*"गृहाश्रमु न सांडिता । कर्मरेखा नोलांडिता*
*निज व्यापारी वर्तता । बोधु सर्वथा न मेळे ॥"*

(ए. भा. ९-४३५)

एकनाथांच्या जीवनशैलीतून प्रपंच आणि परमार्थ यांचा समन्वय आढळतो. त्यांनी आचारांची शुद्धता राखून कर्मठपणाचे बंड मोडले. पांडित्याची प्रतिष्ठा वाढवून पढिकतेचे स्तोम कमी केले. प्रेमळपणा , सौजन्य आणि शांती या स्वतःच्या सहज गुणांनी लोकांच्या मनात प्रेम निर्माण केले.

*"की ते भूत दयावर्ण । की माहेरा आली कणव"*

(एक. भाग. १-३२)

एकनाथांनी केलेले संतांचे वर्णन त्यांना स्वतःस तंतोतंत लागू पडते. कोणत्याही गुणांचा अतिरेक त्यांच्या चरित्रात आढळत नाही. अचल तत्त्वनिष्ठा, ठाम विचारसरणी आणि त्याबरहुकूम कृतिशीलता हे नाथांच्या स्वभावाचे स्थायीभाव होत. आपला विचार लोकांसमोर सांगताना प्रखरता आणि अभिनिवेष यापेक्षा सौम्यता आणि ऋजुता यांचा नाथ आश्रय घेतात. परंपरेचा बोज राखून लोकांचा बुद्धिभेद न होऊ देता धीमेपणाने, संयमाने, निरलसपणाने समाज जीवनात सुधारणा आणावी असा त्यांचा विश्वास होता.

*"जो सद्‌भावो संतचरणी । तोच भावो ब्राह्मणी"*
*या उक्तीतून त्यांच्या समतोल विचारांचे दर्शन घडते.*

**एक हरीआत्मा**

कोणत्याही घरात जन्म झाला तरी त्या जन्माने व्यक्त होणाऱ्या भेदाची प्रतिष्ठा ज्ञानी माणसाने बाळगू नये. कारण सर्वांचा आत्मा एकच असतो, त्याचा आदर केला पाहिजे. केवळ माणसांपुरता हा नियम नसून पशु-पक्षांदिकांच्या संदर्भातही हे जाणले पाहिजे. "आत्म्याच्या एकत्वाचे रहस्य जाणून जाणत्या पुरुषाने आपले वर्तन सर्वांसाठी समदृष्टी या न्यायाने ठेवावे", हा विचार एकनाथांनी केवळ सांगितला नाही तर कृतीतून दाखविला. तीर्थयात्रा करीत असताना काशीची गंगा दक्षिणेत रामेश्वरास अर्पण केली म्हणजे पुण्यसंचय होतो, असा समज होता. एकनाथांनी गंगा घेऊन रामेश्वराकडे जात असताना तहानेने व्याकूळ झालेले गाढव रस्त्यात पाहिले. त्याची ती तहानेची धडपड त्यांना स्वस्थ बसू देईना. 'सर्वाभूती आत्मा' हे तत्त्व लक्षात घेऊन त्या गाढवास गंगोदक पाजले, त्याचा आत्मा तृप्त केला. तीर्थयात्रेतील बरोबरच्या लोकांना आश्चर्य वाटले. परंतु नाथांना कर्तव्यपूर्तीचे, कृतिउक्तीच्या ऐक्यतेचे समाधान वाटले असावे. ही कथा सत्या-सत्यतेच्या कसोटीवर घासणे न घासणे यात स्वारस्य नाही. आत्म्याचे एकत्व आहे, हा विचार नाथांनी आपल्यावरील कृतीतून दाखविला. नाथांच्या विचारांची साक्ष देणारी ही कथा जीवनमूल्याचा आदर्श समाजापुढे ठेवणारी आहे हे निश्चित.

नाथकाळात वर्णाश्रमधर्म फार काटेकोरपणे पाळला जात होता. सर्वज्ञ नाथ मात्र कर्मकांडातील वर्णाश्रम धर्माचे फोलपण जाणत होते. सर्वाभूती आत्मा एकच आहे, याचे ज्ञान त्यांना झालेले होते. त्यामुळे त्यांची वागणूक सर्वांशी समान होती. जशी ब्राह्मणांशी तशीच अंत्यजांशी. नाथांच्या घरी श्राद्धाची पाकक्रिया चालू असताना त्याचा दरवळ रस्त्यावरून जाणाऱ्या महारांच्या नाकात शिरला. 'काय हे चविष्ट अन्न' असा विचार महारांच्या मनात आला. नाथांनी संपूर्ण महारवाडा जेऊ घातला. श्राद्धाची पुन्हा पाकक्रिया केली. ब्राह्मण श्राद्ध करण्यास आले नाहीत. नाथांनी खेद मानला नाही.

असेच एकदा गोदावरीच्या तीरावर उन्हात रडणाऱ्या मुलाला नाथांनी कडेवर घेतले. त्याला त्याच्या घरी पोहोचवले. ते मूल कडेवर घेताना ते कोणाचे मूल? हा विचार नाथांच्या मनात शिवलाही नाही.

'सर्वाभूती भगवंत' ही भावना आपल्या कृतिउक्तीतून बाळगणाऱ्या नाथांनी समाजाची पर्वा न करता कर्मकांडाच्या भिंती ओलांडल्या. नाथांच्या या कृती वंदनीय आहेत. त्यांच्या रक्तात समभावाचे विचार किती खोलवर रुजले होते याचा प्रत्यय या दंतकथांमधून येतो. आपल्या बिछान्यात येणाऱ्या वडाऱ्याचा सत्कार करणे, आजारी महाराची सुश्रुषा करणे अशा नाथजीवनातील अद्‌भुत चमत्कारांच्या दंतकथा नाहीत तर त्यांच्या संतत्वाचा साक्षात्कार दाखविणाऱ्या कथा आहेत. त्यातून त्यांची विचारसरणी आणि सर्वांकडे समानतेने पाहण्याचा विशाल दृष्टिकोन प्रत्ययास येतो. नाथांचे असे आचरण तत्कालीन सामाजिक परिस्थितीकडे पाहता चमत्काराप्रमाणे अद्‌भूत वाटणारे आहे. त्यांच्या काळात समाजात तत्त्वज्ञान आणि आचरण

यातील तफावत दिसून येत होती. ती तफावत नाथांनी आपल्या वागण्यातून दूर करण्याचा कृतिशील प्रयत्न केला हे त्यांचे वेगळेपण आहे.

**शांतिब्रह्मनाथ**

आपल्या विरोधकांना शांतीने आणि संयमाने तोंड देणे हा तर नाथांचा स्वभावविशेष होता. असेच एकदा नित्यनियमाप्रमाणे एकनाथ गोदावरीवरून स्नान करून येत असतात. घाटावर नाथांच्या अंगावर एका यवनाने थुंकी टाकली. नाथांनी पुन्हा गोदावरीत जाऊन स्नान केले. पुन्हा-पुन्हा ती घटना घडत होती. एकनाथ अविचल आणि शांत होते. असे म्हणतात की असे एकशेआठ वेळा झाले. शांतिब्रह्म नाथांची अविचलता पाहून त्या यवनाला आपल्या कृतीची शरम वाटली. त्यांनी नाथांची क्षमा मागितली. "तुझ्यामुळे मला आज पुण्यमय गोदावरीचे एकशेआठ वेळा स्नान झाले. उलट तुझेच माझ्यावर अनंत उपकार झाले आहेत." शांतिब्रह्माने काढलेले हे शब्द त्यांच्या श्रेष्ठतेचे द्योतक आहेत. त्यातून नाथांचे अलौकिकपण दिसते. समाजाचा प्रतिकार, छळ सोसतानाही शांती, क्षमा, दया, तितिक्षा, अक्रोध, इ. गुणांपासून एकनाथ विचलित झाले नाहीत. हे त्यांचे वेगळेपण जाणवल्यावाचून राहत नाही.

त्याचबरोबर तत्कालीन परिस्थितीचे दर्शन या दंतकथेतून घडते. यवनी राजसत्तेचा इतका जोर होता की सामान्य नागरिक उद्दामपणाने नाथांसारख्या ज्ञानी माणसाला अशा प्रकारचा त्रास देण्याची हिम्मत करू शकतो ? अशाही परिस्थितीत एकनाथांनी आपले जीवित कार्य केले. अशा कित्येक बोलक्या दंतकथा नाथांचे वेगळेपण दाखविणाऱ्या आहेत.

त्यांनी आपल्या विचारांचा प्रसार आपल्या ग्रंथांमधूनही केला. तिथेही त्यांच्या शांत स्वभावाचे पडसाद दिसतात. त्यांच्या साहित्यात शांतरस आणि भक्तिरस यांचेच आधिक्य आढळते.

*"परमर्थाची मुख्यत्वे स्थिती*
*पाहिजे गा परम शांती"*

या एकनाथांच्या उद्‌गारास स्वानुभूतीची धार आहे.

स्वतःविषयी एका अभंगात नाथांनी म्हटले आहे, "माझा जन्म मूळ नक्षत्रावर झाला, मी माझ्या आई-वडिलांना गिळले, मूळ नक्षत्राची शांती करता अवघ्याची शांती झाली."

आत्मचरित्रात्मक अभंग म्हणून या अभंगाचे वेगळे मोल असले तरी "अवघ्याची शांती" या शब्दाचा अर्थ मला तरी अवघे जग शांतिमय आणि प्रसन्न होण्यासाठी तळमळणारे शांतिब्रह्म नाथ जाणवतात. नाथांच्या जीवनात प्रवृत्ती आणि निवृत्ती हातात हात घालून जात आहेत. ब्रह्मसाक्षात्कार व्हावयाचा असेल तर शांतिब्रह्म आधी आत्मसात होणे आवश्यक कसे आहे, जीवनात तोल न ढळू देता शांतीच्या पायघड्यांवरून जाणे कसे योग्य आहे, हे नाथांच्या व्यक्तिमत्त्वातून जाणवत राहते. त्यातूनच त्यांचे वेगळेपण लक्षात येते.

डॉ. मंगला माधव वैष्णव M. A. PH. D.
वैष्णव निवास
५/६/३९/२, नवीन उस्मानपुरा,
औरंगाबाद





# नाथांची कृष्णभक्ती

चंद्रहास जोशी

भूतपूर्व संपादक पुरुषार्थ मासिक पारडी, गुजराथ. २० वर्षे मराठी विश्वकोश वाई येथे संपादक. संत वाङ्मय, तत्त्वज्ञान, वेदवेदांत, भारतीय हस्तकला, आयुर्वेद, सौंदर्यप्रसाधने या विषयांची आवड, लेखन, संपादन. लहान-मोठ्या पुस्तकांची निर्मिती, बालवाङ्मय, संस्कार व मराठी व्याकरण इ. अनेक पुस्तकांचे लेखन.

नाथांची गुरु परंपरा म्हणजे दत्तोपासना होय. श्री जनार्दन स्वामींनी नाथांना साक्षात श्री दत्तात्रेयाचे दर्शन घडविले आणि आपल्या नाथ परंपरेप्रमाणे त्यांची ब्रह्मानंदी टाळी ही वाजविली. तथापि आत्मदर्शनानंतरही सगुणोपासना करून भगवंताच्या नामसंकीर्तनाचा लाभ घेणेच उचित आहे असे म्हणून श्री जनार्दन स्वामींनी त्यांना देवगिरी सान्निध्य असलेल्या शुलभंजन पर्वतावर "जाण्याची आज्ञा केली व सांगितले की, तेथील सूर्यकुंडात तू स्नान कर व नंतर विष्णूरूप पांडुरंगाचे ध्यान करीत बस. कोणाशीही बोलू नकोस की तू स्वतः कोणाला काही मागू नकोस. कोणी काही दिले तर त्याचे ग्रहण कर" आणि पुढे म्हटले की, "तुला जर काही दिवसांनंतर एखादी अपूर्व घटना घडलेली दिसली, तर मात्र तू माझ्याकडे परत ये."

नाथांनी गुरुआज्ञा शिरसावंद्य मानून तसे केले आणि एक मोठा चमत्कारिक प्रसंग घडला. त्या पर्वताशेजारील एका गावातील एक शेतकरी नाथांना दररोज धारोष्ण दूध आणून देई. त्याचे ते ध्यान धारणेनंतर ग्रहण करीत. एकदा ठराविक वेळेपूर्वीच तो शेतकरी तेथे आला व तो चमत्कारिक प्रसंग पाहून थक्क झाला.

एक मोठा साप नाथांजवळ आला. त्याच्या मनात नाथांना दंश करण्याचे होते. पण नाथांच्या अंगस्पर्शाने त्याचा वृत्तिपालट झाला व तो शांत होऊन नाथांवर फणा धरून त्यांच्या शरीराला विळखा घालून बसला.

ते भयंकर दृश्य पाहून तो शेतकरी घाबरला. त्याने आरडा-ओरडा करायला सुरुवात केली. त्यामुळे साप निघून गेला व नाथांची समाधीही भंग पावली. नाथांनी शेतकऱ्याला आरडा-ओरडा करण्याचे कारण विचारले, तेव्हा त्याने घडलेला वृत्तांत कथन केला. त्यावर नाथ बोलले -

*आम्हा डंखू आला काळ । तोचि जाहला कृपाळ ।।*
*भली ओळखी झाली आता । चित्त मिनलेसे चित्ता ।।*
*देही देह फिटला देहभावो । तेथे काळाचि झाला वावो ।।*
*एका जनार्दनाचे पायी । जिण्यामरण्या गौरव नाही ।।*

या चमत्कारानंतर नाथ श्री गुरुंकडे परत आले. त्याच वेळी त्यांना सगूण निर्गुणातीत भक्तीचा नीट उलगडा झाला व त्यांनी तो स्वानुभव एका हिंदी पदातून शब्द बद्धही केला.

निर्गुण निराकार परमेश्वरच सगुण साकार झाल्यावर तो या पंचमहाभूतात्मक जगात अनेक लीला करतो आणि आपल्या अनंत, अपार गुणांची साक्ष पटवून देतो असा विचार नाथांनी केला आणि सगुण साकार परमेश्वराच्या लीला वर्णनातून त्याचे अबाधित्वही सिद्ध केले. ते करीत असतानाच त्यांनी आपल्या विठ्ठलभक्तीची परंपराही दाखवून दिली. ते म्हणतात,

*माझ्या वडिलांचे दैवत । कृपाळू हा पंढरीनाथ ।।*

त्याच विजय विठ्ठलाची ते आराधना करीत व नित्य पूजा-अर्चाही करीत. त्यांच्या मते विठ्ठल दैवत हे वेदांनाही ज्याचा अंतःपार कळत नाही आणि जो सारांचे सार व गुह्यांचे गुह्य आहे अशा परात्पर परब्रह्माचे ते साक्षात स्वरूप आहे. नाथ म्हणतात -

*सगुण निर्गुण । बुंथीचे आवरण ।*
*ब्रह्म सनातन । पंढरीये ।।*

याच विठ्ठलाला त्यांनी 'हरी', 'कान्हा', 'गोपिकेचा पती' व 'सावळा श्रीकृष्ण' या नावांनी आळविले आहे आणि भागवत धर्माचा प्रसार करून श्रीकृष्णाच्या सगुण भक्तीचे रहस्य उलगडून दाखविले आहे. नाथ म्हणतात,

*संसारी जन्मोनी झालो त्याचा दास । माझा तो विश्वास पांडुरंगी ।।*
*भ्रमर सुवासी, मधावरी माशी । तैसे या देवासी मन माझे ।।*
*आणिका देवासी ने घे माझे चित्ता । गोड गाता गीत विठोबाचे ।।*

याच विठ्ठलाला धरून नाथांनी ज्या गौळणी रचल्या त्यात भक्तीभावाचा व काव्याचा एक अतिउत्कट मेळ आहे. ताला-सुरावर व टाळ मृदुंगाच्या निनादात त्या रंगून गेल्या आहेत. तो याच विठ्ठल भक्तीचा त्यांनी पाडलेला एका वेगळाच पैलू आहे.

हा गोपबाळात व गवळणीत मिसळून जाणारा मुरलीमनोहर प्रेमलक्षणाभक्तीचे एक उत्कृष्ट चित्र लोकमानसावर उमटवितो, तर वात्सल्य व मधुरा भक्तीचे एक विलोभनीय चित्र हृदयपटलावर रेखाटून जातो. ते कसे पाहा.

*अधरी धरूनी वेणू । वेणू वाजविला कोणी नेणू ।।*
*प्रातःकाळी तो वनमाळी । घेवूनी जातो धेनू ।*
*उभी मी राहे, वाट मी पाहे । केव्हा भेटेल मम कान्हु ।।*
*एका जनार्दनी वाजविला वेणू । ऐकता मन झाले तल्लिनू ।।*

भक्ताच्या मनातील आर्तता, अधीरता व समरसता अशा गौळणीतून मूर्तीमंत उभी राहते.

नाथांची कृष्णमूर्ती म्हणजेच हा श्रीविठ्ठल होय. हे तत्त्व नाथांनी कसे उलगडले पाहा.

*कृष्णमूर्ति होय गे । फळो आली सोय गे ॥*
*प्राणाचाही प्राण पाहता । सुख सांगो काय गे ॥*
*पितांबराची कास गे । कासिशी सावकाश गे ॥*
*नारद तुंबर गायन करीती । पुढे निजदास गे ॥*
*भक्त कृपेची माय गे । ओळखो आली विठाइ गे ॥*
*एका जनार्दनी विटे । जोडियेले पाय गे ॥*

श्रीकृष्णाच्या गुणाचे, रूपाचे, प्रेमाचे व अवतार कार्याचे वर्णन करताना नाथांची लेखणी कशी बहारीने फुलते-खुलते ते पाहा -

*सुंदर ते ध्यान नंदाच्या अंगणी । गोपाळ गौळणी खेळताती ॥*
*सुंदर ते ध्यान चंद्रभागे तटी । पुंडलिकासाठी ऊभे असे ॥*
*सुंदर ते ध्यान एका जनार्दनी । जनी वनी मनी भरलासे ॥*

नाथांच्या अलौकिक गौळणी जेव्हा लौकिक रूप धारण करतात, तेव्हा तर त्याची सर काही औरच असते. आल्हादिनी राधा जेव्हा लौकिक पातळीवर येते, तेव्हा ती रूपगुणाने कशी दिसते ते नाथांनीच रंगवावे - नाथ म्हणतात -

*वारियाने कुंडल हाले । डोळे मोडित राधा चाले ॥*

या ओळीतून राधेची गतीमानता व तिचे नेत्रसंकेत याचे विलोभनीय दर्शन घडते, तर

*कशी जाऊ मी वृंदावना । मुरली वाजवितो कान्हा॥*

या ओळीतून राधेची मनाची तगमग दृग्गोचर होते. याप्रमाणे भुलविले वेणूनादे । वेणू वाजविला गोविंदे ॥ मनमोहन मुरलीवाला नंदाचा अलबेला ॥

*तुझ्या मुरलीचा ध्वनी । अकल्पीत पडली कानी ॥*
*अधरी धरुनी वेणू । वेणू वाजविला कोणीं वेणू ॥*
*कृष्णरूपी भाळल्या गोपिका नारी । नित्य नवा कृष्ण जीवा आवडतो भारी नको वाजवू रे कानोबा मुरली । तुझ्या मुरलीने सुदबुध हरली रे ॥*

अशा अनेक गौळणीतून नाथांनी श्रीकृष्णाचे ते रूप, राधेची ती तळमळ व त्यातून भक्तीची आस दाखवून मधुराभक्तीचा वास गंधीत केला आहे.

नाथांच्या गौळणीचे आणखी एक वैशिष्ट्य म्हणजे त्या जशा सुरेल म्हणता येतात तशाच काळौघाबरोबर नित्यनूतनच वाटतात. अलिकडच्या भावगीतांप्रमाणे त्यामुळेच रसिकांच्या ह्रदयात त्या सामावून जातात आणि गायकांच्या कंठातून स्त्रवू लागतात.

निर्गुण निराकार ब्रह्माला सगुण साकार करून त्याच्या त्या लीला विग्रहातून नाथांनी उभे केलेले अद्वैत विश्व द्वैत वाटले तरी ते क्षणभरच ! नंतर ते आपल्या मधुरानंदाने धुंद करीत अद्वैतात समरस होते जसा 'थेंबुटा सागरी मिळाला।' तसेच !!

चंद्रहास जोशी
'भाऊबीज', प्लॉट क्र. ८, न्यूज वर्मा ले आऊट,
उत्तर अंबाझरी मार्ग, नागपूर - ४४००१०

# ॥ नाथवाङ्मयातील स्त्रीदर्शन ॥

**डॉ. सौ. पद्मावती श्रीपाद श्रोत्रीय**

एम.ए.पी.एचडी.

यांचे विद्यापिठीय शिक्षण निवृत्तीच्या वयात त्यांनी पूर्ण केले. संत नामदेव अध्यासनात आरंभापासून सेवा कार्य केले. 'संत चोखामेळा आणि त्यांचा परिवार : एक विवेचक अभ्यास' या विषयावर अध्यासन प्राध्यापक व प्रमुख डॉ. अशोक कामत यांचे मार्गदर्शनाखाली १९९२ मध्ये डॉक्टरेट मिळाली.

त्या अखिल भारतीय प्राचीन संत कवयित्रींसंबंधीचे संशोधनात व्यस्त आहेत. पहिले चार खंड महाराष्ट्रातील संत कवयित्रींवरील पूर्ण झाले असून सध्या दक्षिण भारतातील संतस्त्रियांचे परिचयलेखन पूर्ण होत आले आहे. संत साहित्याच्या स्त्री-अभ्यासक म्हणून नुकताच 'याज्ञवल्क्य आश्रम' पुणे या संस्थेतर्फे 'संत मुक्ताई पुरस्कार' देऊन त्यांचा गौरव करण्यात आला.

**आरंभिक :**

श्रीएकनाथ महाराज हे महाराष्ट्राच्या सामजिक व सांस्कृतिक इतिहासातील एक क्रांतदर्शी व्यक्तिमत्त्व होय. ब्रह्मविद्या पारंगत होऊन गुरूच्या आज्ञेने ते पैठणास आले. गृहस्थाश्रमी झाले आणि लोकजागरणार्थ त्यांनी तन-मन-धन वेचले. आमरण कीर्तन-प्रवचने केली. तसेच समाजाच्या सर्व स्तरांतील लोकांसाठी लोकभाषेत नाना ग्रंथ सिद्ध केले. त्याबरोबरच आपल्या आचरणातून सुधारणेचा सक्रिय वस्तुपाठच समाजासमोर ठेवला.

एक सिद्ध सत्पुरुष, एक समाजसुधारक, एक लोकसेवक अशा निरनिराळ्या भूमिकांद्वारे लोककल्याण साधता-साधता नाथांनी महाराष्ट्रशारदेच्या साहित्याचे दालन समृद्ध करण्यास फार मोठा हातभार लावला.

**नाथवाङ्मय**

नाथवाङ्मयात जागोजागी घडणारे स्त्रीदर्शन कशा प्रकारचे आहे ह्याचा मागोवा घेण्यापूर्वी ह्या साहित्यसंपदेचा थोडक्यात आढावा घेणे उचित होईल. नाथसाहित्याचे स्वरूप विस्तृत, चौफेर, विविधांगी आहे. त्याचे प्रत्येकच दालन भव्य आणि आकर्षक आहे. मनाचा वेध घेणारे आहे. ही सारी संपदा सुमारे पाऊण लाखाच्या घरात आहे. त्यांची प्रारंभीची रचना चतुःश्लोकी भागवत. ही सुमारे एक हजार ओव्यांची आहे. भागवत-टीका (१८८८०), रुक्मिणी स्वयंवर (१७१२), आणि भावार्थ रामायण (सुमारे ४०,००० पैकी नाथांच्या ओव्या २५,०००); या तीन प्रमुख रचनांनीच विराट स्वरूप धारण केले आहे. शिवाय पदे, अभंग, मधुराभक्तिपर तसेच रूपकात्मक लेखनही उल्लेखनीय आहे. केवळ भारुडांचीच संख्या ३५० च्या घरात जाते. चरित्रे, स्फुट कथा काव्ये, आरत्या यांसारखी स्फुटरचना समृद्ध स्वरूपात साथीला आहेच.

या सर्व रचनांमध्ये अनुस्युत असणारे समान सूत्र अद्वैत भक्तीचे. हे हाती धरूनच नाथांच्या प्रमुख रचनांचे धावते दर्शन घेत-घेतच त्यांचे स्त्रीविषयक विचार अभ्यासू या.

**नाथ-भागवत**

श्री एकनाथी भागवत म्हणजे ज्ञानेश्वरीनंतर भाष्यग्रंथांचे पुनरुज्जीवन करणारा, भक्तीचा मार्गदर्शक दीपस्तंभच असा सिद्धग्रंथ आहे. श्रीएकनाथ महाराजांच्या सहज समाधीच्या भाषेतील हा महाप्रबंध आहे.

मूळ संस्कृत भागवत ग्रंथातील एकादश स्कंधावर मराठी भाषेत नाथांनी केलेली टीका ते एकनाथी भागवत. ह्याचे अध्याय ३१ : श्लोक १३६७ : ओवीसंख्या १८८००. एका क्रांतदर्शी, साक्षात्कारसंपन्न प्रतिभावंताच्या समाधीभाषेतील हे प्रवचन अपार कळवळ्याने भोळ्या भाविकांच्या उद्धाराच्या प्रेरणेने प्रकट झाले आहे.

'प्राचीन काळात स्त्रीशुद्रांना वेदोक्तशास्त्र श्रवणाचाही अधिकार नाकारण्यात आला होता.' (ए. भा. अ. ५ . ओ. ७३)

वेदांवर पक्षपातिपणाचा आरोप करताना नाथ म्हणतात -

*वेदु अत्यंत कृपणु जाला । त्रिवर्णांचे कानीं लागला ।*
*स्त्रीशूद्रांदिकांसी अबोला । धरून ठेला अद्यापी ॥*
*ते वेदांचे अति न्यून । उद्धरी हरिनामसंकीर्तन ।*
*स्त्रीशूद्र अंत्यज जन । उद्धरण हरिनामे ॥ (ए. भा. अ. ५ . ओ. ४१६, ४१७)*

*'स्त्रियो वैश्यास्तथाशूद्रोस्तेऽपि यान्ति परां गतिम्'*

(गीता अ. ९. श्लोक १२)

श्रीकृष्णाने गीतेमध्ये दिलेल्या या आश्वासनामुळे त्याच्यानंतरच्या काळात परमार्थमार्गात स्त्रियांना अधिकार आहे की नाही, तो किती आहे, कसा आहे इत्यादी चर्चा होऊ लागली. वेदांपेक्षा गीता महत्त्वाची; अधिक शुद्ध कशी ते सांगताना नाथ म्हणतात -

*कृष्णनिःश्वासे जन्मले वेद । गीता स्वमुखे प्रगटली शुद्ध ।*
*यालागी गीतार्थ अगाध । घडीते वेद तेणे जाहले ॥*
*वेदें आप्त केले तिनी वर्ण । दुराविले स्त्रीशुद्र जन*
*न शिवे त्यांचे कान । हे वेदांसी न्यून पै आले ॥*
*ते वेदांचे फेडावया उणे । गीता प्रकट केली श्रीकृष्णे ।*
*गीतेचे श्रवणपठणे । उद्धरणे समस्तां ॥*

(ए. भा. अ. ३१ : ओ. २८०, २८१, २८२)

ज्ञानध्यानयोगादी इतर परमार्थमार्ग स्त्रीशूद्रादिक जनसामान्यांना

समजणे अवघड आणि आचरण्यास कठीण; म्हणून भागवत धर्मात प्रामुख्याने त्यांचा विचार समोर ठेवला गेला. सहिष्णुता आणि व्यापक दृष्टिकोनातून भागवत धर्माची उत्पत्ती व वृद्धी झाली. अर्थात भागवत धर्माची स्त्रीविषयक भूमिका सहानुभूतिपूर्ण असणे ओघानेच येते.

## सहानुभूतीचे उद्गार

एकनाथांनी अनेक ठिकाणी आपली स्त्रीविषयक सहानुभूती या ग्रंथात व्यक्त केली आहे.

*'स्त्री शूद्रा आघवे । घालूनिया (भागवतरूपी) नावे ।*
*एकच खेपे स्वयें न्यावे । भजन भावे परतीरा' ॥ (ए. भा. अ. २ : ओ. ३०२)*
*'कलियुगी बहुसाल नर । होतील नारायणी तत्पर ।*
*भक्तीचे भोज विचित्र । स्त्रीशूद्र माजविती ॥' (ए. भा. अ. ५ : ओ. ४५० )*

पुढे २५ व्या अध्यायात श्रीकृष्णाचे आश्वासन दिले आहे -

*हे भागवतींचे अतिगुह्य ज्ञान । मुख्यत्वेसी भक्तिप्राधान्य*
*भावे करितां माझे भजन । स्त्रीया शूद्रजन उद्धरली (२५ : ४२३)*
*'जननीजठरी ज्यासी जनन । त्यासी नाव बोलिजेतीजन'*

अशी 'जन' शब्दाची व्याख्या नाथ सांगतात. त्याचप्रमाणे 'आला' 'आली' असा भेद नसल्याचे अनेक वेळा सांगून स्त्री-पुरुष समानता आपल्याला मान्य असल्याचे त्यांनी दर्शविले आहे. (ए. भा. अ. ११-ओ. ३६७; अ. ३ - ४४७; अ. ८-८७; अ. १० -२४३, २४४; २५-१६४)

पण पुढे २६ व्या अध्यायात स्त्री-पुरुषी आला एक... असे म्हणून लगेच त्याच्या पुढच्याच चरणात 'स्त्रीरूप तेथ आविधक' असे उद्गार नाथ काढतात. स्त्रीरूपाच्या अविधकत्वामुळेच स्त्रीनिंदा फार ठिकाणी झालेली आहे.

## स्त्रीनिंदा

नाथभागवतातच काय पण बहुतेक सर्व अध्यात्मपर ग्रंथांत स्त्रीनिंदाच विशेषत्वाने आढळते. संतांचा सहानुभूतीपूर्ण दृष्टिकोन जाणवला तरी मनावर ठसा उमटतो तो या स्त्रीनिंदेचाच ! स्त्रीचा संग कोणीही, कधीही, कोठेही करू नये हीच गोष्ट पुनः पुन्हा ठसविली जाते. त्या दृष्टीने नाथभागवतातील पुढील उद्गरणे महत्त्वाची ठरतात.

*'सोलिव मोहाचे रूप । ते जाण योषितास्वरूप ।*
*त्याहीवरी खटाटोप । वस्त्रें पडप भूषणे ।' (अ. ८. ओ. ८४)*
*'मूळ नाशासी जीविता । कनक आणि योषिता ॥' (अ. ८-१११)*
*'स्त्री ते जाण अग्निकुंडासमान । पुरुष तो घृतकुंभ जाण ॥' (१७-३४६)*
*त्यागावी कामीनी संगती । हा मुख्य त्याग परमार्थी (१७-३४९)*

सातव्या अध्यायात दुहिता, निजभगिनी, स्त्रीपुत्र यांचा त्याग करावा असा उपदेश श्रीकृष्णाने उद्धवाला केला आहे. याच अध्यायातील कपोत-कपोतीच्या कथेचे सार म्हणजे स्त्रीची आसक्ती हेच संसारदुःखाचे मूळ आहे. (अ. ७. ओ. ५४६ ते ६३४)

*स्त्री आठवितांची चित्ता । उच्छेदी ज्ञान ध्यान अवस्था ।*
*एवढी स्त्रीसंग बाधकता । . . . . (ए. भा. १४ - ३७५)*
*स्त्री देखताचि अवचिती । तत्काळ पाडी अधःपाती ।*
*तिची जाहलिया संगती । कैंचि धडगती सज्ञाना ॥ (ए. भा. अ . २९. ५६४-५६५)*

म्हणून स्त्रियांशी संवाद नको; त्यांचे मुखावलोकन नको; त्यांचे शब्दही कानी घेऊ नकोस (५६८) त्यांच्याशी मात, एकांत, संगत नको; (५६९) अनुवाद किंवा बोधही त्यांना करू नको (५७०). अशा तीव्र शब्दांत परमार्थमार्गात स्त्रीचा निषेध नाथांनी केला आहे.

स्त्रियांसंबंधीचे असे विचार प्रकट केल्यानंतर येणारी प्रांजल शंका म्हणजे 'सात्त्विक स्त्रीसुद्धा उपदेशास पात्र नाही का?' यावर अधिकार पाहून त्यांनाही उपदेश द्यावा असे स्पष्ट प्रतिपादन आढळते.

*'ज्यां ज्या का निंदिल्या वनिता । त्यामाजी समाग्या सात्त्विकता सांडूनिया विषयावस्था । जे परमार्था उद्यत ॥'*
*' अतिथी आणि पतिपुत्रांसि । भोजनी नित्य समता जिसी।*
*धनलोभ नाही मानसी । परमार्थी तिसी अधिकारु ॥'*
*'क्षत्रिय वैश्य स्त्रीशूद्रजन । यांची सत्श्रद्धा दृढ पाहून ।*
*उपदेशिता ब्रह्मज्ञान । दोषनिर्दळण शिष्यांचे ॥'*
*'पाहावाया पात्रशुद्धता । मी बोलिलो दोषवार्ता ।*
*वांचूनि ब्रह्मज्ञान उपदेसिता । दोष सर्वथा असेना ॥'*
*(ए. भा. अ. २९ - ५७१ ते ५९०)*

तात्पर्य, स्त्रीनिंदा करूनसुद्धा पात्रशुद्धता पाहून स्त्रियांना ब्रह्मज्ञानाचा उपदेश करण्यास हरकत नाही असा निःसंदिग्ध विचार येथे मांडलेला आढळतो.

परमार्थमार्गातील विशिष्ट तत्त्वज्ञानाचा पुरस्कार करताना नाथांनी विषयाची उकल करण्यासाठी जी अनेक उदाहरणे घेतली आहेत त्यांमधून तत्कालीन स्त्रीजीवनाच्या लौकिक बाजूवर विशेष प्रकाश पडतो. माता, पत्नी, भगिनी, दुहिता अशा विविध भूमिकांद्वारे होणारे स्त्रीदर्शन मोठे हृद्य आहे.

मातृप्रेमाचा निर्देश गौरवपूर्ण शब्दांत करून नाथांनी माता चिरंजीव केली आहे. नाथभागवतात माता हे उपमान घेऊन २४ ठिकाणी रुपके केली आहेत. त्यांच्या दृष्टांतांमध्ये मातेच्या वत्सलतेचे उल्लेख सर्वाधिक आहेत. पुत्रजन्माने आनंदलेली माता 'बाळाचे मुखवटे' लागताच स्वानंदभराने लोटणारा अनिवार पान्हा (ए. भा. ११-४२०) कधी बाळाने न मागताच स्तन्य देणारी माता, कधी त्याच्या कलाने अनुकूल खेळ खेळणारी आई (ए. भा. ११-११६१; २५-२९) इत्यादी मातृप्रेमाच्या निरनिराळ्या छटांची ही अभिव्यक्ती नाथांच्या सूक्ष्म निरीक्षणाचा परिपाक म्हणता येतो.

*नाथभागवतात आढळणारी पत्नी नेहमीच सुपत्नी नाही. पतीच्या मनात आपल्याविषयी प्रीती जागृत राहावी म्हणून कुलवधू सासू-सासऱ्यांना मान देते; सासरच्या नोकरांचाही आदर करते (ए. भा. ८-१०३) सती पतीच्या आज्ञेत सदैव राहते म्हणून सद्गुणी पतिव्रता नवऱ्याची 'अति*

*पढियंती' होते. त्याच्या सर्वस्वाची धनीण होते. (ए. भा. १४-४३९; १३-९८४) विषयावस्था निःशेष निमाली तरी वृद्ध पतिव्रतेला भ्रताराचा दुरावा आवडत नाही. वानप्रस्थ स्वीकारण्यासाठी पत्नीला मुलाच्या हाती सोपवून पुरुष वनाकडे निघतो; पण साध्वी पतिव्रता जी पती ईश्वरस्वरूप मानते ती पुत्रासमवेत राहण्यास तयार होत नाही. 'सांडिता भ्रतारसेवेसी । कल्पांत होऊ पाहे जियेसी । जे भ्रतारचरणांची दासी..... अशी पत्नी 'ते सवे वनासी आणावी'' अशी परवानगी नाथ देऊन ठेवनात. (ए. भा. १८ - ११ ते १४)*

कधी सुंदर, समर्थ भर्ता निघून गेल्यास भार्या वियोगाने व्याकुळ होते (ए. भा. १४-२४८) तर कधी दीर्घकाळ परदेशी गेलेला पती पत्र पाठवतो आणि त्याची कांता ते पत्र वारंवार एकाग्रतेने आदराने ऐकते (२३-९७२) 'पत्र ऐके' ह्या नाथांच्या शब्दांतून तत्कालीन स्त्रियांची निरक्षरता कळून येते.

स्वतःच्या वर्तनाने पातिव्रत्याला धक्का देणाऱ्या काही जारिणींचेही निर्देश नाथ करतात. सवतीसंबंध, विधवा, माहेरवाशिणी, मुली, वेश्या, स्त्रीनट आदींचे उल्लेखही भागवतात इतस्ततः आढळतात; याखेरीज स्त्रीजीवनाशी संबंधित इतर उल्लेखही नाथांच्या सूक्ष्म अवलोकनातून येताना विपुलतेने आढळतात. ते मूळ ग्रंथांतून पाहणेच अधिक श्रेयस्कर !

## रुक्मिणी स्वयंवर

या ग्रंथाचे एकंदर प्रसंग अठरा आहेत. श्रीशंकराचार्यप्रणीत वेदांतील जीव-शिवाच्या अद्वैताची कल्पना करून नाथांनी या रचनेला रूप दिले आहे. त्यात अध्यात्म केंद्रस्थानी असून भक्ती व ज्ञानाचा सुंदर उन्मेष हाच याचा आत्मा आहे. विशुद्ध भक्तिभाव आणि नववधूच्या अंतःकरणातील प्रेमाची विविध आंदोलने यांचे पदर उलगडून दाखविण्यात नाथ पूर्णपणे समरस झाले आहेत.

हे स्वयंवर, हा विवाह प्रकृति-पुरुषाचा आहे. प्रकृती ही पुरुषाधीन असते. पुरुष म्हणजेच ब्रह्म हे काहीच करीत नाही. सर्व काही प्रकृतीलाच करावे लागते; जगाचा सर्व पसारा ब्रह्म आणि माया यांच्या सहयोगानेच कसा चालत असतो याचे यथार्थ दर्शन येथे नाथांनी घडविले आहे. जीवा-शिवाचेच मीलन या अर्थाने आपली कथा रंगविताना नाथांचे काव्यकौशल्य आणि भाषाप्रभुत्व ओतप्रोत प्रकटलेले दिसते. सर्वगुणसंपन्न असा कृष्ण नवरदेव आणि आदिमाया त्रैलोक्यसुंदरी रुक्मिणी नववधू यांची भावस्पंदने नाथांनी बहारदारपणे शब्दांकित केली आहेत.

## गंगा-गौरी कलह

या कथा-काव्यातून स्त्रियांचा स्वभावसुलभ मत्सर दाखविला आहे. हा कलह प्रारंभी दोन सामान्य स्त्रियांच्या पातळीवर घेऊन नंतर तो अध्यात्मसूत्रात गोवला आहे. वर्णन करताना प्रारंभी नाथ सांगतात -

*जगाचा जो पिता । म्हणती ईश्वरु नियंता ।*
*त्यासी विद्या अविद्या दोघी कांता । एकीमाथां.... अर्धांगी ॥ १॥*

पुढे सांगतात -

*'यापरी तो नोवरा । अविद्या गोविला घराचारा ।*
*मग त्याचियाचि शरीरा । अर्धांगी बैसविली ॥ १३॥'*

*'सविद्या गंगा मुकुटी । वैराग्याचे प्रवाह लोटी ।*
*शिवाची उपरमली दृष्टी । न करी गोष्टी भोगाची' ॥ १५॥*

हे पाहून गिरिजा रागावते आणि गंगेला अद्वातद्वा बोलते. तेव्हा ती म्हणते -

*'गिरिजे, नोळखसी पायरी । मी मस्तकी तू पायरी ।*
*तुझ्या अंगी दोष भारी । परि जव्हेरी भोळा हा ॥ ३१॥'*

शेवटी गंगा समजावते की -

*'पाहे पांगुळीच्या मिळणी । आम्ही तुम्ही एकी दोघी जणी ।*
*शिणलीसी गे मायबहिणी । द्वेषु मनी न धरावा ॥ ४८ ॥'*

त्यानंतर -

*'ऐकता गंगेचे वचन । गिरिजे चालले स्फुंदन ।*
*धावून दिधले आलिंगन । समाधान पै जाले ॥ ५१ ॥'*

(जोशी का. अ. संपादित श्रीसकलसंतगाथा खंड २ : श्रीएकनाथ महाराजांचे अभंग : अ. क्र. ३४८६ : पृ. ३८४-३८५)

असा या काव्याचा समारोप केला आहे.

## भावार्थ रामायण :

नाथांच्या आयुष्यातील हा अखेरचा ग्रंथ ! पण नाथवाङ्मयाच्या अभ्यासकाला ते एक जबरदस्त आव्हान आहे. सारी हयातभर कृष्णाची उपासना करणारे नाथ या ग्रंथाच्या रूपाने रामभक्तीकडे वळलेले दिसतात. वीरवृत्ती आणि भक्ती या काहीशा परस्परविरुद्ध प्रवृत्ती येथे एकत्र आढळतात. अपकारकर्त्यावरसुद्धा उपकारच करावा असे शांतीचे तत्त्वज्ञान सांगणारे नाथ ! त्यांनी या ग्रंथात शत्रूच्या प्रतिकाराची मोहीमच उघडली आहे.

सर्वांभूती ब्रह्मभाव प्रतिपादन करणारे आणि 'क्रोध केवळ महामांग' असे वेळोवेळी म्हणणारे नाथ येथे क्रोधाची आवश्यकता नव्याने समजावून देत आहेत. आणि त्यासाठी आपल्या पतीच्या वधाचा सूड घेण्याकरिता आश्रमाच्या दारात शत्रूशी झुंज घेणाऱ्या रेणुका मातेची कथा ते प्रथमच सांगत आहेत :

*'जमदग्नीचा घेतला प्राण । पळाले आश्रमीचे ब्राह्मण ।*
*राजा बोलिला आपण । आता कामधेनू आणा रे ॥*
*धेनु सोडू आले सेवक । रेणुका क्षोभली आत्यंतिक ।*
*चक्र करोनिया ताटक । युद्धां सन्मुख ते जाली ॥' (१)*

कामधेनूचे दावे सोडायला आलेल्या सहस्त्रार्जुनाला रेणुकेने असा जबरदस्त झटका दिला की - तो 'पडे सहस्त्र बाहो मूर्च्छित' अशा शब्दांत रेणुकेचा पराक्रम ते वर्णन करतात.

अशाच प्रकारे बालसीतेचा पराक्रम कथन करतात -

*'पाच शती महावीरीं । धनुष्य नुचले तिळभरी'*

असे ते प्राचीन शिवधनुष्य -

*' तंव धनुष्याचा करुनी घोडा । सीता खेळते देखे पुढां ।*
*राजबिदी घेत दवडा । बाळक्रीडा क्रीडत ॥' (२)*

१ : श्रीभावार्थ रामायण बालकांड प्रसंग १६ : ओ. क्र. १२८, १२९ पृ. ८७.

२ : तत्रैव : बालकांड प्रसंग १७ : ओ. क्र. ८३ : पृ. ९४.

*'करुनि धनुष्याचा घोडा । नाचवित वाडाकोडा ।*
*आली फरशरामा पुढां । देखोनि गाढा तो विस्मितु ॥ (३)'*

शिवधनुष्याचे घोडे करून अंगणांत राजकुमारी सीता खेळते आहे आणि ते धनुष्य वागविणारा महावीर परशुराम कौतुकाच्या नजरेने तो खेळ पाहत आहे. ह्या प्रसंगातील एका बालिकेच्या धिटाईचे नाथांनी केलेले कौतुक जाणवल्यावाचून राहत नाही.

नववधू सीतेचे वर्णन नाथ मोठ्या मार्मिकपणे करतात -

*'सीतेचा पल्लव झळकतु । उजेड पडला मंडपातु । ...'*
*'सीता-आंगप्रभा-किरणे । लाजिले अंधाराचे जिणे ।*
*लोपले उष्ण आणि चांदणे । प्राणी प्राणे तटस्थ ॥' (४)*

अशाच प्रकारे अयोध्याकांडात कौसल्या, सुमित्रा, ऊर्मिला, मांडवी, श्रुतकीर्ती यांची चित्रणे फारच सुरेख झाली आहेत. त्या सात्त्विक पार्श्वभूमीवर कैकेयी व मंथरा यांची कपटी आणि स्वार्थी वृत्ती अधिकच ठळकपणे स्पष्ट होते. विदेही जनक आणि ज्ञानी पिंगला, समयसूचक तारा, सुग्रीव पत्नी रुमा या सर्वांचीच स्वभावचित्रे नाथांनी सरसपणे रेखाटली आहेत.

सुंदरकांडात मंदोदरी, त्रिजटा या दैत्य राजस्त्रियांची व्यक्तिचित्रे रेखाटून त्यांच्यातील विवेकबुद्धी व सात्त्विकता यांचा परिचय करून देतात. युद्धकांडात तर मंदोदरीचे पातिव्रत्य आणि ईश्वरनिष्ठा या दोन्हींचे प्रभावी दर्शन घडते. इंद्रजिताची पत्नी सुलोचना हिची प्रखर पतिनिष्ठा आणि निस्सीम रामभक्ती आणि या दोन परस्परविरोधी भावनांची अभिव्यक्तीही परिणामकारक उतरलेली आहे. तिच्या अग्निप्रवेशाचे वर्णन नाथ करतात ते असे

*'जरी मी सती पतिव्रता । साचार असेन तत्त्वतां ।*
*तरी साक्ष वदो माझा भर्ता । श्रीरामादेखतां सत्यत्वे ॥ (५)'*
*सुलोचनेचे शब्द ऐकून इंद्रजिताचे शिर थरारून उद्गारले,*
*'शिर वदे सत्यसाक्षता । सावध ऐके श्रीरघुनाथा ।*
*सुलोचना पतिव्रता । त्रिसत्य सत्य मानी निजसाक्षी ॥' (६)*

३. श्री भावार्थ रामायण बालकांड प्रसंग सतरा : ओ. क्र. ८६ पृ. ९४.

४. तत्रैव : बालकांड प्रसंग चोवीस : ओ. क्र. ३१, ३३ पृ. १२४

५ व ६. तत्रैव : युद्धकांड प्रसंग : ओ. क्र. ८१, ८३

अचेतन शिराने दिलेली साक्ष ऐकून रामप्रभू संतोषून म्हणाले-

*'तुझा भर्तार मी उठवीन । तुवां नेदावावोप्राण । करील सुलग्न दोघांचे ॥' (७)*

त्यावर सुलोचना म्हणते, ''रघुनाथा, तू म्हटल्याप्रमाणे करशील हे खरं ! परंतु तुझ्या दृष्टीसमोर मृत्यू आणि पतिसहगमन करण्याचा योग पुन्हा येणार नाही.'' तिची इच्छा जाणून प्रभुंनी आपले चरणतीर्थ तिला दिले त्यानंतर

*'धडा शिरा करुनि भेटी । उभय भुजा एकवटी ।*
*स्नान करून गोरटी । सवेग उठी सतीत्वा ॥' (८)*

सुलोचनेने सुवासिनींना वाणे दिली, सूर्याची वास पाहिली, सतित्वाची कांस घातली, अग्नीची पूजा केली, ब्राह्मणांना नमस्कार केले आणि प्रभु रामरायाचे स्मरण करून म्हणाली, 'माझी साक्ष सर्वांतर्यामी भगवंताने द्यावी.'

*'तत्काळ झाली अशरीरी (आकाशवाणी) वाणी । सुलोचना सती शिरोमणी ।*
*परपुरुष नाही ध्यानी मनी । परम सती सुलोचना ॥'*

पंचमहाभूतांनी तिच्या सतित्वाची ग्वाही दिली; ती ऐकून सुलोचना मोठ्या उल्हासाने अग्निप्रवेश करण्यासाठी चितेवर पद्मासन घालून बसली. पतिशिर मांडीवर घेतले आणि

*'बैसोनि वदे सती सुंदरी । राम परमात्मा निज निर्धारी*
*सबाह्यअभ्यंतरी आत्माराम' ॥(९)॥*

असे रामस्मरण करीत सुलोचनेचा देह हरपला, ती विदेही झाली.

*ऐसे करिता रामस्मरण । देह गेले हारपोन ।*
*देही आले विदेहपण । नामस्मरण करितांचि ॥ (१०)*

पतिभक्ती आणि ईश्वरभक्ती या दोहोंचा उत्कट आविष्कार घडवितानाच नाथ नामस्मरणाची महती सांगू जातात.

असे अनेक प्रसंग भावार्थ रामायणात आढळतात. पति-पत्नींच्या एकरूपतेचे चित्रणही राम-सीता, इंद्रजित-सुलोचना यांच्या संदर्भात केलेले आढळते. या सर्वांतून जाणवते ते असे की, नाथभागवतात 'परमार्थाची वाट धरताना स्त्रीचा अणुमात्र विश्वास धरू नये असे वेळोवेळी प्रतिपादन करणारे नाथ त्यांच्या या अखेरच्या ग्रंथात मात्र स्त्रीशक्तीची वेगवेगळी रूपे वर्णन करतात. तिची महती पटवून देतात. यावरून स्त्रीचे सामर्थ्य आणि मनोबल वाढविणे समाजविकसनासाठी आवश्यक असल्याचे त्यांना आलेले भान स्पष्ट होते.

डॉ. सौ. पद्मावती श्रीपाद श्रोत्रीय
कळस,
जिल्हा - पुणे.

# ज्ञानाचा एका

**डॉ. अशोक प्रभाकर कामत**

एम. ए. पी. एचडी. (मराठी) पी. एचडी (हिंदी), प्रमुख नामदेव अध्यासन पुणे विद्यापीठ १९८५ पासून हिंदी, मराठी, संत साहित्याचे अध्ययन, अनुबंध, अध्यापन, लेखन, संशोधन व शोध कार्यासाठी मार्गदर्शन, सामाजिक प्रबोधन व व्याख्यान एम फिल, पीएचडी पदवीसाठी २१ शोध प्रबंध पूर्ण. ४० संशोधन प्रकल्प संत साहित्याच्या अभ्यासकांकडून करवून घेतले.

तेराव्या शतकापासून सतराव्या शतकापर्यंत होऊन गेलेले संत ज्ञानदेव, संत नामदेव, संत एकनाथ आणि संत तुकाराम हे वारकरी संप्रदायाचे चार प्रधान आधार पुरुष आहेत. त्यांच्यासमवेत मोठी ईश्वरनिष्ठ मांदियाळी आहे. संत ज्ञानदेव - नामदेव समकालीन. त्यांनी ज्ञान आणि भक्तीची भक्कम बैठक वारकरी भागवत संप्रदायाला दिली आणि तेराव्या शतकाच्या उंबरठ्यावरच संप्रदाय बळकट बनला. संत ज्ञानदेवांचे कार्य पुढे संत एकनाथांनी बहुअंगांनी वाढविले. संत ज्ञानदेवांचे कार्य पुढे संत तुकारामांनी वाढविले. म्हणूनच ते संप्रदायाचा कळस मानले जातात. 'नामाचा तुका' आणि 'ज्ञानाचा एका' अशी म्हण वारकऱ्यांत प्रचलित झाली. प्रस्तुत टिपणात 'ज्ञानाचा एका' ही उक्ती थोडी स्पष्ट करण्याचा प्रयत्न दिसेल.

## चरित्र साम्य

श्रीज्ञानदेवचरित्र आणि नाथचरित्रातील काही घटनाप्रसंगात काही अजब साम्य योगायोगाने आढळते. ज्ञानदेवांचे माता-पिता श्रीविठ्ठलपंत-रुक्मिणीबाई विरक्त आणि सत्वसंपन्न. आजोबा, पणजोबा गोरक्ष-गहिनीनाथांशी संबद्ध. घरी विठ्ठलभक्तीची परंपरा. अशीच परमार्थसंपन्न परंपरा नाथांनाही मिळाली. नाथांची माताही रुक्मिणी. वडील सूर्यनारायण. पैठणचे तेजस्वी संस्कृत पंडित. त्यांचे घराणे थोर. घरी विठ्ठल भक्तीची परंपरा.

ज्ञानदेवांचे जन्मस्थान अलंकापुरी महापुण्यभूमी. एक पुरातन शिवपीठ. नाथांचे जन्मगाव प्रतिष्ठान पैठण ही दक्षिण गंगेच्या काठची काशी. दोन्ही महापुरुषांचे माता-पिता लवकरच जगाचा निरोप घेतात. नाथांचे पणजोबा भानुदास परम भागवत आणि विठ्ठलोपासक. त्यांनीच श्रीविठ्ठलाची मूर्ती पंढरपूरला पुनः प्रतिष्ठित केली, अशी सांप्रदायाची श्रद्धा आहे.

दोन्ही महामानव सद्गुरुभक्त. अगदी लहान वयातच त्यांना गुरुप्राप्ती झाली. ज्ञानेश्वरी आणि नाथभागवत यांना गुरुमहिमेचे ग्रंथ म्हटले तरी चालेल. पण त्याचबरोबर दोघांनीही संस्कृत पंडित असूनही उत्कट प्रीतीमुळे आणि लोकोद्धाराची प्रबल आकांक्षा ठेवून ग्रंथरचना केली.

ज्ञानदेव-नामदेव युगात तेराव्या शतकात दिल्लीची सुलतानशाही देवगिरी आणि दक्षिणेतील हिंदू राज्ये नष्टभ्रष्ट करण्यासाठी सरसावलेली होती. दुर्दैवाने इथले यादव अधिपतीच त्यांना प्रथम शरण गेले. पूर्ण पराभूतही झाले. अन्य हिंदू राज्येही गडगडली. रयतेची अवस्था विचित्र झाली. एक प्रकारे कौरवांची सरशी झाली. पांडवांच्या नशिबी वनवास आला. अशा वेळी ज्ञानदेवांनी गीतेची भगवंताच्या आश्वासक वाणीची भावार्थदीपिका तळागाळातील जनांसह शेता-शिवारापर्यंत प्रसृत झालेल्या भक्तभागवत वारकरी स्त्री-पुरुषांच्या हाती दिली. त्यांच्या जीवनव्यवहाराला एक दिलासा दिला. नवा आशय आणून देण्याचा प्रयत्न केला. या संत नामदेव आणि अठरापगड गावगाड्यांमधून आलेल्या लोकनायक ईश्वरनिष्ठांचा / मांदियाळीचा मोठाच सहभाग होता.

ज्ञानदेव-नामदेवांचे तेरावे शतक आणि मुख्यतः चौदावे शतक पुढे नामदेवरायांच्या निर्वाणानंतर जवळपास दोनशे वर्षांचे अंधारयुग आढळते. या काळात कुणी मोठा संतमहंत वारकरी महात्मा झाला नाही. संप्रदाय होता. वारीही होती. श्रीक्षेत्र आळंदी, श्रीक्षेत्र त्र्यंबकेश्वर, श्रीक्षेत्र सासवड, श्रीक्षेत्र मेहूण एदलाबाद असुरक्षित होते. चंद्रभागेच्या तटी पुंडलीक पांडुरंगही राहिले होते. पण त्यांच्यावर अनेकदा घाले पडले. सामान्य सज्जन माणूस भयविस्मित / दिग्मूढ होऊन गेलेला तर गावमुलखाला सांभाळणारा क्षत्रिय परक्यांची चाकरी करून आपापले हेवेदावेच महत्त्वाचे मानणारा झाला होता. ज्याने काही कालानुरूप विचार द्यायचा तो बुद्धिवादी / अभिजनवर्ग देवदेवळांतूनही सुरक्षित नव्हता. होता तो कर्मकांडात हरवला होता. त्याला आपले पांडित्य वा प्रतिष्ठा प्रिय वाटे. सर्वसामान्यांसह / त्यांच्या भाषेत बोलून-चालून काही नवेच घडवावे असे मात्र नाथांना वाटले म्हणून त्यांनी महाराष्ट्र महोदयाचा एक प्रचंड यज्ञ मांडला. बहुजनांचा संप्रदाय विठ्ठलप्रिय वारकरी त्यांना आपलेसा होता. कर्मप्रिय दत्तभक्तांशीही त्यांचे उत्कट अनुबंध राहिले. हिंदूतुर्क संवाद साधण्याचे प्रयत्न करणारे काही सूफी होते. नाथ त्यांच्याशी मैत्रीचा हात पुढे करू या म्हणाले. अशा परोपरीने त्यांनी पुढल्या प्रवासाची आखणी केली. ज्ञानदेवांचा ज्ञानयज्ञ नि नामदेवांचा भक्तिपंथ प्रशस्त केला. उदण्ड अभंगरचना केली. प्रकरण ग्रंथ रचले. कृष्ण नि राम यांची अवतार कथा सुस्पष्ट केली. भागवतटीका हा त्यांचा सर्वथोर उपक्रम. तो ज्ञानदेवांच्या कार्याचा एक काळाची आवश्यकता ओळखून केलेला विस्तारच होता.

जणू नाथांच्या रूपाने ज्ञानदेवच पुन्हा दीर्घ जीवन आणि बहुजनांसाठी नामदेवांसारखे 'प्रेमभांडारी' रूप घेऊन प्रकट झाले आणि इस्लामी अहर्निश आक्रमणाचा प्रतिकार करण्यासाठी त्यांनी काही नवे सामर्थ्य भक्तभागवतांना देण्याचा प्रयत्न केला. पुढे हिंदवी स्वराज्याचा पाया इथे घातला जावा असा काही अद्भुत प्रपंच त्यांनी परमार्थाने मांडला !

ज्ञानदेव-नामदेव आणि नाथ-तुकोबांच्या जीवन चरित्रात अनेक चमत्कार घडले. बहुधा तेच सांगून काही मंडळी त्यांना नमस्कार करावा म्हणतात. आजच्या विज्ञानयुगात त्या चमत्कारांचा / त्या कथा

लोकमानसाने रचल्या. त्याची कारणमीमांसा करण्याचा प्रयत्न करणे अवघड असले तरी आवश्यक आहे. थोडासा जरी या दिशेने प्रवास केला तरी 'ज्ञानाचा एका' सारख्या लोकश्रद्धा स्पष्ट होऊ शकतात.

## चमत्कारांचा अन्वयार्थ

ज्ञानदेवांनी लघिमा सिद्धिच्या योगाने खोल विहिरीच्या तळाशी जाऊन पाणी प्राप्त केले. तहान भागविली. त्यांनी आपल्या पाठीतून अग्नी प्रज्वलित करून त्यावर मांडे भाजण्याची सोय मुक्ताबाईस करून दिली. वाघावर बसून आलेल्या अहंकारी योगीराजाला सामोरे जाताना ते जड भिंतीला चालवीत गेले. त्यांनी रेड्याच्या मुखातून वेद वदवून दाखविले.

अशा अनेक चमत्कारांच्या कथा ज्ञानदेवचरित्रात आपल्याला मिळतात. त्यातूनच ज्ञानदेवांना नमस्कार केला जावा काय ? चमत्कारकथांचा काही वैज्ञानिक रीतीने उलगडा करता येतो काय ? या सर्व कथा ज्ञानदेवांची लौकिक आणि नैतिक उंचीही वाढविणाऱ्या नव्हेत काय ? अशाच काही कथा नाथचरित्रातही मिळतात.

नाथ शांतिब्रह्म होते. त्यांना जात-पात सोडाच, धर्मभेदही अमान्य दिसतात. म्हणून तर ते 'हिंदू-तुर्क' संवाद लिहू शकले. गंगास्नानासाठी जात असताना एक मुर्दाड माणूस त्यांच्या अंगावर चार-पाच वेळा थुंकला. त्या वेळी त्यांनी शांतपणे दर वेळी गंगास्नान केले. एकदा एक कुटाळ ब्राह्मण त्यांच्या देवपूजेवेळी त्यांच्या मांडीवर जाऊन बसला. पण नाथांनी निवांतपणे त्याचेही आतिथ्य केले. वडिलांच्या श्राद्धावेळी ब्राह्मण भोजन होते. भुकेलेले हरिजन त्या वेळी आले. नाथांनी त्यांची भूक भागविली. राण्या महाराघरी नाथांनी भोजन केले. एका महार, लहानग्या मुलाला उन्हा-तान्हात रडत असताना वात्सल्याने जवळ केले. कुणा चोऱ्या करणाऱ्या हरिजनाला कैदेतून सुटल्यावर आधार दिला. त्याची वृत्ती पालटली -- अशा या सर्व कथा नाथांचे विलक्षण वारकरी व्यक्तिमत्त्व आपल्यापुढे ठेवतात. त्या पंथाला एक नैतिक नवे अधिष्ठानही आणून देतात.

संत ज्ञानदेव - नाथांच्या जीवनचरित्रातील चमत्कारकथांचे साम्यही 'ज्ञानाच्या एका'त अधिक उजळत राहते. आजच्या विशिष्ट संदर्भात जर हे अधिक उजळले तर नाथांची उपेक्षा करणाऱ्यांना काही नवी जाग येण्याची शक्यता आहे.

## ज्ञानदेवे रचिला पाया !

तुकोबांच्या गाथेत असणाऱ्या आणि पुढे त्यांच्या शिष्या बहिणाबाई यांनी पुनर्रचित केलेल्या एका सुप्रसिद्ध अभंगात 'ज्ञानदेवे रचिला पाया । उभारिले देवालया !' हा आत्यंतिक प्रसिद्धी पावलेला एक यथार्थ चरण मिळतो. या चरणाचा उलगडा अनेक पदींनी करता येण्यासारखा आहे. त्यापैकी महात्मा एकनाथांशी अधिक संबद्ध असा भाग थोडा विचारात प्रथम घेऊया.

ज्ञानदेवांनी आपल्या भावार्थ दीपिकेच्या निमित्ताने धर्मसंकीर्तन करण्याकरीता श्रीमद्‌भगवद्‌गीतेची निवड का बरे केली असावी ? महाभारतातील कुरुक्षेत्रयुद्ध प्रसंगात जो श्रीकृष्णार्जुन संवाद झाला तोच पुन्हा मायमराठीतून सांगावा म्हणून ? भक्त भगवंत संभाषणाबरोबरच अनेक साधनाप्रवाहांचा उहापोह करून पांडित्य प्रदर्शन करावयाचे यासाठी ? 'वेद तिही वर्णांचे कानी लागला' आणि भगवंताची गीतावाणी सर्वांना सहज उपलब्ध आहे म्हणून ? असे एक ना दोन अनेक प्रश्न उपस्थित करून आपापल्या परीने अभ्यासक काही स्वतःचे म्हणणे मांडित असतात. सिद्धनाथ वारकरीपंथीय दृष्टीने विचार करता आपल्याला काही वेगळे आणि कदाचित अधिकाधिकांना सहज मान्य होण्यासारखे काही म्हणता येईल का ते पाहू या.

वारकरीसंप्रदाय श्रीज्ञानदेव विठ्ठल कुलकर्णी परिवाराला आधीपासून ज्ञात होता. तो एका विशिष्ट प्रकारे बोधपरंपरा देणारा होता. हा बोध 'उघडा' नसे. सद्‌गुरुकडून तो शिष्याला मिळे. नंतर परंपरेने पुढे दिला जात असे. तो बव्हंशी दोन व्यक्तीसाधकातील / गुरुशिष्यातील राहत असे. त्याच पद्धतीने पुढे मिळत राही. सर्वांसाठी वैचारिक देवघेव असे त्याचे स्वरूप नव्हते. संत ज्ञानदेवांनी हा गुप्त राहणारा बोध उघडा केला. खुला केला. त्याच काळात संत नामदेवांनी बंदिस्त कीर्तन चंद्रभागेच्या वाळवंटात अधिक मुक्त केले.

वारकरी श्रीविठ्ठलाचे अखंड नाम घेत. त्याचे मनन-चिंतन करीत. त्या सगुणसाकार पण त्याचबरोबर मुळात निर्गुणकार सर्वव्यापी चैतन्यतत्त्वाला 'श्रीज्ञानदेव' सर्वांसाठी उघड करते झाले. श्रीविठ्ठल हाच द्वारकेचा राजा आहे. गोकुळातील कान्हा आहे. वृंदावनातील गोपीकृष्ण मुरारी आहे. रासक्रिडेतील नटनागर आहे. तोच कधी मर्यादापुरुषोत्तम प्रभु रामचंद्र म्हणून प्रकट झालेला नरनारायण होय. त्याला कुणी आणिही वेगळ्या स्वरूपात भजिले, प्रार्थिले वा पूजिले आहे. पण मूळ ईश्वर तत्त्व एकच. कलियुगात भक्तराजाच्या भेटीला प्रकट झालेला श्रीविठ्ठल हा मुळात श्रीकृष्ण परमात्माच आहे. त्याने गीतेत कथन केलेले तत्त्वज्ञान वारकऱ्यांना 'धर्मग्रंथ' ठरावयास हरकत नाही. हे श्रीज्ञानदेवांनी अचूकपणे ओळखले आणि तसे झाले.

'वेदांना निद्रिताचा घोरु' तर गीतेला 'जागृतीचा बोलू' असे ज्ञानदेवांनी म्हटले. यात गीतेचे मोठेपणही आले. धर्मग्रंथाचे श्रेष्ठत्वही सामावून गेले. नेमके हेच महात्मा एकनाथांनी म्हटले :

*कृष्ण निःश्वासे जन्मले वेद ।*
*गीता स्वमुखी प्रकटली शुद्ध ।।*

वेदांना नाकारून नव्हे तर आवश्यक तितकेच स्वीकारून भगवंताच्या वाणीची महत्ती नाथांनी वारकऱ्यांवर ठसविली. कर्म, ज्ञान आणि उपासना या तिहिंचे महत्त्व मानले. पण गीतेचा आधार घेऊन भक्तीची थोरवी ज्ञानदेवांनी विशद केली. या अर्थाने ज्ञानदेवांनी वारकरी भागवत धर्माला शुद्ध बैसका प्राप्त करून दिली. 'गीतार्थाने विश्व भरू' म्हणत समन्वयाचा यज्ञ मांडला. वारकरी विश्वधर्माचा पाया रचला. नाथांनी ज्ञानदेवी पुन्हा एकदा सुस्पष्ट करण्यासाठी ज्ञानदेवी तर प्रथम प्रतिशुद्ध केलीच. त्यांच्या समाधीचा जीर्णोद्धारही केला आणि मुख्य म्हणजे श्रीकृष्ण भगवंताचे ज्ञानदेवविरचित तत्त्वज्ञान पुढे नेले.

भागवत धर्ममंदिराच्या रूपकात्मक अभंग वर्णनातदेखील 'ज्ञानाचा एका' हा विचार प्रकटला आहे. ज्ञानदेवांनी पायाभरण केलेल्या मंदिराला नाथांनी भागवत टीकेने स्तंभ दिले. भरभक्कम आधार दिले.

**नाथभागवत**

भगवान श्रीकृष्णाने जसा गीतेच्या रूपाने अर्जुनाला उपदेश केला तसाच आपल्या प्रिय मित्राला -- उद्धवालाही उपदेश केला. हा श्रीमद्‌भागवताच्या अकराव्या स्कंधामध्ये आलेला आहे. हा 'भागवत बोध' गीताबोधापेक्षा फार वेगळा नाही. एक प्रकारे तो गीताविस्तारच आहे. नाथांनी आपल्या भागवताच्या रूपाने वारकरी भागवत धर्ममंदिराला स्तंभ दिला म्हणजे गीताज्ञानेश्वरीचा विस्तार केला, भक्तीचे दर्शन अधिक तपशीलाने स्पष्ट केले, असे म्हणता येईल. यामुळेच खरे तर वारकरी भक्तिदर्शनाला अधिक पूर्णता आली. या अर्थानेच 'ज्ञानाचा एका' ही वारकरी उक्ती अगदी यथार्थ ठरते.

ज्ञानदेवी आणि नाथभागवत या दोन्ही ग्रंथांमध्ये भगवान श्रीकृष्ण हाच प्रमुख वक्ता आहे. त्याच्या मुखाने या दोन्ही महासंतांनी भारतीय दर्शनाचे विविध पैलूच प्रकट केले आहेत. त्यातही मुख्य भर अद्वैतावर आहे.

*जें जें भेटे भूत । तें तें मानिजे भगवंत ।*
*हा भक्तियोगु निश्चिंत । जाण माझा ॥*
(ज्ञा. १०-११८)

*असा ज्ञानदेवांचा श्रीकृष्ण भगवंताचा सांगावा आहे.*

*प्रसवला माझी भक्ती । सकळ सिद्धिची होय प्राप्ती ॥*
*संदेह नाही ये अर्थी । जाण निश्चिती उद्धवा ॥*
(भा.... ३८)

ग्रंथश्रेष्ठ ज्ञानदेवी आणि नाथभागवत हे दोन्ही ग्रंथ केवळ वाचन-पारायणाचे नाहीत. तसे तर ते आहेतच पण ते एकेक ओळी अनुभवावी असे आहेत.

**संवादी वाणी**

ज्ञानदेवांचा अमृतानुभव हा त्यांचा आत्मसंवाद मानला जातो. त्यात त्यांची गुरुविषयींची श्रद्धा आणि शैव परंपरेतून त्यांना मिळालेली तत्त्वप्रणाली प्रकर्षाने दिसून येते. त्यांची अभंगवाणी हा त्यांनी केलेला बोधसंवाद म्हणता येतो. या संवादात श्रीविठ्ठलाची भक्ती मिळते. विराण्या आढळतात. समाजजागरणासाठी केलेला हितोपदेशही मिळतो. वारकरी संतांच्या अभंगरचनेला जवळची ही ज्ञानदेवांची वाणी लोकपरंपरेशी त्यांचे नाते दृढ करते.

चांगदेवाला उद्देशून सांगितलेल्या पासष्ट ओव्यांची रचना ही मित्रसंवादासारखी वाटते तर भावार्थदीपिका / ज्ञानदेवी हा गीतासंवाद किंवा भगवंताच्या अमृतवाणीशी संवाद होय.

संत एकनाथांनी असाच अनेक परीचा श्रोतृसंवाद साधला. ते म्हणाले आहेत :

*ज्ञानी निवती परमार्थ बोधे ।*
*पंडित निवती पदबंधे ।*
*लोक निवती कथाविनोदे ।*
*ग्रंथसंबंधे जग निवे ॥*

नाथांनी प्रकरण ग्रंथ रचून आत्मसंवाद केला. अभंगपदे, गौळणी आणि भारुडादी रचनेतून प्रभावीपणे लोकसंवाद साधला. भागवत/रामायणासारखी ग्रंथरचना केल्यामुळे त्यांना सर्वांसाठी परमार्थबोध घडविता आला. त्याचबरोबर ज्ञानदेवीसंवाद नि कृष्णवाणीशी संवाद ही वैशिष्ट्यपूर्ण रीतीने करता आला.

श्रोत्यांशी सलगी करीत, त्यांना ज्ञानदेवांप्रमाणे विश्वासात घेऊन सुबोध रीतीने विषय निरुपण करणे, हे नाथांचेही वैशिष्ट्य ठरले. या अर्थानेही 'ज्ञानाचा एका' ही जनधारणा सार्थ म्हणता येते.

**उपसंहार**

अलिकडे आंतरविद्याशाखीय अभ्यास अन्‌ तुलनात्मक अध्ययन करण्याचे युग आहे. अशा रीतीने एक श्रेष्ठ दुसरा त्यापेक्षा कसा नि किती प्रमाणात वेगळा आहे हे दाखविण्यात काहींना यश मिळू शकते.

संतसाहित्य हे मुळातच लोकवाङ्मय आहे. ते सुशिक्षितांपेक्षा सुसंस्कृत महामानवांचे आहे. नरनारायण रूपात वावरणाऱ्या विभूतींचे आहे. त्यांनी प्रपंच केला पण तो परमार्थासह केला. 'साधू दिसती वेगळाले परि ते स्वरूपी मिळाले' हेही एक वास्तव आहे आणि संत परिवारात मुळातला आंतरिक दृढ अनुबंध होते. एकमेकांसह राहू आणि मग 'अवघे धरू सुपंथ' असेच त्यांचे म्हणणे होते. त्यांच्या जीवनचरित्रकार्याचा अभ्यास आपोआपच आंतरविशाखीय आणि तुलनात्मक होतो. पण ही तुलना एकापेक्षा एक असा वेगळा हे दाखविणारी नसते / नसावी. एकातच एक कसा मिसळलेला आहे हेच परोपरीने सांगू शकणारी असते.

संतसाहित्य हे जसे लोकसाहित्य तसेच ते मूळचे भारतीय साहित्य आहे. भगवद गीता आधी मग ज्ञानेश्वरी. श्रीमद्‌ भागवत आधी मग नाथभागवत मूळ कृती सामोऱ्या ठेवून त्यांची काळानुरूप अनुकृती म्हणजे श्रेष्ठ संतवाङ्मय.

'ज्ञानाचा एका !' ही उक्ती याही दृष्टीने बरेच काही आपल्याला शिकवून / सावरून सांगते.

आज अतिरेक भ्रष्टाचार हा युगधर्म झालेल्या नष्ट कलियुगात संतांनी जागविलेला 'संवादी स्वधर्म' सर्वांनाच हितकर ठरणारा आहे. त्यात आग्रह नाही. श्रेष्ठ-कनिष्ठ वा काफिर-वध्य भाव नाही. इथे आधी शुद्ध आचार / सदाचार आणि त्याबरोबर विचार असतो म्हणून ज्ञानदेवी भागवत एकाच ज्ञानमय मूलतत्त्वाचे आविष्कार ठरले आणि ते प्रकट करणारे ईश्वराचे अवतार ही झाले. लोकांनी त्यातही अद्वैत अनुभवले.

'ज्ञानाचा एका' ही लोकोक्ती हेदेखील परोपरीने सांगून जाते. आज अशा लोकोक्ती दृष्टीपुढे ठेवून 'संतेतिहास' मांडणे योग्य ठरेल. आपला इतिहास राजकारणी मंडळींनी घडविलेला नाही. ते नेहमीच बिघडविण्याचे काम करीत राहिले. संतांनीच समाजाची खरी जडण-घडण केली. तीदेखील 'ज्ञानाचा एका' या सांगीतून आपल्या पुढे तेरावे-चौदावे, पंधरावे, सोळावे शतक उभे करते.

डॉ. अशोक कामत
शिवश्री २५८, सहजीवन सोसायटी,
पर्वती, पुणे ४११ ००९.

# संत एकनाथ व समर्थ रामदास

सौ. आशा सुधीर रांशिंगकर
एम्.ए. (मराठी), नामदेव अध्यासन अभ्यासक संभाव्य पी.एच.डी. विषय रामदास वाङ्मयाचे समालोचन

मराठी संत वाङ्मयात संत ज्ञानेश्वर, संत नामदेव, संत एकनाथ, संत तुकाराम व समर्थ रामदास यांच्या वाङ्मयाला विशेष स्थान आहे. शिक्षणाचा प्रसार, मुद्रण कला यामुळे ज्ञानेश्वरी, भावार्थ रामायण, एकनाथी भागवतादी वाङ्मय मराठी माणसाच्या घरोघरी पोहोचले आहे. हे वाङ्मय भक्तिप्रधान तसेच कर्मप्रधानही आहे.

या सर्व संतांचे वाङ्मयाच्या दृष्टीने मराठी भाषेला झालेले योगदान थोर आहे. ज्ञानेश्वरीसारखा अमर ग्रंथ लिहिणारे व अवतारकार्य पूर्ण झाल्यावर वयाच्या २२ व्या वर्षी समाधी घेणारे संत ज्ञानेश्वर श्रेष्ठ आहेतच पण त्यांचे जीवन चरित्र लिहून त्यांच्या संजीवन समाधी सोहळ्याचे सुरेख वर्णन करणारे वयाच्या ८० व्या वर्षांपर्यंत पंजाबमध्येही जाऊन भागवतधर्माची पताका फडकविणारे संत नामदेवांचे कार्यही लक्षात राहणारे आहे. हे दोन किंवा संत एकनाथ, समर्थ रामदास अशा समर्थ व्यक्तिमत्त्वाची तुलना करणे योग्य ठरणार नाही.

संत नामदेव (इ.स. १२७० ते १३५०) यांच्यानंतर जवळ-जवळ ३०० वर्षांनी संत एकनाथांचा काळ येतो. त्यांच्यावर लोकगंगेतून आलेला ज्ञानेश्वर व नामदेवादी संतांच्या अभंगवाणीचा प्रभाव पडलेला दिसतो. ज्या काळात संत एकनाथांचे कार्य झाले तो काळ भागवतधर्माच्या दृष्टीने अत्यंत महत्त्वाचा होता. संत ज्ञानेश्वर व संत नामदेव यांचे जीवनकार्य पूर्ण होऊन ते मान्यताही पावलेले होते. तर समर्थ रामदास व संत तुकारान यांच्या जीवनकार्याची सुरुवात झालेली नव्हती. संत एकनाथ या संतपंचकात मध्ये उभे आहेत. त्यांनी संत ज्ञानेश्वर व संत नामदेव या वडिलांकडून अध्यात्मशास्त्राची शिदोरी घेतली व हा महानिधी अनेक पटीने वाढवून संत तुकाराम व समर्थ रामदास यांच्या हाती सोपविला.

संत एकनाथांच्या काळातील सामाजिक परिस्थिती अत्यंत शोचनीय होती. निजामशाही राज्याचा ऱ्हास झालेला होता. दक्षिणेतील बलाढ्य हिंदू राज्यांचा पाडाव नाथांच्या काळातच झालेला होता. मराठी प्रदेशाच्या दृष्टीने धार्मिक व राजकीय संघर्षाचा हा काळ होता. दक्षिणेत सर्वत्र इस्लामचा शिरकाव झालेला होता. स्वकीय परसत्तेच्या विरुद्ध लढण्याऐवजी एकमेकांतच लढत होते. काहींनी यवनांची चाकरीही पसंत केली होती. सामान्य प्रजा सत्तास्पर्धेच्या युद्धकारणात भरडली जात होती. अगतिक परिस्थितीमुळे कर्मकांड व देवतोपासना वाढीला लागलेली होती.

समर्थ रामदासांच्या काळात अशीच सामाजिक परिस्थिती होती. इस्लामने मोगलांच्या रूपाने पाय अधिकच घट्ट रोवले होते. अस्मानी म्हणजे अवर्षण व दुष्काळ आणि सुलतानी म्हणजे परधर्मी राज्य, परचक्र व शत्रूंच्या धाडी यापासून सर्वसामान्य माणसांना विशेषतः स्त्रिया व मुलांना अधिक त्रास होत असे. लोक वेठीला धरून नेण्याचीही चाल अस्तित्वात होती. परधर्मी राज्याधिकारी असल्यामुळे हिंदू लोकांना त्रास सोसावा लागे. धार्मिक स्थितीही शोचनीय होती. चार वर्णांमध्ये मुख्य ब्राह्मण तेच आपल्या इच्छेने 'तुरुक' होऊ लागले, तर इतर तीन वर्णांनी त्यांचे अनुकरण करणे साहजिकच होते. काही लोक स्वार्थाकरिता धर्मभ्रष्ट झालेले होते. पण त्यांची संख्या उत्तर हिंदुस्थानातील लोकांएवढी नव्हती कारण बहामनी राज्य मोडून ज्या पाच शाह्या दक्षिण हिंदुस्थानात स्थापन झाल्या त्यांचे सुलतान धर्माच्या बाबतीत विशेष कडवे नव्हते. पण अपमान सहन करून परराज्यात आनंदाने नोकरी करून जहागिरी मिळविणाऱ्या मानभ्रष्ट लोकांची संख्या पुष्कळ होती.

संत एकनाथ व समर्थ रामदास यांच्या काळातील सामाजिक परिस्थिती जवळ-जवळ सारखीच होती. अवर्षण, आपआपसातील युद्धे यामुळे सामान्य माणसाला कोणी वाली राहिला नव्हता. अशा समाजाला जागे करण्यासाठी संत एकनाथांनी प्रबंध-लेखन, कीर्तन, प्रवचन इ.चा आधार घेतला तर समर्थांचा भर कृतीवर अधिक होता म्हणून त्यांनी स्वतःचा स्वतंत्र संप्रदाय सुरू केला. शिष्यांकरवी भिक्षेच्या निमित्ताने समाजात जागृती आणण्याचा प्रयत्न केला. समाजातील तत्कालीन वर्णव्यवस्था मोडण्यापेक्षा दुर्लक्षिलेला वर्ग-अंत्यजाकडे अधिक लक्ष देण्यावर संत एकनाथांचे अधिक लक्ष होते.

संत एकनाथांचा जन्म संत भानुदासांच्या कुळातील होता. संत भानुदासांचा पुत्र चक्रपाणी, चक्रपाणींचा मुलगा सूर्यनारायण, सूर्यनारायणाच्या पत्नी रुक्मिणी हिच्या उदरी संत एकनाथ जन्माला आले. आई-वडिल लहानपणीच वारल्यामुळे त्यांचे पालन-पोषण त्यांचे पितामह चक्रपाणी यांनी केले. एकनाथ लहानपणापासून मोठे सात्विक, श्रद्धाशील व तैलबुद्धीचे असले पाहिजेत. ईश्वरभजनाकडे त्यांची प्रवृत्ती होती. वयाच्या सहाव्या वर्षी मुंज झाल्यावर संस्कृत भाषा, नित्यनैमित्तिक ब्रह्मकर्म वगैरे शिक्षण त्यांना मिळाले. दृष्टांतामुळे गुरुंच्या शोधात ते देवगिरीला जनार्दन स्वामींकडे गेले. त्यांनी तेथे गुरुची सेवा केली. गुर्वाज्ञेवरून चतुश्लोकी भागवतावर प्राकृत टीका लिहिली. त्यानंतर ते तीर्थयात्रेला गेले. उत्तर हिंदुस्थानात उज्जयिनी, मथुरा, वाराणसी, प्रयाग, गया, अयोध्या इ. ठिकाणी जाऊन येताना ते जुनागड, डाकोर वगैरे ठिकाणीही गेले होते. जनार्दन स्वामींच्या आज्ञेनुसार यानंतरचा काळ त्यांनी पैठणलाच काढला. त्यांची वृत्ती संसारविन्मुख, उदासीन होती. लोकांच्या विनंतीनुसार कीर्तन करायला त्यांनी प्रारंभ केला. घरातील वडिलधाऱ्यांच्या आग्रहावरून त्यांनी गृहस्थाश्रम स्वीकारला. पत्नीचे नाव

'गिरिजाबाई'. आजी-आजोबांच्या मृत्यूनंतर प्रपंचाचा भार नाथांवर पडला पण त्यांनी परमार्थाकडे दुर्लक्ष केले नाही. बारा वर्षेपर्यंत कथाकीर्तनाचा उत्कर्ष त्यांच्या घरी चालू असे. या काळात प्रत्यक्ष दत्त त्यांच्या घराच्या प्रवेशद्वारावर असे व परमेश्वर श्रीखंड्याच्या रूपाने त्यांची सेवा करीत असे अशी आख्यायिका आहे.

काही दिवसांनंतर ज्ञानेश्वर महाराजांच्या समाधीस्थानाकडे आळंदीला ते गेले. त्या काळी तेथे मोठे अरण्य होते. फिरता-फिरता त्यांना अजान वृक्ष सापडला. त्यावरून त्यांनी समाधीची जागा शोधून काढली. ज्ञानेश्वरीच्या अनेक हस्तलिखित प्रती मिळवून तुलनात्मक दृष्टीने त्या सर्वांचे संशोधन करून त्यांनी ज्ञानेश्वरीची शुद्धप्रत तयार केली.

भागवतावरील प्राकृत टीकेला त्यांनी सुरुवात केलेली होती. तिच्या दोन अध्यायांची नक्कल करून एक ब्राह्मण काशीला गेला. तेथे पारायण करताना पाहून तेथील मठाधिपतिंनी नाथांना काशीला बोलावले. तेथेही शांतपणे उत्तरे देऊन नाथांनी मठाधिपतींना जिंकले व त्यांच्या भागवत या ग्रंथाला काशीला हत्तीवरून मिरविण्याचा मान मिळाला.

चतु:श्लोकी भागवत, भागवताच्या एकादश स्कंधावरील प्राकृत टीका, रुक्मिणीस्वयंवरादि अनेक ग्रंथ लिहिल्यावर नाथांनी भावार्थरामायण हा प्रचंड ओवी संख्या असलेला ओवीबद्ध ग्रंथ लिहिण्यास प्रारंभ केला. या ग्रंथाच्या युद्धकांडाचे ४४ अध्याय पूर्ण झाल्यावर आपला निर्याणकाल जवळ आल्याचे जाणवले. त्यांनी गावबानामक ब्राह्मणाला ग्रंथ पूर्ण करण्यास सांगितला व फाल्गुन वद्य षष्ठी सन १५९९ ला देहत्याग केला.

समर्थ रामदास हे संत एकनाथांचे भाचे होते. परंपरागत रामभक्ती चालून आलेल्या ठोसर कुलकर्णी घराण्यात त्यांचा जन्म जांब येथे १६०८ मध्ये झाला. मूळचे नाव नारायण. त्यांची मुंज त्यांच्या वयाच्या ५ व्या वर्षी झाली. अतिशय बुद्धिमान असल्यामुळे त्यांचे अक्षरओळख, जमाखर्च यावरोबरच पुरुषसूक्त, रुद्र वैश्वदेव ब्रह्मयज्ञ इ. ज्ञानग्रहण झपाट्याने झाले. त्यांचे बालबोध अक्षर चांगले होते. त्यांना तालीमबाज सोबती घेऊन खेळण्याचा नाद होता.

वडिलांच्या मृत्यूमुळे नारायणाचा विवाह ७ व्या वर्षी होऊ शकला नाही. पुढे लग्नाची गोष्ट काढली की ते लक्ष देत नसत. आईला दिलेल्या शब्दानुसार ते लग्नाचा अंतरपाट धरेपर्यंत तेथे थांबले व भटजींच्या 'सावधान' या शब्दाबरोबर मांडवातून पळून गेले.

नदी ओलांडून समर्थ गोदातीरी नाशिकजवळ पंचवटीला गेले. जवळच्याच टाकळी या गावी एका गुहेत ते राहू लागले. प्रातःस्मरणादी नित्य कर्मे आटोपून सूर्योदयानंतर दोन प्रहरपर्यंत संगमस्थानी पाण्यात उभे राहून जप करण्याचा त्यांचा नियम होता. जपानंतर ब्रह्मयज्ञ करून पंचवटीला माधुकरी मागून टाकळीला परत जात व तिसरे प्रहरी पंचवटीला पुराणश्रवणाला जात. संध्याकाळी परत टाकळी येथील गुहेत मुक्काम. अशी खडतर तपश्चर्या समर्थांनी १२ वर्षे केली. या काळात त्यांनी कोणकोणत्या ग्रंथांचा अभ्यास केला याचा उल्लेख कोठे सापडत नाही. पण दासबोधाच्या पहिल्या समासात आधार ग्रंथांची यादी दिसते त्यावरून त्यांनी वेद, वेदांत, भागवत, उपनिषदे इ. संस्कृत ग्रंथांचे अध्ययन केले असावे. नंतर तीर्थयात्रेला गेले. प्रथम ते काशीला गेले. प्रयाग, गया, अयोध्या, वृंदावन, मथुरा, द्वारका इ. ठिकाणी जाऊन बद्रीनारायण, केदारेश्वरसह सर्व भारताची यात्रा पायी करण्यास त्यांना १२ वर्षे लागली. ज्या ज्या क्षेत्री समर्थ जात तेथे देवदर्शन घेऊन काही दिवस तेथे राहून लोकांची स्थिती समजाऊन घेत. नंतर योग्य गृहस्थाना अनुग्रह देऊन शिष्य करून घेत व मठस्थापना करून मारुतीची अगर रामाची स्थापना करून पूजेअर्चेची व्यवस्था करीत असत. तीर्थयात्रा करून आल्यावर पैठणला कीर्तन करीत असताना जांबच्या काही मंडळींनी त्यांना ओळखले व त्यांच्या मातोश्री आजारी असल्याबद्दल सांगितले. मातोश्रींना भेटण्यासाठी समर्थ जांबला गेले. तेथे काही दिवस राहून आईची आज्ञा घेऊन समर्थ गंगाप्रदक्षिणेला गेले.

गंगाप्रदक्षिणानंतर महाबळेश्वर, वाई, जरंडा इ. ठिकाणी जाऊन ते माहुलीला गेले. ते आल्याची बातमी पसरल्यावर आजूबाजूच्या गावातील काही संत मंडळी त्यांच्या भेटीला आली. वडगावचे जयरामस्वामी, निगडीचे रंगनाथस्वामी, ब्रह्मनाळचे आनंदमुनीजी, भागानगरचे केशवस्वामी हे चार संत व समर्थ मिळून दासपंचायतन या नावाने प्रसिद्ध आहेत.

पुढे ते समाजातील सत्शील मंडळी शोधून अनुग्रह देऊ लागले. सुरुवातीच्या काळात शहापूरच्या कुलकर्णी पती-पत्नी, आबाजी गुजर, दत्ताजी अनंत इ. ना अनुग्रह दिला असल्याचा उल्लेख येतो.

यापुढचे समर्थांचे आयुष्य महाराष्ट्रात ठिकठिकाणी मठस्थापना, मारुतीस्थापना करण्यात निरनिराळ्या डोंगरावर राहण्यात गेल्याचे दिसते. अनेक शिष्य होऊन संप्रदाय वाढत चालला होता. तेव्हा त्यांनी श्रीरामनवमीचा उत्सव मसूर या गावी सुरू केला. त्यांनी शिवाजी महाराजांची भेट होऊन त्यांना शिष्यत्व दिल्याचा उल्लेख आढळतो.

सन १६५० मध्ये समर्थ परळीला नेहमी राहण्यासाठी गेले. परळी म्हणजे आजचा सज्जन गड. सज्जन गडावर अनेक साधू-संत समर्थांना भेटण्यासाठी येत असत. उत्सवानिमित्त बाहेर गेल्याचा अपवाद वगळता समर्थ अखेरपर्यंत (१६८१) सज्जन गडावरच राहिले होते.

संत एकनाथ व समर्थ रामदास यांची चरित्रे पाहता काही साम्यभेद आढळतात -

संत एकनाथांनी गृहस्थाश्रम स्विकारला होता. तर समर्थांनी लौकिक अर्थाने गृहस्थाश्रम न स्विकारता समाजाचा संसार सुधारण्याचे व्रत घेतलेले दिसते. संत एकनाथांचे गुरु जनार्दन स्वामींचा उल्लेख अनेक ठिकाणी आहे. तसा कोणी गुरु समर्थांना नसावा. प्रभु रामचंद्रांनीच त्यांना अनुग्रह दिलेला होता. दोघांनीही तीर्थयात्रा करताना तत्कालीन सामाजिक परिस्थितीचे बारकाईने अवलोकन केलेले होते. त्यावर कार्य करण्याच्या त्यांच्या पद्धती मात्र वेगवेगळ्या आहेत. संत एकनाथांनी ग्रंथलेखन, कीर्तन, उत्सव यांद्वारे समाजाला जागृत करण्याचा प्रयत्न केला. तर समर्थांनी स्वतःचा शिष्यसंप्रदाय निर्माण करून मारुतीस्थापनेद्वारे बलोपासनेचे महत्त्व लोकांना समजावून सांगून रामनवमीच्या उत्सवाद्वारे समाज जागृती करण्याचा प्रयत्न केला. या दोघांच्याही चरित्रात अनेक चमत्कृतीपूर्ण घटना आहेत. संत एकनाथांच्या चरित्रातील - अंत्यजांकडे जेवत असताना घरीही दिसणे - अशा घटनेमधून

त्यांची सामाजिक दृष्टी दिसते व तत्कालीन वर्णव्यवस्थेला मान दिल्याचेही दिसते. समर्थांच्या आयुष्यातील चमत्कृतिपूर्ण घटनेवरून मसूरला पहिला रामनवमी उत्सव चालू असताना मिरवणुकीस झाडाच्या शाखांचे विघ्न आले तेव्हा ते तोडण्यासाठी समर्थांनी रातोरात विजापूरला जाऊन बादशहाची परवानगी आणली - या घटनेवरून समर्थांची कार्यसिद्धीस नेण्याची तळमळ दिसून येते.

समर्थांच्या शिष्यपरिवारात काही स्त्री-शिष्यांचा उल्लेख आहे. आक्कास्वामी तर मठाधिपती होत्या. संत एकनाथांचा असा शिष्यपरिवार असल्याचे आढळत नाही.

संत एकनाथांची व समर्थ रामदासांची ग्रंथसंपदा विपुल प्रमाणात आज उपलब्ध आहे. प्रकाशितही झालेली आहे. संत एकनाथांचे प्रबंध लेखन अधिक आहे. त्यांची कविप्रकृती अधिक वैचारिक आहे. काव्यपद्धती निरुपणाची दिसते. स्फुटकाव्य अधिक लिहिले असले तरी त्यांची ग्रंथरचना जास्त मान्यता पावली आहे. त्यांचे विराट वाङ्मय हे त्यांच्या व्यासंगातून, साक्षेपातून व समाजमनस्क विचारप्रणालीतून प्रकट झालेले दिसते.

भाष्यग्रंथ, कथाग्रंथ, प्रकरणात्मक रचना, स्फुट मराठी अभंग व हिंदी पदे अशी बहुविध स्वरूपाची कविता संत एकनाथांनी लिहिली. हे नाथवाङ्मय केवळ विस्ताराच्या दृष्टीने पाहिले तरी प्रचंड आहे. श्रीमद्‌भागवताच्या दुसऱ्या स्कंधातील नवव्या अध्यायाच्या केवळ चार श्लोकांवर त्यांनी १०३६ ओव्यांचा भाष्यग्रंथ 'चतुःश्लोकी भागवत' रचला. भागवतपुराणाच्या एकादश स्कंधावर १८,८०० ओव्यांची टीका नाथांनी तयार केली. वारकरी संप्रदायात नाथभागवत हा ग्रंथ ज्ञानेश्वरीच्या बरोबरीने मानला जातो. त्यांचे 'रुक्मिणी स्वयंवर' हे आख्यान काव्य सामान्य माणसाला अधिक जवळचे वाटते. अध्यात्म, भक्ती व विनोदाच्या सहाय्याने सांगितल्याचे दिसते. 'भावार्थ रामायण' हा नाथांचा अपुरा राहिलेला ग्रंथही पंचवीस हजार ओव्यांचा आहे. या ग्रंथात त्यांनी अध्यात्माचे निरुपण केले आहेच. पण राजधर्म आणि युद्धनीती यांचेही विवेचन केले आहे. तत्कालीन परिस्थितीत नेमकेपणाने रामकथा नाथांनी समाजासमोर ठेवली व रामभक्तीचा पाया महाराष्ट्रात घातला.

या प्रबंध रचनेशिवाय हस्तामलक. शुकाष्टक, स्वात्मसुख, आनंदलहरी, चिरंजीव पद अशी चार हजार ओव्यांची आध्यात्मिक प्रकरणे तुलसीमहात्म्य, रुक्मांगगाथा, हळदुली अशी पौराणिक आख्याने व ध्रुव, ज्ञानदेव, नामदेव इ. सारखी भक्तचरित्रे नाथांनी लिहिली.

याशिवाय चार हजार अभंगपदांचा नाथगाथा, गौळणी विरहिणी, भारुडे, कथाकाव्य, स्तोत्रे, आरत्या, पदे, रूपके आणि मधुरा भक्तिपर रचना असा नाथांचा साहित्य संचार वैविध्यपूर्ण आणि गुणसमृद्ध आहे. नाथांची भारुडे अधिक प्रसिद्ध आहेत. त्यातूनही त्यांचे वाङ्मयीन व्यक्तिमत्त्व प्रभावीपणे दिसून येते.

समर्थ रामदासांचा 'श्रीमद् ग्रंथराज दासबोध' हा मध्ययुगीन काळातील पहिला स्वतंत्र ग्रंथ होय. गुरुशिष्य संवादरूप अशा या ग्रंथात अनेक विषय आलेले आहेत. दासबोध म्हणजे समर्थांची वाङ्मयीन मूर्ती होय. दहा समासांचा एक दशक असे वीस दशक म्हणजेच एकूण दोनशे समास प्रदीर्घ काळात लिहिले गेले आहेत. नवविधा भक्तीपासून सुरुवात करून आत्मा, अनात्मा ते परमात्मा, विश्वाची उभारणी, संहारणी, विद्या-कुविद्या इ. अनेक विषयांवर त्यांनी विवेचन केलेले आढळते. बद्ध, मुमुक्षु, गुरु, निस्पृह, महंत, साधक इ. ची शब्दचित्रे मुळातूनच वाचण्यासारखी आहेत. याशिवाय सर्वसामान्यांना भावणारे व्यवहारज्ञान यात विपुल प्रमाणात आढळते. लौकिक अर्थाने त्यांनी स्वतःचा प्रपंच केला नसला तरी सर्वसामान्यांनी प्रपंचाची हेळसांड करणे त्यांना मान्य नव्हते. 'आधी प्रपंच करावा नेटका' असेच त्यांचे सांगणे होते.

दासबोधाप्रमाणेच प्रसिद्ध आहेत समर्थ रामदासांचे 'श्रीमनाचे श्लोक' ही रचना त्यातील गेयतेमुळे पाठ करायला सोपी आहे. परंतु अर्थ पाहू जाता कठीण वाटते. हे श्लोक जरी आपण लहान मुलांना पाठ करायला देत असलो तरी ते साधकांसाठीच आहेत. जीवनातील कठोर सत्याचे दर्शन या श्लोकांमधून पाहायला मिळते. एकनाथ गाथेप्रमाणेच समर्थ गाथाही विपुल आणि विविध अभंगांचीच आहे. नाथांप्रमाणेच समर्थांनीही बोधकृतींच्या उपासकांच्या भूमिकेतून बरीच रचना केली. याचबरोबर आत्माराम, करुणाष्टके, रामायणातील प्रसंगावर आधारीत युद्धकांड, सुंदरकांड, अनेक प्रासंगिक स्फुट काव्ये अशी समर्थांची वाङ्मयसंपदा आता प्रकाशित झालेली आहे. त्यांच्या वाङ्मयाच्या अधिक अभ्यासासाठी समर्थ वाग्देवता मंदिर व सत्कार्योत्तेजक सभा अशा दोन संस्था कार्यरत आहेत. नाथांच्या अध्ययन संशोधनासाठी औरंगाबादच्या एकनाथ संशोधन मंदिर संस्थेने केलेले कार्य महत्त्वपूर्ण आहे.

संतांची जीवन परिवर्तनविषयक भूमिका मूर्तीभंजक सुधारकाची नसते. देवाधर्माची भक्ती वाढवणे हे संतांचे मुख्य कार्य असल्यामुळे त्या कार्यामागील तत्त्वज्ञान एकाच विशेष धोरणाचे असते. दुर्लभ अशा समजल्या जाणाऱ्या नरदेहाची प्राप्ती झाल्यावर त्याचा विशेष लोभ न धरता सारे आयुष्य संसारविषयक अनासक्तीने देवाधर्माच्या सेवेत वेचावे हे त्या तत्त्वज्ञानाचे मुख्य सार आहे. सभोवतालच्या जगाविषयी अनासक्तीचा प्रभाव दिसला पाहिजे. मनाच्या बुद्धीच्या व्यापारानाही तिलांजली मिळाली पाहिजे. अर्थात अनासक्ती म्हणजे प्रपंच त्याग नव्हे तर उदासीनता. प्रपंचाच्या अनासक्तीने आयुष्य निष्क्रीय होऊ नये म्हणून देवाचे स्मरण आणि कीर्तन ही दोन कर्तव्ये सांगितली आहेत. त्याचे प्रतिबिंब संत एकनाथ व समर्थ रामदास यांच्या जीवनकार्यात आपल्याला दिसून येते. संत एकनाथांनी अनासक्तीने स्वतःचा प्रपंच केला व जनजागरण प्रभावीपणे केले. समर्थ रामदासांनी लौकिक अर्थाने प्रपंच केला नाही पण जनजागरणाचे कार्य कीर्तन, प्रवचन व रामनवमीच्या उत्सवाद्वारे, ठिकठिकाणी मठस्थापना करून केले. संत एकनाथांनी लोकशिक्षणावर भर दिला. तर समर्थांनी लोकांना कार्य करण्यास प्रवृत्त केले. वीर पुरुष निर्माण व्हावेत यासाठी प्रयत्न केला. एकनाथांनी मराठी भाषेला आपल्या वाङ्मयाद्वारे समृद्ध केले तर समर्थांनी खऱ्या अर्थाने समर्थ बनविले.

सौ. आशा सुधीर राशिंगकर
१० बेल मौंट पार्क, आय. सी. एस. कॉलनी,
पुणे ४११ ००७.

# संत एकनाथांचा गृहस्थाश्रम

**श्री. दा. वा. केळकर,** संयोजक पत्रद्वारा दासबोध अभ्यास

प्रपंच व परमार्थ दोन्ही क्षेत्रातील कामगिरी सर्वश्रुतच आहे. अखिल भारतीय स्तरावर विज्ञानावरील प्रबंधाला एन.सी.ई.आर.टी. तर्फे ३ वेळा पुरस्कार, विज्ञान व स्काऊटिंगवर अनेक पुस्तके. १९७४ मध्ये राष्ट्रपतींच्या हस्ते स्पेशल नॅशनल ॲवॉर्ड हा शिक्षक पुरस्कार, सज्जनगडचा श्रीसमर्थ पुरस्कार, मधुसंचय पुरस्कार, समाजभूषण पु. पा. गोखले पुरस्कार, पत्राद्वारा दासबोधाचा प्रसार ५५,००० लोकांना दासबोध अभ्यासास प्रवृत्त, विशेष म्हणजे पत्नी सौ. गीता केळकर यांचा पूर्ण सहभाग.

*नाना वेष नाना आश्रम । सर्वांचे मूळ गृहस्थाश्रम ।*
*जेथे पावती विश्राम । त्रैलोक्यवासी ॥ १४-७-१*
*या कारणें गृहस्थाश्रम । सकळांमध्ये उत्तमोत्तम ।*
*परंतु पाहिजे स्वधर्म । आणी भूतदया ॥ १४-७-४*

दासबोधामध्ये श्रीसमर्थांनी गृहस्थाश्रमाची थोरवी वर्णन केली आहे. ईश्वरानेच ही सृष्टी चालविण्यासाठी स्त्री आणि पुरुष ही जोडी निर्माण केली. त्यातूनच गृहस्थाश्रम निर्माण झाला. पति-पत्नी हे नाते सद्‌धर्माच्या अधिष्ठानावर पालन करणे, त्यामध्ये स्वधर्म आणि भूतदया यांचा अंतर्भाव असणे मात्र महत्त्वाचे आहे. ज्यांनी संसार नेटका केला आणि धन्य झाले अशांमध्ये पैठणचे संत एकनाथ यांचा समावेश होतो. सुख, समृद्धी आणि समाधान यानी नाथांचा संसार तुडुंब भरलेला होता. नित्यानित्यविवेक, न्यायनीतीचे वागणे, चोखपणाचे व्यवहार, अन्नोदकवस्त्रदान, भूतदयेने वागणे, हरीकथा निरुपणे अखंडपणे करणे, यात्राप्रसंग या मार्गाने संत एकनाथांचा गृहस्थाश्रम चालू राहिला; त्यामुळे त्यांचा गृहस्थाश्रम धन्य झाला. ज्या महापुरुषाच्या केवळ दर्शनानेसुद्धा लोक पावन होतात असे संत एकनाथ महाराज होते. त्यांच्या या यशस्वी जीवनाचे श्रेय त्यांच्या धर्मपत्नी अखंड सौभाग्यवती गिरिजाबाईंना आहे. नाथांची सहधर्मचारिणी, खऱ्या अर्थाने अर्धांगिनी आणि पतिव्रता गिरिजा ही त्यांच्या वैभवाची निःसंशय वाटेकरीण आहे. पत्नीची कर्तव्ये पार पाडीत असताना आदर्श माता तर त्या होत्याच पण त्याखेरीज पत्नीने घेतलेल्या व्रतामध्ये प्रभुरामचंद्रांच्या सीतेने ज्याप्रमाणे सहकार्य केले, त्याचप्रमाणे नाथांना सहकार्य गिरीजेने केले - त्या अर्थानेही त्या आदर्श पतिव्रतामध्ये त्यांची गणना केली जाते.

## नाथांचे अल्पचरित्र

विजयनगर येथून श्रीविठ्ठलाची मूर्ती पंढरीला ज्यांनी परत आणली त्या संत भानुदासांच्या वंशात एकनाथांचा जन्म झाला. पैठण हे त्यांचे जन्मस्थान. रुक्मिणी हे आईचे, सूर्यनारायण हे त्यांच्या पित्याचे नाव. नाथांच्या जन्मानंतर उभयता लवकरच निवर्तल्यामुळे त्यांचे आजोबा चक्रपाणी यांनी त्यांचे संगोपन केले. भानुदासांच्या वंशात ते एकटेच राहिले असल्यामुळे आजोबांनी त्यांचे नाव एकनाथ असे ठेवले, असे म्हणतात.

सहाव्या वर्षी एकनाथांची मुंज झाली. त्यानंतर दत्तोपासक संत म्हणून ज्यांचा उल्लेख केला जातो त्या जनार्दनस्वामींकडे नाथांचे अध्ययन झाले. एकनाथांचे आजी-आजोबा यांना नाथांचा संसार उभारण्याची उत्कंठा लागली होती. जनार्दनस्वामींना त्यांनी तशी परवानगी विचारली आणि मूलतः विरक्त असलेल्या जनार्दन स्वामींनी नुसती अनुज्ञा दिली असे नव्हे तर गृहस्थाश्रमी होण्याची आज्ञाच केली. देवगिरी येथील त्रिविक्रम शास्त्रींची सुकन्या 'गिरिजा' हिच्याशी एकनाथांचा विवाह त्यांनीच घडवून आणला, अशी हकिगत नाथांचे आद्यचरित्रकार श्रीकृष्णदास जगदानंदन यांनी म्हटले आहे. नाथांना पहिल्या दोन मुलींच्या पाठीवर मुलगा झाला. हरिपंडीत हे त्याचे नाव. हा संस्कृत भाषेचा मोठा अभिमानी होता. नाथांनी मराठीमध्ये काव्यरचना करावी याबद्दल त्याला वैषम्य वाटत असे. पण काशीमध्ये नाथांचा सत्कार तेथील शास्त्री-पंडितांसह सर्वांनी केला आणि त्यांच्या ग्रंथाची मिरवणूक हत्तीवरून काढली तेव्हा मात्र हरिपंडिताला आपल्या पित्याची थोरवी समजून पश्चाताप झाला.

## नाथांची सहधर्मचारिणी - गिरिजा

एकनाथांचे मनामध्ये प्रचंड वाङ्‌मय निर्मिती करून धर्मग्लानी नाहिशी करण्याचे विचारांची खळबळ माजलेली होती. सर्वसामान्य माणसापर्यंत मानवतेचे विचार पोहोचावेत यासाठी जीवन समर्पित करण्याचे त्यांचे स्वप्न होते. त्या दृष्टीने विवाहाचे बंधनात पडणे त्यांना अनिष्ट वाटले होते. तथापि त्यांना सर्वतोपरि सहाय्य करणारी गिरिजेसारखी आदर्श पत्नी लाभली त्यामुळे नाथांनी पूर्वायुष्यात समाजकार्याची जी कल्पना केली होती त्याच्या कितीतरी पटीने प्रत्यक्ष कार्य ते करू शकले. गिरिजेचा नाथांच्या घरी आणि त्यांच्या हृदयातही प्रवेश झाला तसा त्यांचा उत्साह द्विगुणित झाला. पत्नीच्या पाठिंब्यावर समाजात एकेक पाऊल टाकणारे संत एकनाथ लोकांचे सिंहासनाधिष्ठित ईश्वरच बनले.

संसारामध्ये अनेक कटकटी, शब्दाशब्दी होते पण गिरिजेचा स्वभाव इतका मनमिळावू होता की नाथांशी तिचा वैचारिक मतभेद कधीही झाला नाही. नाथांच्या चरित्रामध्ये असे अनेक प्रसंग आहेत की त्यामुळे असे दिसून येते की त्यांचे विचार काळाच्या खूपच पुढे होते. पण त्या विचारांशीही गिरिजाबाई पूर्ण सहमत होत्या.

एकनाथांनी मोळीविक्यांना भोजन घातल्याची कथा आहे. त्यांच्या घरी पितरांचे श्राद्ध होते. श्राद्धाकरिता उत्तम प्रकारचा स्वयंपाक सुगृहिणी गिरिजाबाईंनी केला होता आणि भोजनासाठी ब्राह्मणांना निमंत्रणेही

गेली होती. जेवणाची वेळ जवळ आली होती इतक्यात काही मोळीविके नाथांच्या घरावरून जात होते. मध्यान्हीची वेळ, श्रमाने त्यांच्या पोटात भुकेचा वणवा पेटला होता. तशातच सुग्रास अन्नाचा खमंग वास त्या मोळीविक्यांना आला. साहजिकच त्यांच्या तोंडाला पाणी सुटले. ते सर्वजण थबकले व एकाने उद्गार काढले, 'आपल्याला असे अन्न मिळाले तर किती बहार होईल नाही का?' हे शब्द ब्राह्मणांची मार्गप्रतिक्षा करणाऱ्या नाथांच्या कानांवर पडले. त्यांच्या मनात कालवाकालव झाली त्याच वेळी पानावर अन्न वाढणाऱ्या गिरिजेने त्यांची चर्या पाहिली आणि मग क्षणाचाही विलंब होऊ न देता गिरिजा त्यांना म्हणाली, "आपण त्या मोळीविक्यांना बोलवा ना घरात भोजनाला. भुकेल्याला वेळीच अन्न दिलं ते पितरांना पावते."

नाथांच्या डोळ्यांत आनंदाश्रू आले. त्यांनी त्या मोळीविक्यांना घरात बोलाविले आणि हातपाय धुण्यास पाणी देऊन त्यांनाच भोजनासाठी पाटावर बसविले. सर्वांची यथास्थित भोजने झाली. त्या अन्नाने तर मोळीविक्यांची पोटे तृप्त झालीच पण नाथांच्या म्हणजेच पर्यायाने गिरिजाबाईंच्या भूतदयेने मनेही भारावून जाऊन तुष्ट झाली. समाधानाने ढेकर देऊन ही मंडळी घराबाहेर पडली.

इतक्यात निमंत्रित ब्राह्मण मंडळी घरी आली पण झालेला प्रकार पाहून त्यांनी भोजन घेण्याचे नाकारले. पुन्हा स्वयंपाक करून सर्वांना भोजन देण्यास गिरिजाबाई सिद्ध होत्या. पण त्या ब्राह्मणांनी स्पष्टच बजाविलं की, "अंत्यजांना अन्न घालणाऱ्याच्या घरी आम्ही अन्नग्रहण करणार नाही."

नाथांनी ब्राह्मणांच्या असल्या रागाची वा रुढीप्रियतेची पर्वा केली नाही. त्यांच्या पाठीशी गिरिजेसारख्या शक्तीची पाठराखण होती. नाथांचे मनाचे थोरपण गिरिजेला समजले होते. कारण तीसुद्धा अत्यंत थोर मनाची स्त्री होती ! तिला समजलेला अध्यात्म कृतीमध्ये आणण्याचे धाडस तिच्या अंगी होते.

दुसरा प्रसंग असाच आहे. एकनाथ हे शांतीब्रह्मच होते. त्यांना राग आणण्यासाठी एक यवन त्यांच्या अंगावर अनेकदा थुंकला. पण दरवेळी नाथांनी नदीवर जाऊन स्नान केले. त्यांची शांती थोडीसुद्धा भंग पावली नाही. शेवटी यवनालाच पश्चाताप झाला ही गोष्ट गावातील लोकांना समजली तेव्हा एकनाथांची शांती भंग करण्यासाठी त्यांनी पैज मारली. पैशासाठी नाडलेल्या एका भटजीने पैज जिंकण्याचे ठरविले. नाथांच्या घरी ते पूजामग्न होते इतक्यात तो भटजी तेथे जोडे घालूनच गेला. पण नाथ त्याला म्हणाले, "मला भेटण्याची तुमची केवढी ही ओढ! पादत्राणे घालूनच देवघरात तुम्ही आलात." असे म्हणत नाथांनी त्याला भोजनासाठीही थांबवून घेतले. गिरिजाबाईंनी हा सर्व प्रकार पाहिला होता. आपल्या पतीची शांतीब्रह्म ही कीर्ती पुसून टाकण्यासाठी हे भटजी आले आहेत हे त्यांनी ओळखले आणि त्यांचा हा हेतू तडीला जाऊ न देण्याचा विचार त्यांनी केला. भोजनाची तयारी करून गिरिजाबाईंनी पाने मांडली. गिरिजाबाई खाली वाकून कामे करीत होत्या. नीतीचे आचरण सोडून तो भटजी एकाएकी बेशरमपणे गिरिजाबाईंच्या पाठीवर बसला. नाथांना त्याचे हसू आले. ते म्हणाले, "अगं, सांभाळ हं त्या बाळाला नाहीतर तो खाली पडायचा !" आणि गिरिजाबाई तत्काळ उद्गारल्या, "एवढी का काळजी आपण करायची. मुलांना पाठीवर घेऊन काम करायची सवय आहे मला." आणि मग मात्र त्या भटजींची फटफजिती झाली. त्याने उभयतांना दंडवत घालूनच वंदन केले आणि त्याने सांगितले, "तुम्हाला क्रोध आणायचा आणि पैज जिंकायची या बुद्धीने मी असा वागलो. चार पसडे मिळविण्यासाठी तुमच्यासारख्या संतांना मी त्रास दिला... आता तरी जोड्यानं मला मारा !"

नाथ हसत म्हणाले, "तुला पैजेची रक्कम मिळवी म्हणून तू सांगितलं असतंस तर पूर्वीच नसते का राग आल्याचे नाटक आम्ही केले?"

खजील होऊन आणि शतदा संत एकनाथ आणि गिरिजाबाई यांना वंदन करीत तो भटजी खाली मान घालून पसार झाला.

संत एकनाथांच्या घरी जातीभेद मुळीच नव्हता. त्यामुळेच परमेश्वराने श्रीखंड्याचे रूप घेऊन पाणी भरण्याची सेवा केली ! एकनाथ महाराज एकदा नदीवरून मध्यान्ही स्नान करून परत येत होते. उन्हाळ्याचे दिवस असल्याने वाळवंट तापले होते. इतक्यात एका बालकाचे कळवळून रडणे त्यांच्या कानांवर पडले. आजूबाजूला पाहतात तो एक दोन-तीन वर्षांचे बालक वाळवंटात उघडे-वागडे धावत आहे. बाजूची माणसे आपल्याच तंद्रीत होती त्यांना बाजूला पाहण्यास वेळ नव्हता. त्या कोवळ्या बालकाच्या पायाला वाळूचे चटके बसत होते. मातेला हाका मारीत ते फिरत होते. त्या दृश्याने महाराजांचे अंतःकरण कळवळले. त्यांनी पटकन् जाऊन बालकाला कडेवर घेतले आणि लगबगीने ते घरी आले. त्या वेळी गिरिजाबाईंनी पुढे होऊन त्यांच्या कडेवरील बालकाला हाती घेतले. त्याला खाऊ-पिऊ घातले आणि नंतर नाथांनी बालकाला त्याच्या घराचा तपास करून घरी स्वतः पोहोचते केले. ते बालक महारवाड्यातील एका घरचे होते. त्या बालकाच्या माता-पित्यांना एकनाथांच्या रूपात परमेश्वर दिसला असेल यात काय नवल ! विचाराने आणि आचाराने नाथ आणि गिरिजाबाई शुद्ध मानवधर्मी होत्या म्हणूनच स्पृशास्पृश्यता पाळण्याच्या त्या तमोयुगात उभयतांचे तेज सूर्याला दिपविण्यासारखे दिसते. मी जेव्हा नाथसागर जलाशयाचे दर्शन घेतले तेव्हा त्या समुद्रासारख्या प्रचंड जलाशयाकडे पाहताना गिरिजामातेचीही आठवण मला एकनाथांबरोबरच झाली. त्या उभयतांचेही नाव त्या जलाशयाला धावयास हवे होते असे मला वाटते.

काशीची कावड रामेश्वराला घालण्याच्या प्रसंगीही वाटेतच तहानेने तडफडणाऱ्या गर्दभाच्या मुखामध्ये नाथांनी कावड घातली ही त्यांची भूतदया म्हणजे *'जें जें भेटे भूत । तें तें मानिजे भगवंत।।'* किंवा *'पृथ्वीमध्यें जितुकीं शरीरें । तितुकीं भगवंताचीं घरें !'* असे म्हणणाऱ्या संतांच्या विचारांचे प्रत्यक्षात आचरणात आणले गेलेले पालनच होते. त्याबद्दल एकनाथांचे अभिनंदनच गिरिजाबाईंनी केले असले पाहिजे

यात मला शंकाच नाही !

त्यांच्या संसारात असा प्रसंग घडला की सद्गुरू जनार्दनस्वामींच्या समाधीनंतर षष्ठीचा महोत्सव करण्याचे नाथांनी ठरविले. अन्नसत्र घातले त्यासाठी कर्जाऊ पैसे काढावे लागले. कर्जफेड करण्यासाठी सावकाराने मुदत घातली होती. ती मुदत पाळता आली नाही म्हणून अन्नग्रहण न करण्याचे नाथांनी ठरविले पण हा उपास एकट्या नाथांनी केला नाही गिरिजाबाईनीही त्यांच्याबरोबर पाणीही न घेता अनशन केले. पण पांडुरंगकृपेने उभयतांची सुटका झाली. सावकाराचे कर्ज समाजाने फेडले व नाथ ऋणमुक्त झाले.

*'सदा सर्वदा देव संन्नीध आहे ।*
*कृपाळूपणे अल्प धारिष्ट आहे ।।'*

देवाने नाथांची आणि गिरिजाबाईचीही थोडीशी परीक्षा पाहिली.

पति-पत्नीच्या विचारातील एकता किती असू शकते याचे अत्युच्च उदाहरण रामायणामध्ये सापडते. राज्याभिषेकानंतर श्रीरामांनी सुग्रीव, अंगद, नलादी सर्वांना उत्कृष्ट भेटी दिल्या. सीतामाईला तर स्वतःच्या गळ्यातील सुवर्णाचा हार दिला. पण मारुतीला काही एक दिले नाही. सीतेच्या ही गोष्ट नजरेस आली. तिने एक वेळ श्रीरामांकडे नेत्रकटाक्ष टाकला. तिला काय म्हणावयाचे आहे हे श्रीरामांना कळले आणि रामांना काय म्हणावयाचे आहे हे सीतेलाही समजले. तिने स्वतःच्या गळ्यात श्रीरामाने घातलेला सुवर्णपुष्पे व हिरे जडविलेला बहुमोल असा हारच स्वतः गळ्यातून काढून हनुमंताच्या गळ्यात भेट म्हणून घातला !

पतीने पत्नीला दिलेली बहुमोल भेट जेव्हा ती पत्नी एखाद्या परपुरुषाला देते तेव्हा केवढा भयंकर प्रसंग एरव्ही घडला असता पण सीतेने हनुमंताला तो हार दिलेला पाहून श्रीरामांना मात्र परमसंतोष वाटला ! विशुद्ध प्रेम आणि परस्परातील एकात्मता प्रभुरामचंद्र आणि सीतामाई यांच्यात आढळते तशीच प्रेम व एकात्मतेची भावना संत एकनाथ महाराज आणि त्यांच्या पत्नी सौ. गिरिजा माता यांच्यामध्येच आढळून येते आणि म्हणूनच त्यांचा संसार म्हणजे *'जनी जाणिजे योग हा सुकृताचा'* असेच उद्‌गार आपल्या मुखातून बाहेर पडतात.

श्री. द्वा. वा. केळकर
रघुनंदन, पटवर्धन बाग,
एरंडवणा, पुणे ४११ ००४.



# नाथांचे अभंग

**माधव देव**

बी.ए.एल.एल. बी., ५० वर्षे वकिली - इंदोर-मध्यप्रदेश हायकोर्ट, अमृतानुभव, भावार्थ अष्टावक्रगीता, मानवी जीवन व मुक्ती, आधुनिक चिंतन १ ते ३ भाग, तीर्थंकार महावीर स्वामी इ. पुस्तके प्रसिद्ध. होळकरी कर्मचारी संघ अध्यक्ष.

*॥ 'जैशी स्थिती आहे तैशा परी राहे' ॥*

फिरावयास जात असतां, सायंकाळच्या शान्त समयी जवळील घरातून वाजणाऱ्या रेडिओतून अभंगाची वरील ओळ कानावर येताच पाय जागच्या जागीच थबकले. आवाज गोड होता. अभंगाच्या ओळी घोळून-घोळून गायल्या जात होत्या. आधी मला हा अभंग संत तुकाराम यांचा असावा असे वाटले. पण अभंगाच्या शेवटच्या ओळीतील एका जनार्दनी हे नाव ऐकताच, हा अभंग संत एकनाथांचा आहे हे कळले आणि ह्या बरोबरच ह्या वेळेस माझ्या मनात काही समस्यांचे जे वादळ उठले होते ते वरील ओळी ऐकून आपोआप शांत झाले. एकनाथ महाराज अगदी वेळेवर मदतीला धावून आले. "जसे आहे तसे राहण्यातच आनंद आहे."

घरी परतल्यावर हाच अभंग परत वाचण्याची इच्छा झाल्यामुळे संत एकनाथांची अभंगाची गाथा काढली. श्री. आवटे यांनी प्रकाशित केलेल्या गाथापंचकीच्या अभंगाची ही गाथा आमच्या वडिलांनी जवळ-जवळ ऐंशी वर्षापूर्वी विकत घेतलेली दिसते. कारण हिच्या पहिल्या पानांवर आमच्या वडिलांच्या मोडी लिपीतील सही खाली दि. ९-६-१९१७ ही तारीख आहे. ह्या गाथेत हरिनाममहिमा प्रकरणात हा अभंग ११४३ वा आहे. अभंग आधीच पाठ झाला होता. संत तुकारामांचे अनेक अभंग मला मुखोद्गत होते. "सगुणापासून निर्गुणापर्यंत" हा माझा संत तुकारामांवरील लेखही प्रसाद मासिकात छापून आला होता.

संत ज्ञानेश्वर, संत तुकाराम, व संत एकनाथ ह्यांचे अभंग वाचताना हे लक्षात ठेवले पाहिजे की संत ज्ञानेश्वर हे संसाराच्या संपर्कात न आलेले बालयोगी होते. संत तुकारामांना संसाराचा ताप सहन न झाल्यामुळे त्यांनी काही दिवस संसार करून संसार सोडला, आणि त्याच्या उलट संत एकनाथांचे आजीवन सुखी संसारी जीवन होते. कर्मनिष्ठ कुटुंबात जन्म झाल्यामुळे पूर्वापार चालत आलेले सर्व परंपरागत विधी, व्रत वैकल्ये, श्राद्ध पक्ष आदी त्यांच्या कुटुंबात त्यांची सुशील पत्नी गिरजाबाई ह्यांच्या देखरेखीखाली चालत. त्यांना एक मुलगा, दोन मुली होत्या. बालपणी त्यांचे वेदाध्ययन झाले होते, पण त्यांना कथा-पुराणे वाचण्याचाही नाद होता. नाथांचा सुखी संसार होता हे सांगण्याचे मुख्य कारण म्हणजे संसार सागरात राहूनसुद्धा एकनाथ महाराज कमल पत्रासारखे अलिप्त राहून मुक्त, स्वच्छंद, आनंदी जीवन जगत होते. त्यांच्या पुढील अभंगात जणू ते स्वतःचेच जीवन वर्णन करीत आहेत, असे वाटते.

*"परमार्थे साधे सहज संसार । येरझार नाही जना । सहज संसारे घडे परमार्थ ॥ लौकिक विपरती अपवाद ॥* आणखी हा अभंग पाहा *.जगाचिये नेत्रीं दिसे तो संसारी । परि तो अंतरी स्फटिक शुद्ध ॥ वायांचि हाव न धरी कांहीं पोटी । वाउगी ती गोष्टी न करी जगा । स्त्रीपुत्र धन नाही तेथे मन । इष्ट मित्र कारण नाहीं ज्याचे । एका जनार्दनी प्रपंच परमार्थ । सारिखाचि होत तयालागी॥*

एकनाथांचे गुरू जर्नादन स्वामी ह्यांनी एकनाथांना जो अभंगरूपाने उपदेश केला त्याचीच परिणती नाथांच्या जीवनात व अभंगात झालेली दिसते, पाहा :

*नको गुन्तू बापा लटिक्या प्रपंचासी बापा । मार्ग आहे सोपा पंढरीचा ॥ न लगे पुसावे आटाआटी काही ॥ आणिके प्रवाही गुन्तू नको ॥ मांबवल्यावरी जन झाले मूढ । विसरले दृढ विठोबासी । म्हणे जनार्दन एकनाथा विके । साधी तूं कौतुके हेंचि वर्म ॥"*

मोक्षप्राप्तीकरता ज्ञान, भक्ति व कर्म असे तीन योगमार्ग भगवंतांनी गीतेत सांगितले आहेत. ह्या तीनही मार्गांवर एकनाथांनी अभंग रचलेले आहेतच. पण त्यांच्या अभंगाचा खरा भर भक्ती व कर्म मार्गावर आहे. तुकाराम महाराजांनी स्वतःच्या जीवनावर अनेक अभंग रचलेले आहेत. पण नाथांनी स्वतःच्या जीवनावर एकही अभंग लिहिलेला मला आढळला नाही. नाथांनी आजीवन सुखाने संसार केला. ह्या कामात त्यांना त्यांची सुशील पत्नी गिरजाबाई हिचे हरप्रकारे सहाय्य होत होते. इतके असूनही ते संसारात अडकलेले नाहीत. पाहा पुढील अभंग :

*संसार पसर करिसी तळमळ । कां रे घननीळ नाठ विसी । पुत्रदाराधन कवण हे कवणाचे । आहे तोवरी माझे माझे म्हणती ॥ लटिका प्रपंच सर्व नाशिवंत । एक हे शाश्वत हरिनाम । म्हणे जनार्दन एकनाथा घेई । प्रेमसुख पाहे पावशील ॥*

संसारात इतके बारकाईने लक्ष असूनही संसाराच्या असारतेचे त्यांना चांगलेच ज्ञान होते.

आता आपण वर्गीकरण केल्याप्रमाणे त्यांच्या ज्ञान, भक्ती व कर्म मार्गांवर लिहिलेल्या अभंगांकडे वळू. प्रथम भक्तीमार्गावरील लिहिलेले त्यांचे अभंग पाहू.

**भक्तीमार्ग :** नाथांच्या बहुसंख्य अभंगांचा भक्तीमार्ग हाच मुख्य विषय आहे. ह्याचे तीन भाग पाडता येतील. ते असे १) नाम महिमा, २) देवदेवतांची चरित्रे, ३) संत व भक्तांची चरित्रे.

**१) नाम महिमा :** मुला-बाळांच्या संसारात राहून नित्य कर्मे करीत असता साधारण संसारी माणसाचे चित्त पुष्कळशा गोष्टीत आसक्त असल्यामुळे मनुष्य बहुधा चिंताग्रस्त असतो. असुरक्षिततेची भावना पण असते. अशा समयी नामजप हीच एक अशी नौका आहे, जी मनुष्यास संसारसागर पार करण्यास साहाय्यक होते. नामाशिवाय जीवन जगणाऱ्या माणसावर कठोर टीका करताना नाथ म्हणतात,

*"नामावीण मुख सर्पाचे ते बीळ । जिव्हा नव्हे काळसर्प आहे । वाचा नव्हे लाव । जळो त्याचे जीणे । यातना भोगणे यमपूरी । हरीवीण कोणी नाही सोडवीता । पुत्र बंधू कान्ता संपत्तीचे । अंतकाळी कोणी नाही बा सांगाती । साधूचे संगती हरी जोडे । कोटीकुळे तारी हरि अक्षरे दोनीं । एका जनार्दनी पाठ केली ॥"*

ह्याप्रमाणे नाम जपत राहणे म्हणजेच संसाराच्या असारतेचे आकलन करणे होय. ह्यामागे आत्मज्ञानाची बैठक आहे. पाहा :

*"पूजा करू तरी पूजे नाही ठाव । भाव धरू तरी देवचि देव । करू तरीपूजा कवणाची सांगा । देवावीण जागा रिती कोण । एका जनार्दनी पूजेसी नाहीं ठाव । अवघा व्यापला देवाधिदेव ॥"*

मला वाटते वरील दोन्ही अभंग म्हणजे मराठी साहित्याचा एक उत्कृष्ट नमुना पण आहे.

**२) देव-देवतांची चरित्रे :** श्रीकृष्ण चरित्रावर नाथांनी सर्वांत जास्त अभंग रचलेले आहेत. त्यात कृष्णलीला, गोपींचे खेळ, गौळणी ह्यावर जास्त भर दिसतो पाहा :

*मेळवोनि मेळा गोपाळांचा हरि । निघे करावयाचोरी गोरसाची । धाकुले सवंगडे घेऊनि आपण । चालती रामकृष्ण चोरावया । ठेवियेले लोणी काढिती बाहेरी । खाती निरंतरी सवंगडी । एका जनार्दनी तयाचे कौतुक । न पडे ठाऊके ब्रह्मादिका ॥*

लहानग्या कृष्णावर लिहिताना नाथांचे स्वतःच्या मुलावरील प्रेम उमडून आलेले दिसते. श्रीकृष्णाव्यतिरिक्त नाथांचे श्रीरामचरित्र हनुमान, श्रीदत्तात्रय जन्म ह्यावरही अनेक अभंग आहेत.

**३) भक्तांची चरित्रे :** ह्यात ध्रुव, प्रल्हाद, उपमन्यु, सुदामा आदी भक्तांचा समावेश आहे. संतांची चरित्रे : ज्या नाथांनी संत ज्ञानेश्वरांना प्रथम प्रकाशात आणून महाराष्ट्रावर अनंत उपकार करून ठेवले आहेत त्या ज्ञानेश्वरावर त्यांचे अभंग असणे अगदी स्वाभाविक आहे. त्याशिवाय ज्ञानदेवांचे बंधू निवृत्तीनाथ, सोपानदेव व बहिण मुक्ताबाई ह्या त्यांच्या बहिण-भावंडांवर पण त्यांनी अभंग रचलेले आहेत. ज्ञानदेवांवर लिहिताना त्यांना मातृप्रेमाचा पूर आलेला दिसतो. पाहा :

*कृपाळू उदार माझा ज्ञानेश्वर । तया नमस्कार वारंवार । न पाहे याति कुळाचा विचार । भक्त करुणाकर ज्ञानाबाई । भलतिया भावे शरण जाता भेटी । पडितसे तुटी जन्म व्याधी । ज्ञानाबाई माझी अनाथाची माय । एका जनार्दनी पाय वंदीतसे ॥*

ह्याशिवाय नाथांनी त्यावेळचे महाराष्ट्रातील संत नामदेव, गोराकुंभार, सावतामाळी, चोखामेळा ह्यांच्या चरित्रावरही अभंग रचलेले आहेत.

मुसलमानांच्या आक्रमणापासून वाचविण्याकरता विजयनगरचे धर्मनिष्ठ राजे कृष्णराज ह्यांनी पंढरपूरहून विठ्ठलाची मूर्ती आपल्या राज्यात विजयनगरला आणून ठेवली होती. ह्या आक्रमणाचे संकट टळल्यावर नाथांचे पणजे भक्त भानूदास ह्यांनी ती मूर्ती विजयनगरहून चालत-चालत स्वहस्ते परत पंढरपूरला आणून तिथे तिला स्थानापन्न केले. श्री विठ्ठलाच्या पंढरपूरचे माहात्म्य महाराष्ट्रीयास सांगण्याची आवश्यकताच नाही. ह्या पंढरीची आठवण झाल्याबरोबर नाथास भडभडून येणे स्वाभाविक आहे. पंढरीवरील प्रेमाचा पूर त्यांच्या पुढील अभंगात कसा वाहतो आहे पाहा :

*माझे माहेर पंढरी । आहे भीवरेच्या तिरी । बाप आणि आई । माझी विठ्ठल रखुमाई । पुंडलिक बन्धू आहे । त्याची ख्याती सांगू काय । माझी बहिण चंद्रभागा । करितसे पापभंगा । एका जनार्दनी शरण । करी माहेरची आठवण ॥*

पंढरपूरची आठवण झाल्याबरोबर, माहेरच्या आप्तेष्टांच्या स्मृती उजळून सुनेचे हृदय गहिवरून येते, पंढरपूरीवरील प्रेमाने नाथांची तीच स्थिती झाली. एका अभंगात ते म्हणतात,

*अवघे आनंदाचे क्षेत्र । क्षेत्र विठ्ठल देवाचे । अवघे हे पावन । तीर्थ चंद्रभागा स्नान । अवघे संतजन । पुंडलिकासी वंदन । अवघा विठ्ठल देव । एका जनार्दनी भाव ॥*

श्री विठ्ठलाचे वर्णन करताना नाथांचे भानच हरपते ।

*डोळ्यांची भूक हारपली पाहता माऊली श्री विठ्ठल माऊली । पुंडलिके बरचे केले । परब्रह्म उभे ठेले । अठ्ठावीस युगे झाली । अद्याप नबसे खाली ॥*

**कर्मयोग :** एकनाथ महाराज अशा मुक्तावस्थेत असत की त्यांच्या ह्या जीवनात त्यांना प्रपंच व परमार्थ ह्यात भेदच दिसत नव्हता. दोहीमधील अंतर्पाट फाटून गेला होता. अध्यात्मिक मार्गावर चालत असता त्यांचे दैनंदिन कर्म सुटले नव्हते. लळा लावणारी मुले, मुली, जावई, त्यांच्या आजूबाजूस असत. असल्या जीवनाचे वर्णन करताना नाथमहाराज म्हणतात :

*जगाचिए नेत्री दिसे तो संसारी । परी तो अंतरी स्फटिक शुद्ध । वायाचि हाव न धरी काही पोटी । वाऊगी ती गोष्टी न करी जगा ॥ स्त्रीपुत्रधन नाही तेथे मन । इष्टमित्र कारण नाही ज्याचे । एका जनार्दनी प्रपंच परमार्थ । सारिखाची होत तयालागी ॥*

आणिक पाहा :

*उत्तम पुरुषांचे उत्तम लक्षण । जेथे भेद-शून्य मावळला । भेद शून्य झाला बोध स्थिरावला । विवेक प्रगटला ज्ञानोदय । जिकडे पाहे तिकडे उत्तम दर्शन । दया शांती पूर्ण क्षमा अंगी । एका जनार्दनी उत्तम हे प्राप्ती । जेथे मावळली द्वैताद्वैत ॥*

परंतु स्वार्थासाठी केल्या जात असलेल्या पूजेवर व उपासनेवर नाथांनी प्रहार केले आहेत :

*प्रतिमेचा देव केला । काय जाणे ती अबला । नवस करिती देवासी । म्हणती पुत्र देई वो मजसी । देव खोटा नवस खोटा । एका जनार्दनी रडती पोटा ॥*

निव्वळ देवाची पूजा व तीर्थयात्रा यावरही त्यांनी टीकास्त्र उचललेले आहे :

*प्रतिमेची देवो ऐसा ज्याचा भावो । तो न करी निर्वाहो आम्हा लागी ॥ असता सर्वत्र बाहेरी भीतरी । संपुष्टा माझारी म्हणे देवो ॥*

*आतां तीर्थयात्रेबद्दल -*

*केले तू काय वुवा जाऊनिया तीर्था । सर्वदा विषयार्था भुललासी ॥ मनाची ती पापे नाही धोवियेली । वृत्ती हे लावली संसारीच ॥*

परमार्थ करताना संसार सोडावा लागत नाही ह्याउलट संसार अगदी सहज-सुलभ साध्य होतो. दोन्हीमधील असलेला कृत्रिम पडदा फाटून जातो. पाहा :

*प्रपंच परमार्थ एकरूप होत । आहे ज्याचा हेत रामनामी । परमार्थे साधे सहज संसार । येथे येरझारा नाहीं जना । सहज संसारे घडे परमार्थ । लौकिक विपरीत अपवाद । एका जनार्दनी नाहीं तया भीड । लौकिकाची चाड कोण पुसे ॥*

संसार करता-करता देह हा नाशिवंत आहे, 'ब्रह्म सत्यं जगन् मिथ्या' हे तथ्य शरीराच्या रोमरोमात भरल्या कारणाने नाथांनी आपला देह पवित्र गोदावरी नदीत अर्पण केला.

*नाशिवन्त देह जाणार जाणार । होतो निराधार स्वप्नवत ॥*
*अभ्रींची छाया क्षणिक साचार । तैसा हा प्रकार नाशिवन्त ॥*
*मृगजळाचे जीवन क्षणिक निर्धार । तैसा हा विचार व्यर्थ सर्व ।*
*एका जनार्दनी नाशिवंतासाठी । केवढी आटाआटी प्राणी करती ॥*

**ज्ञानयोग** : नाथांच्या घरी प्रत्यक्ष विठोबा, श्रीखंड्या नावाच्या नोकराचे रूप घेऊन कावडीने नदीचे पाणी भरीत असे, ही दंतकथा आहे. त्याचा अर्थ एवढाच घ्यावयाचा की त्यांना त्यांच्या श्रीखंड्या ह्या नोकरातही प्रत्यक्ष परमेश्वर दिसत असे. त्यांच्या दृष्टीने जनीजनार्दन हा प्रत्यक्षात उतरला होता. पाहा :

*देव जन देव विजन । देवी जडले तन मन ॥ देव घरी देव दारी । देव दिसे व्यवहारी ॥ आणखी*

*अष्ट हि दशा पूर्ण भरला देव । आ पूर्व-पश्चिम भाव तेथे कैंचा ॥ पाहे तिकडे देव व्यापुनि भरला । रिता ठाव उरला कोठे नाही । समाधी समाधान मनाचे उन्मन । मा देवा भिन्नपण नाही नाही । एका जनार्दनी एकपणासाठी । देवपाठीपोटी भक्तामागे ॥*

आता यापुढे काय शिल्लक उरले आहे?

श्री. माधव देव
यशोधन, आपटे रोड, पुणे ४११ ००४.











# विजयी श्री विठ्ठल

**श्री. यशवंतराव मंत्री**

विश्वस्त - श्रीगुरु शिवशंकरानंद आश्रम, श्रीसद्गुरु स्वामी नारायणानंतीर्थ सेवा ट्रस्ट औदुंबर, सदस्य : वै. सोनोपंत दांडेकर अध्यासन स. प. विद्यालय, पुणे. अपंगमित्र, अपंग आधार मित्रमंडळ महाराष्ट्र राज्य पुणे.

संत श्रीएकनाथमहाराज यांचे उपास्य दैवत श्रीदत्तात्रय होय. परंतु एकनाथ महाराजांनी जनार्दन स्वामींचे शिष्यत्व पत्करल्यानंतर स्वामींनी पैठणास जाऊन एकनाथ महाराजांना भागवत धर्माचा प्रसार करण्याची आज्ञा केली. खरे पाहता जनार्दन स्वामींना औदुंबर येथे सद्गुरुंचा अनुग्रह झाला व त्यांनी असा अभंग रचला.

*धन्य कृष्णातीर धन्य औदुंबर । जेथे गुरुवर वसतसे ।*
*जनार्दन म्हणे तीर्थे त्याचे पाशी । चारी मुक्ती दासी होती त्याच्या ।*

एकनाथ महाराजांच्या घराण्यात पांडुरंगाची उपासना होती. कारण त्यांचे पणजोबा भानुदास महाराज यांनी हंपीहून श्रीविठ्ठलाची मूर्ती आणून ती श्रीक्षेत्र पंढरपूर येथे पुन्हा स्थापित केली. अशा रीतीने दत्तोपासक एकनाथ महाराज भागवतधर्माकडे वळले. नाथांच्या देऊळवाड्यात विजयी श्रीविठ्ठलाची मूर्ति आहे. तिच्याबद्दल अशी कथा सांगितली जाते.

कर्नाटक प्रांतात शिरहट्टी नावाचे गाव आहे. तेथील श्रीमंत सावकाराने आपल्या वाड्यात एक मंदिर बांधून घेतले. पंचधातूची श्रीविठ्ठल मूर्ती स्थापन करण्याचे निश्चित झाले व त्याप्रमाणे मूर्ति तयार झाली. निरनिराळ्या गावांना मूर्ती स्थापनेची निमंत्रणे गेली. परंतु श्रीविठ्ठलांनी स्वप्नात येऊन सावकाराला सांगितले की मला एकनाथांचे घरी जावयाचे आहे. असाच दृष्टांत नाथमहाराजांना झाला. नाथांना सन्मानाने बोलावून मूर्ती देण्यात आली.

नाथांनी या मूर्तीची प्राणप्रतिष्ठा केली. या विजयी पांडुरंगाची अनेक पिढ्या उपासना चालू आहे. पैठणच्या नाथांच्या देव्हाऱ्यात ही सुंदर मूर्ती आजही विराजमान आहे. ही मूर्ती ज्या विटेवर उभी आहे त्या विटेवर पुढील अक्षरे उमटली आहेत.

'दास, जेऊ घाला, न घाला ।' याचा सूचक अर्थ असा 'मी राजाश्रय सोडून इथे आलो तो येथील सेवेत तृप्त होण्यासाठी ! पंच पक्वानाचा नैवेद्य मला इथं मिळेल या हेतूनं नाही. तो मिळो न मिळो, मी नैवेद्याचा भूकेला नसून, आपल्या भावभक्तीचा भूकेला आहे !'

या मूर्तीच्या प्राणप्रतिष्ठेच्या वेळेला अभिषेक होऊन धूपारती झाली. नैवेद्य झाला. त्या वेळी नाथांनी प्रार्थना केली.

*देवा आपल्या आवडी करूनी । तू आलासे ये स्थानीं ।*
*तरी भक्षुनिया लोणी । निजासनीं बैसावें ॥ १॥*
*ऐकोनि नाथांचे वचन । मूर्ति होवोनी हास्यवदन ।*
*बाहेर जीभ काढून । करतळ चाटून भक्षिले ॥ २ ॥*

आजही असे म्हटले आहे की मूर्तीच्या हाताला हात लावल्यास लोण्याचा ओशटपणा जाणवतो. ही मूर्ती लावण्य सुंदर व प्रसन्नवदन आहे.

श्री. यशवंतराव मंत्री
कृतार्थ सोसायटी, पुणे-सातारा रस्ता,
पुणे ४११ ०३७. फोन ४१२ ८७०.

## साक्षात्कारी संत

*अंत्यज्याच्या लेकराला घेतो कडे*
*तान्हेल्या गाढवाला काशीचे घडे*
*ज्ञानेशांना टोचणारी काढतो मुळी*
*भारुडे गवळणींची आगळी जातकुळी*
*एकनाथी भागवताची जरीबुट्टी पैठणी*
*देवमाणसाघरी देव भरी पाणी*
*साक्षात्कारी संतास शब्दफूल समर्पिते*
*समदृष्टी एकनाथा लोटांगण घालते....*

**योगिनी जोगळेकर**
१२९२, सुभाषनगर,
पुणे ४११ ००२. दूरध्वनी ४७८३८८



संत एकनाथ महाराजांचे देवघर



संत एकनाथ महाराजांच्या
घराचे प्रवेशद्वार, पैठण



रांजण



संत एकनाथ महाराजांची सहाण

# नाथांचे पैठण

**सौ. अनिता केळकर**

एम.ए. (मराठी) स्वामी सरस्वती प्रज्ञानानंद व्यक्ती आणि वाङ्मय-प्रबंध डॉ. अशोक कामत यांचे मार्गदर्शनाखाली पुणे विद्यापीठास सादर. संत नामदेव अध्यासनात २ शोध प्रबंधिका सादर.

संत साहित्याचा अभ्यास करीत असताना संतसत्पुरुष आणि त्यांचे गाव असे एक दृढ समीकरण झाल्याचे आपल्याला दिसते. हे गाव कधी त्यांची जन्मभूमी, कधी कर्मभूमी तर कधी निर्वाण भूमीही असते. ज्ञानरायांची आळंदी, चोखामेळा परिवाराचे मंगळवेढे, तुकोबारायांचे देहू एवढी उदाहरणे वानगीदाखल पुरेशी ठरावीत. या संतांच्या अभंगातून, काही वेळा अन्य रचनांतूनही या 'अद्वैता' चा पुनरुच्चार केलेला आढळतो. हीच गोष्ट 'पैठण' बाबतही आहे. जेव्हा-जेव्हा आपण 'एकनाथ' वाचतो, अभ्यासितो तेव्हा-तेव्हा आपल्यासमोर हे 'पैठण' येतेच.

महाराष्ट्रामध्ये औरंगाबाद जिल्ह्याच्या दक्षिणेस गोदावरी नदीच्या काठावर 'पैठण' गाव वसलेले आहे. या पैठण गावाची परंपरा अति प्राचीन आहे. प्राचीन कोरीव लेख, हिंदू, बौद्ध आणि जैन वाङ्मयात 'पैठण'चे उल्लेख मिळतात. अनेक परकीयांनी केलेल्या प्रवासवर्णनातही हे उल्लेख पाहावयास मिळतात. प्राचीन साहित्यात या पैठणलाच प्रतिष्ठान, पोतली, पइठ्ठान, पट्टण, पोयणपूर असे संबोधिले जात असे. येथील रहिवासी ते पेतनिक किंवा पैठाणिक.

पैठण गावाची सांस्कृतिक परंपरा मोठी आहे. इतिहासकाळापासून 'संस्कृत विद्येचे महापीठ' म्हणून ते ज्ञात आहे. येथे विद्या व कला यांना राजाश्रय मिळालेला होता. प्राकृत भाषा, व्याकरण, धर्मशास्त्र यांचे अध्ययन पैठणमध्ये होत असे. दक्षिण काशी म्हटल्या जाणाऱ्या या पैठणवर बहमनी, मोगल, निजाम, मराठे यांचे अधिपत्य होते. विद्यापीठ म्हणून कालांतराने 'पैठण'चे महत्त्व कमी झाले हे खरे आहे; परंतु इसवी सनाच्या सोळाव्या शतकात 'संत एकनाथां'च्या कार्यकर्तृत्वाने हे पैठण पुन्हा एकदा 'भक्ती'चे माहेरघर झाले. एकनाथांसारखेच अनेक शास्त्री पंडित पैठणमधीलच आहेत. निर्णयसिंधुकार कमलाकार भट्ट, सिद्धान्त कौमुदीकार भट्टोजी दीक्षित, शिवाजी महाराजांना राज्याभिषेक करणारे गागाभट्ट, हरिवरदाकार कृष्णदयार्णव, भानुदास, मुक्तेश्वर, बहेरा जातवेद, चिमणा पंडित सारे पैठणचेच. महाभुनाव संप्रदायाचे प्रवर्तक चक्रधर यांचेही वास्तव्य बराच काळ पैठणमध्येच होते. त्यांनी महानुभाव संप्रदायाचा प्रचार-प्रसार येथे राहून केला. मौलाना साहेब उर्फ मोईजुद्दीन यांनी येथे राहून इस्लाम धर्माचाही प्रसार केला.

असे असूनही सर्वसामान्य जनता, वारकरी लोक या नगरीला 'नाथांचे पैठण' म्हणूनच ओळखतात. पैठणला त्यांच्या मनीमानसी 'तीर्थक्षेत्रा'चे स्थान आहे. पैठणमधील काही महत्त्वाची ठिकाणे यांची श्रद्धास्थाने आहेत. ती अशी : **एकनाथांचे मंदिर** - एकनाथांचा राहता वाडा म्हणजेच हे मंदिर. नाथांचे देवघर तेच या मंदिराचा गाभारा. आजही येथे नाथांच्या पूजेतील बाळकृष्णाची पूजा होते. नाथांनंतर अलीकडे या मंदिराचा जीर्णोद्धार झाला असला तरीही महाद्वार, भिंती, खांब, नाथकालीनच आहेत. प्रत्यक्ष भगवान श्रीकृष्ण नाथांच्या घरी कावडीने पाणी भरत, अशी एक आख्यायिका नाथचरित्रात वाचावयास मिळते. श्रीखंड्याच्या रूपात श्रीकृष्ण पाणी भरीत तो रांजण आजही पाहावयास मिळतो. शहराच्या उत्तरेस गोदावरीच्या जलामध्ये नाथांनी आपला देह विसर्जन केला. त्या ठिकाणी वाळवंटाला लागून आणखी एक मंदिर असून हे नाथांचे समाधीस्थान म्हणून सर्वश्रुत आहे. या समाधीच्या दोन्ही बाजूस हरिपंडित व चक्रपाणी यांचीही समाधीस्थाने आहेत. येथे फाल्गुन वद्य षष्ठीला 'नाथ पुण्यतिथी'चा उत्सव मोठ्या प्रमाणावर सहा दिवस साजरा होतो. एकनाथांचे गुरू जनार्दन स्वामी यांचा जन्मदिवस, निर्वाण दिवस, नाथांना झालेला त्यांचा अनुग्रह, मलंग वेषातील दत्तात्रेय दर्शन, नाथांचे स्वतःचे महानिर्याण या साऱ्या गोष्टी याच फाल्गुन वद्य षष्ठीला घडल्याने या 'नाथषष्ठी'चे महत्त्व भाविकांना अनन्यसाधारण वाटते. या दिवशी लाखो नाथभक्त 'पैठण'ला येतात. शेवटच्या (अष्टमीच्या) दिवशी 'गोपाल काल्या'चा सोहळा असतो.

**नागघाट :** निवृत्ती ज्ञानदेवादी भावंडांनी आपल्याला उपनयनाचा अधिकार प्राप्त व्हावा म्हणून 'पैठण'मधील शास्त्रीपंडितांकडे प्रार्थना केली होती. गोदावरी नदीच्या काठावरील नागतीर्थावर ज्ञानेश्वरांनी रेड्यामुखी वेद वदविला असे सांगितले जाते. या घाटाशेजारी सिद्धेश्वराचे एक मंदिर आहे. याच्या जवळील रुक्ष व खडकाळ भागाला 'मुंगी पैठण' म्हणतात.

याखेरीज महानुभाव पंथाच्या प्रवर्तक चक्रधरांनी वास्तव्य केलेले मंदिर 'भोगनारायण मंदिर' किंवा महानुभावांचा मठ म्हणून ओळखले जाते. महानुभाव पंथाचे ते आद्यपीठ आहे असे मानतात. पैठण परिसरात त्या काळी असणाऱ्या विविध स्थानांची माहिती 'स्थानपोथी' या महानुभाव संग्रहात पाहावयास मिळते. पैठणमध्ये 'कृष्ण दयार्णवांचा मठ' म्हणूनही एक स्थळ पाहण्याजोगे आहे. श्रीमद् भागवताच्या दशमस्कंधावरील भाष्य असलेला त्यांचा 'हरिवरदा' हा ग्रंथ येथेच रचला. या ग्रंथाची हस्तलिखित प्रत येथे पाहावयास मिळते. यामुळे अभ्यासकांच्या दृष्टीनेही या पैठणाचे मोल दुणावते. याखेरीज शिवदिन केसरी मठ, शिल्पसौंदर्याने नटलेले परंतु भग्नावस्थेत असलेले सातवाहनकालीन खांब येथे पाहावयास मिळतात. येथे आढळणाऱ्या अनेक मशिदी मात्र पूर्वीची कालिका, चक्रपाणी, महालक्ष्मी, यांची देवळेच असल्याचे निश्चितपणे सांगितले

जाते.

अलीकडच्या काळात मात्र या 'नाथांच्या पैठणा'मध्ये बऱ्याच शैक्षणिक, उद्योगधंद्यांच्या व आरोग्याच्या दृष्टीने सुधारणा झाल्या आहेत. नागरी रुग्णालय, महाविद्यालये, माध्यमिक शाळा, पेपर मिल, साखरकारखाना या दृष्टीने महत्त्वपूर्ण ठरतात. ऐतिहासिक वस्तुसंग्रहालय, जायकवाडी प्रकल्प, ज्ञानेश्वर उद्यान, इ. गोष्टींनी या पैठणचे महत्त्व अधिकच वाढले आहे. महाराष्ट्रातील भरजरी वस्त्रकलेचा एक पारंपारिक प्रकार म्हणून सर्वश्रुत असलेल्या 'पैठणी' या वस्त्राचे उत्पादन केंद्रही पैठण येथेच आहे.

आधुनिक काळातील या गोष्टी वगळता मूळ नाथांच्या समाधी मंदिराची स्थिती मात्र निराशाजनक वाटते. नाथांचे जन्मस्थान, वास्तव्य असलेले हे मंदिर श्रद्धास्थान म्हणून तर जपायलाच हवे. त्याचबरोबर नाथ भागवत, चतुश्लोकी भागवत, भावार्थरामायण, अनेक अभंग, भारुडे, स्फुटकाव्य यांच्या रचनाकाराचे ते स्थान आहे, हे विसरून चालणार नाही. एक संतसत्पुरुष म्हणून त्यांचे स्थान ध्यानात घेताना त्यांनी मराठी भाषेला दिलेले 'सनाथ' योगदानही ध्यानात घ्यावयास हवे. सश्रद्ध आणि डोळस व्यक्ती शक्तींनी पुढे येऊन अशा स्थानांना अधिक सुरक्षित करणे गरजेचे आहे असे म्हटल्यास औद्धात्याचे ठरू नये.

पैठण येथे संतपीठ निर्माण करण्याची एक घोषणा बरीच वर्षे महाराष्ट्र शासन करीत राहिले. प्रत्यक्षात ते अजून तरी काही साकार झालेले नाही.

सौ. अनिता केळकर
२/१ सकाळनगर, बाणेररस्ता पुणे ४११ ००७.

## नाते

कधी वाटते जनाबाईचे जाते मी व्हावे
भक्तासंगे भगवंताचे नाते जोडावे
कधी वाटते कबिराघरचे माग मी बनावे
भावापायी देवाहाती वस्त्र विणित जावे
शबरीचे त्या आंबटउष्टे बोर कधी व्हावे
पोराहुनिहि पोर जाहल्या प्रभूस हेरवावे
कधी वाटते नाथांघरचे रांजण मी व्हावे
पाणी भरल्या चक्रपाणीला हळूच बिंबावे
कधी वाटते पार्थरथावर ध्वजारूप घ्यावे
द्वैतासंगे अद्वैताचे गुंजन ऐकावे !

योगिनी जोगळेकर

# ॥ संत एकनाथविषयक कादंबऱ्या ॥

- डॉ. श्यामा घोणसे

M.A.P.hd. – मराठी हिंदी वाङ्मय. गरवारे विद्यालयात मराठी प्राध्यापिका. विरशैव समाजातील उच्चपदवी मिळविणाऱ्या एक महत्त्वाच्या अभ्यासक. शडुश्थळी या आद्य वीरशैव ग्रंथाचे संपादन मराठीतील संतविषयक कादंबऱ्यांचा अभ्यास. भावंडीबाईची जुनी कविता उजेडात आणली. वक्तृत्व, लेखन, संशोधन व अध्ययन यामुळे विशेष प्रसिद्ध.

'कादंबरी' हा लोकप्रिय वाङ्मयप्रकार. मानवी भावभावनांचे तरल क्षण पकडण्यापासून ते विराट समाजजीवनाचे दीर्घकालीन चित्रण करण्याचे सामर्थ्य या वाङ्मयप्रकारात आहे. साहजिकच कादंबरीचे आवाहनही व्यापक व खोलवर बनते. या वाङ्मय प्रकाराची सर्वाधिक चर्चा झाली. परंतु कादंबरीची सर्वसमावेशकता आणि तिचे वैविध्यपूर्ण स्वरूप ध्यानी घेता तिला व्याख्येच्या चौकटीत पकडणे किंवा तिचे व्यवच्छेदक लक्षण स्पष्ट करणे आजही कठीण आहे. या वाङ्मय प्रकारासाठी विविध भाषेत अर्थपूर्ण नावे रूढ असली तरी मराठीत त्यास मिळालेले 'कादंबरी' हे नाव फारसे औचित्यपूर्ण वाटत नाही. किंबहुना या नावावरून तिच्या स्वरूपाचा निश्चित बोध होत नाही.

कादंबरी वाङ्मयात लागणारी जीवनविषयक निरीक्षणाची सामग्री, एक विशिष्ट वृत्ती व दृष्टिकोन इंग्रजी आक्रमण आगमनापूर्वीच मराठी वाङ्मयामध्ये अनेक शतकांपासून तयार होता हे पारंपरिक लोककथा, दृष्टांतकथा, वीरसदर्शक आख्यानकथा इत्यादींच्या आधारे म्हणता येईल. अर्थात् पाश्चात्य वाङ्मयाच्या संपर्कामुळेच हा वाङ्मयप्रकार आपल्याकडे आला आणि वाढीस लागला ही गोष्ट नाकारता येणार नाही. 'यमुनापर्यटन' ते 'ताम्रपट' किंवा 'पाच प्रकरणांची कहाणी' (१८५७-१९९६) पर्यंतचा मराठी कादंबरीचा प्रवास संख्यात्मक, स्वरूपदृष्ट्या (विविध शाखोपशाखांच्या दृष्टीने) अखंड-विशाल आणि वर-वर पाहता गुणात्मकही वाटणारा. अनेक वाटा-वळणांनी मार्गक्रमण करणाऱ्या मराठी कादंबरीची एक प्रमुख शाखा म्हणजे १९७० च्या आसपास निर्माण झालेली 'चरित्रात्मक कादंबरी' होय. या आधुनिक वाङ्मयप्रकाराला, प्राचीन, ऐतिहासिक परंपरा असल्याचे संत चरित्र वाङ्मयाधारे मानता येते. भूतकाळातून प्रेरणा घेणाऱ्या लेखकांनी पुराणे, इतिहास यासून काही कथा किंवा व्यक्ती निवडून 'आपल्या नजरेने, आपल्या हेतुंप्रमाणे, त्यांची रूपचित्रे रेखाटली आणि त्यातूनच या कादंबरीच्या ऐतिहासिक, पौराणिक अशा शाखा निर्माण झाल्या. स्वधर्म, संस्कृती यांचा अभिमान जागृत होण्याचा किंबहुना हा अभिमान आहे, हे दाखविण्याचा काळ आल्याने ऐतिहासिक, पौराणिक कादंबऱ्यांची समीक्षकांकडून काही प्रमाणात तरी दखल घेतली. तुलनेने ज्यांनी प्रतिकूलता पचवून प्रसंगी त्यासाठी किंमत मोजून जनजागृती करण्याचा प्रयत्न केला त्या संतांच्या जीवनावरील कादंबऱ्या मात्र उपेक्षित राहिल्या. संस्कृती-संचिताचे चालते-बोलते प्रतीक असणाऱ्या संतांच्या कार्यकर्तृत्वाचे गुणगान करणाऱ्या संतचरित्रात्मक कादंबऱ्या मात्र प्रतिगामी विषय म्हणून समीक्षकांनी रद्दबादल ठरविल्या. श्री. गो. नी. दांडेकर यांच्या 'मोगरा फुलला' या कादंबरीची डॉ. चंद्रकांत बांदिवडेकर यांनी 'कादंबरीकार गो. नी. दांडेकर' या समीक्षा ग्रंथातील एका लेखात घेतलेली दखल वगळता या विषयावर अन्य जाणकारांनी फारसे लिहिलेले दिसत नाही. अर्थात् समीक्षाप्रिय होऊ न शकलेल्या संतविषयक कादंबऱ्या लोकप्रिय मात्र झाल्या.

काव्य आणि कृतीत एकवाक्यता असणाऱ्या संतांची चरित्रे एकाच वेळी समसामायिक आणि प्रासंगिकतेने परिपूर्ण असल्याने त्यांनी आधुनिक कादंबरीकारांना मोहीत केले असावे. मराठीत सुमारे चाळीस-एकेचाळीस संतचरित्रात्मक कादंबऱ्या आहेत. लेखक आहेत चौदा. त्यामध्ये अनुक्रमे ज्ञानदेव, नामदेव, रामदास, चोखोबा, तुकाराम आणि एकनाथ हे संत आवडते चरित्रनायक बनले आहेत. वेणाबाई, तुकारामशिष्या बहिणाबाई, जनाई, मुक्ताई, कान्होपात्रा, मीराबाई, यांच्याप्रमाणे कुब्जाही चरित्रनायिका आहे. पुंडलिक, पेंधा, सुदामा, परशुराम या पुराणकालीन भक्तांप्रमाणेच आद्य शंकराचार्य, चक्रधर, चैतन्यप्रभु हे पंथप्रवर्तक वा धर्मसंघटकही कादंबरीविषय ठरले आहेत. आधुनिक संतसत्पुरुष गुलाब महाराज, अक्कलकोटचे स्वामीसमर्थ, पंतमहाराज बाळेकुंद्री यांच्याप्रमाणेच तुलसीदास, सूरदास यांचाही चरित्रनायक म्हणून विचार झाला आहे. या साऱ्याच नायकांच्या चरित्रात्मक कादंबऱ्यांचा प्रस्तुत लेखात परामर्श घेणे अशक्य व अनुचितही असल्याने संत एकनाथ यांच्या जीवनचरित्राचा वेध घेणाऱ्या मराठीतील दोन कादंबऱ्यांचा - 'शांतिब्रह्म' अणि 'महाभागवत' यांचा परिचय घेऊया.

निष्कलंक चारित्र्य, मानवता धर्माचा निरंतर उद्‌घोष करणारी साक्षेपी, विवेकी वृत्ती, भूतमात्रांबद्दलचा अपूर्व कळवळा आणि प्रपंच-परमार्थाचा सुवर्णमध्य साधणारी भक्तिसाधना यामुळे महाराष्ट्राच्या सांस्कृतिक, वाङ्मयीन, धार्मिक इतिहासात संत एकनाथांचे स्थान अनन्यसाधारण ठरले आहे. त्यांच्याबद्दल मिळणारी चरित्रगाथा साररूपाने अशी मांडता येते : संत एकनाथ हे संत भानुदासांचे पणतू. भानुदासांनी आपल्या भक्तिसामर्थ्याने श्रीविठ्ठलाला विजयनगराहून परत पंढरीस आणल्याची कथा सर्वश्रुत आहे. या आध्यात्मिक संपन्नतेबरोबरच आर्थिक संपन्नताही लाभलेले एकनाथ बालवयातच पोरके झालेले. या प्रज्ञासंपन्न मुलाचा त्याचा आजी-आजोबांनी सांभाळ केला. वयाच्या बाराव्या वर्षी सद्‌गुरुभेटीसाठी गृहत्याग केलेल्या एकनाथांचे दीक्षागुरू म्हणजे देवगिरीचे किल्लेदार, प्रसिद्ध दत्तसंप्रदायीयोगी 'जनार्दन स्वामी' जवळ-जवळ एक

तप भारतभ्रमण करणाऱ्या नाथांनी गुर्वाज्ञेनुसार गृहस्थाश्रमाचा स्वीकार करून प्रपंचाला परमार्थाचे अधिष्ठान प्राप्त करून दिले. 'एकनाथीभागवत', 'भावार्थ रामायण', 'रुक्मिणी-स्वयंवर', 'चतुःश्लोकी भागवत' आदी ग्रंथरचना त्यांनी केली असली तरी त्यांच्या भारुडांनी आणि ज्ञानदेवीच्या संशोधित शुद्ध प्रतीमुळे ते मराठी संतपरंपरेत व लोकमानसात अजरामर ठरले. यावनी सत्तेच्या ऐन भरभराटीच्या काळात स्वधर्म, स्वभाषा यांचा जाणिवपूर्वक पुरस्कार करणाऱ्या एकनाथांनी लोकसंग्रहाची गरज ओळखून संत ज्ञानदेव, संत नामदेवाच्या महानिर्वाणानंतर हतप्रभ झालेल्या वारकरी संप्रदायाला पुन्हा एकदा चैतन्यसंपन्न, सुसंघटित केले.

एकनाथांच्या चरित्रात काही अलौकिक चमत्कार कथाही सांगितल्या जातात. उदा. नाथांच्या देवडीवर श्रीदत्त स्वतः चोपदार होऊन पहारा करीत किंवा श्रीखंड्या रूपाने श्रीकृष्णाने नाथांच्या घरी जवळ-जवळ बारा वर्षे पाणी भरले इत्यादी. नाथांच्या विद्वत्तेला, भक्तिभावाला शांतीचे कोंदण लाभले होते, हे सांगणाऱ्या अनेक कथाही जनमानसात रूढ आहे. या चमत्कार कथांप्रमाणेच ज्ञानेश्वरांच्या गळ्याला लागलेली अजानवृक्षाची मुळी नाथांनी दूर केली. या आख्यानकथेमुळे त्यांना ज्ञानदेवांच्या निकट साहचर्याचे वलय लाभले आणि 'ज्ञानाचा एका' या लोकउपाधीने त्यावर शिक्कामोर्तबही केले. हे सारे चरित्र ध्यानात घेता एकनाथांचे हे बहुआयामी व्यक्तिमत्त्व ललित रूपाने साकार करणे महत्त्वाचे आणि आव्हानपूर्वकही ठरते.

''प्रपंच आणि परमार्थ' ह्या दोन्ही क्षेत्रात अत्युच्च पातळी गाठलेल्या या महापुरुषाच्या जीवनदर्शनाचे आलोकन आपल्या लेखणीस पेलवेल का?'' १) अशी शंका व्यक्त करीतच श्री. लीला गोळे यांनी 'शांतिब्रह्म' ही कादंबरी ६ मार्च १९८३ ला लिहिली आणि या कादंबरीचे पुनर्मुद्रण १९८९ ला होऊन ती लोकप्रियही ठरली. लीलाताईसारख्या कुटुंबवत्सल गृहिणीप्रमाणेच संत एकनाथांच्या चरित्राचा मोह मराठीतील मान्यवर समीक्षक डॉ. म. वि. गोखले यांना पडला आणि 'श्रीहरिरूप झालेल्या नाथांच्या चरित्राचं कीर्तन, त्यांनीच सांगितलेली कीर्तन मर्यादा लक्षात घेऊन' २) त्यांनी 'महाभागवत' या कादंबरीरूपाने केले. योगायोग म्हणजे ही कादंबरीदेखील १९८३ (३१ ऑगस्ट) मधीलच आहे.

क्रमशः या कादंबऱ्यांची स्थूलमानाने ओळख करून घेऊया.

निसर्गाची गहरी हिरवी माया दर्शविणाऱ्या पार्श्वभूमीला व्यापणाऱ्या ज्ञानदेवांच्या छायेत विसावलेले, नागराजाने मस्तकावर फणा धरलेले शांत-तृप्त एकनाथ कादंबरीच्या मुखपृष्ठापासूनच वाचकांच्या मनात वेध घेतात. संपूर्ण कादंबरीत नाथांच्या शांत स्वभावाचे घडणारे दर्शन किंवा 'कधीही न रागावणाऱ्या, तक्रार करणाऱ्या लहानग्या एकाला त्याचे आजी-आजोबा 'शांतिब्रह्म'च म्हणत' (पृ. १२) हे वाचता प्रस्तुत कादंबरीस दिलेले शीर्षक उचित वाटते.

भारतीय संस्कृती कोश, पांगारकर लिखित एकनाथ चरित्र, सार्थ एकनाथी भागवतादी संदर्भसाधने किंवा अधिकारी व्यक्तींशी केलेली चर्चा या कादंबरीलेखनास उपयुक्त ठरली असली तरी त्यामागे असणारे साक्षेपी परंतु संवेदनाक्षम स्त्रीमन अधिक प्रभावी ठरले असल्याचे 'कादंबरीची कथा' (प्रस्तावना पृ. ७) मधून जाणवते. संत एकनाथांची ज्येष्ठ कन्या गोदावरी. नाथ तिला आवडीने 'लीला' म्हणायचे किंवा नाथपत्नी गिरीजाबाई आणि लेखिकेच्या आईचे नावही गिरिजा. या योगायोगांनी लीलाताईंच्या अभ्याससाधनांना मानणाऱ्या लेखणीला उत्कटतेचाही स्पर्श दिला आहे. म्हणूनच नाथचरित्रातील ज्ञात घटनांप्रमाणेच स्वतंत्र प्रसंगही या कथानकात आढळतात.

नाथांचे तत्त्वज्ञान, तत्कालीन समाजस्थितीचे दर्शन घडविणारी वातावरणनिर्मिती, ठसठशीत व्यक्तिचित्रणे, इतरांना समजावून घेणारी स्त्रीसुलभ वृत्ती आणि कथानकाला असणारा अंगभूत वेग यामुळे प्रस्तुत कादंबरीचे चाकोरीबद्ध समीक्षेच्या आधारे रसग्रहण करणे अवघड आहे. संतचरित्रात्मक कादंबरीलेखनात अभ्याससाधनांच्या जोडीलाच मनाची संवेदनाक्षमता आणि संस्कारसंपन्न व्यक्तिमत्त्व महत्त्वाचे ठरते. किंबहुना अशा तऱ्हेचे लेखन करणाऱ्याने 'संत'च असावे अशी अपेक्षा सद्यस्थितीत करणे चुकीचे ठरेलही कदाचित. परंतु अशा लेखकांनी किमान शुचिर्भूतता बाळगणे अपेक्षित धरणे मात्र चुकीचे ठरू नये. लीलाताईंच्या कादंबरीद्वारे संतचरित्र कादंबरीलेखनाचा हा निकष सर्वार्थाने पूर्ण झाला आहे, असे म्हणणे अतिशयोक्तीपूर्ण वाटू नये. या संपूर्ण कादंबऱ्यांचा साधा आढावाही घेणे या ठिकाणी अवघड असल्यामुळे काही मोजकी स्थळे नोंदविणे उचित ठरेल.

अंगभूत वेग असणारी ही कादंबरी पोरक्या एकनाथांपासून एक संत म्हणून होणारा त्यांचा विकास, त्यातील विविध टप्प्यांसह वेधक पद्धतीने अवघ्या पन्नास पृष्ठांत रेखाटले. सद्गुरुकृपेने नाथांच्या अध्यात्म जीवनात संघर्षाचे प्रसंग फारसे आले नसावेत असे 'शांतिब्रह्म' किंवा 'महाभागवत' च्या आधारे मानता येते. एक कुटुंबवत्सल गृहस्थ, मायाळू परंतु आपल्या तत्त्वज्ञानाशी, जीवनसंचिताशी ठाम असणारा पिता म्हणून मात्र नाथांना लौकिक संघर्षाला सामोरे जावे लागले. प्रपंच-परमार्थाचा समतोल राखताना नाथांमधील लौकिक पुरुषाला काही किंमत नक्कीच मोजावी लागली असणार. हा संघर्ष उत्कटतेने परंतु अतिरंजित होऊ न देता किंवा लौकिकाच्या हव्यासापायी मूळ नायकाला सामान्य पातळीवर न आणता रंगविणे किती अवघड? पिता व सासरा या दोन महत्त्वाच्या भूमिका नाथांच्या आयुष्यात आहेत. ज्ञानोपासक परंतु कर्मठ अशा हरिपंडिताबाबत (मुलगा) किंवा प्रथम व्यसन, बाहेरख्याली असणाऱ्या आणि नंतर संन्यासाश्रम स्वीकारणाऱ्या जावयाबाबत (गोदावरीचा पती) नाथांना अवघड आणि नाजुकही निर्णय घ्यावे लागले. त्या वेळी साधकापेक्षा व्याकुळ पिता म्हणून नाथ स्मरणात राहावेत. नाथांची ही व्याकुळता लीलाताई संयमाने व्यक्त करतात. परंतु मुळात 'सुख-दुःखे समाकृत्वे'चे तत्त्वज्ञान नाथांच्या हाडीमासी रुजलेले आहे हे वाचक विसरू शकत नाही. लेखिकाही हा विसर पडू देत नाही. तर डॉ. म. वि. गोखले अशा संघर्षाला फारसा स्पर्शच करत नाहीत.

डॉ. म. वि. गोखले यांच्या 'महाभागवत' कादंबरीत नाथांच्या

जीवनातील रूढ, परंपरामान्य घटना येत असल्या तरी त्यासाठी वापरलेल्या संदर्भ - साधनांचा उल्लेख मात्र कोठेही येत नाही. नाथांचा 'महाभागवत' पदाकडे होणारा प्रवास लेखकाला महत्त्वाचा वाटत असल्यामुळे या कादंबरीला प्रारंभ होतो तोच मुळी नातवाच्या (एकनाथाच्या) मुंजीचा मुहूर्त काढण्यासाठी उतावीळ झालेल्या आजोबांच्या (चक्रपाणी) अस्वस्थ येरझाऱ्यांनी. जनार्दनपंतांची कृपादृष्टी नाथांवर का याची लेखकाने जी मीमांसा केली आहे (पृ. २३) तिच्या आधारे असे मानता येते : प्रपंच व परमार्थाचा समन्वय जनार्दनपंतांनी करून दाखविला असला तरी जनसमुदायाला भागवत धर्माची महत्ता पटवून दाखविण्यास त्यांना योग्य तो अवकाश मिळाला नव्हता. त्यामुळे नाथांच्या रूपाने प्रपंच-परमार्थाचा समन्वय करीत त्याला भागवत नव्हे 'महाभागवत' बनविणे हे त्यांचे उद्दिष्ट होते. मलंगवेषातील दत्तात्रेय वचन किंवा जनार्दन स्वामींनी पैठणच्या निवडक मंडळींजवळ व्यक्त केलेले विचार पाहता (पृ. ३० व पृ. ५२) नाथांचा जीवनप्रवास एका सामान्य प्रापंचिकाचा न उरता ईश्वरनियोजित महाभागवताचा बनतो. साहजिकच कादंबरीच्या दृष्टीने तो विकसित होत जाणाऱ्या चरित्रनायकाचा प्रवास उरत नाही. म्हणूनच श्रीखंड्याचे हरिरूप नाथांना अगोदरच जाणवते. त्यामुळे त्यातील अनुभूती न उरता ते केवळ गृहित बनते.

याउलट 'शांतिब्रह्म' मधील नाथांना श्रीखंड्यामध्ये पांडुरंगाच्या दर्शनाची अनुभूती मध्येच जाणवत असली तरी श्रीखंड्याचा बावळा वेष, त्याची नम्रता आणि त्याने स्वतः दिलेल्या माहितीप्रमाणे हा अनाथ-पोरका पोर गिरिजाबाईच्या विशेष मायेचा आहे. श्रीखंड्याची ही 'बा' आपल्या या मुलासाठी वधूसंशोधनाचा बेत आखते. श्रीखंड्याचे हे सारे चरित्र चित्रण एक साक्षात्कारी अनुभवच अनुभवल्याची अनुभूती देते.

नाथांच्या जीवनातील सर्वमान्य परिचित घटनांना नाविन्य देण्याचे, त्या घटनांमागील संतांची विशिष्ट जीवन दृष्टी उलगडून सांगण्याचे, त्यातील मनोवैज्ञानिकता तपासून पाहण्याचे काम 'शांतिब्रह्म' करते, हे अनेक उदाहरणांमधून जाणवते. उदा. 'गावबा' सारखा रुढार्थाने अर्धवट मुलगा भावार्थ रामायणाचे पंचेचाळीसाव्या अध्यायापासून विवरण करू शकला ही येथे केवळ चमत्कारकथा उरत नाही. गावबाची नाथांवर असणारी अनन्यभक्ती, त्याने नाथांबरोबर केलेले प्रदीर्घ प्रवास, श्रवण भक्ती-नामस्मरण भक्ती आणि तुलसीदासांसारख्या संतश्रेष्ठांचा सहवास / दर्शन आदी अनेक उपयुक्त गोष्टी एकत्र आल्यामुळेच चमत्कार वाटावा अशी ही घटना घडली.

कादंबरीतील वातावरण, तत्कालीन विशिष्ट जनमानस, त्यांची सामूहिक-वैयक्तिक जीवनराहाटणी या साऱ्यामध्ये कथानायकाचे चरित्र एकरूप होण्याची गरज असते. 'शांतिब्रह्म' च्या द्वारे हे सारे घटक वेगळे काढता येत असले तरी त्या साऱ्यांमध्ये एकनाथांचे चरित्ररंग मिसळलेले आहेत. त्याची काही ठळक उदाहरणे. 'शांतिब्रह्म' चे कथानक फुलत जाते ते प्रामुख्याने गोदावरीच्या काठावर. साहजिकच गोदाप्रवाह आणि नाथचरित्रप्रवाह यांचा एक समांतर प्रवास प्रारंभापासून अंतापर्यंत सुरू असलेला दिसतो. कादंबरीच्या आरंभीच ठराविक वेळी किनाऱ्याकडे येणाऱ्या पाच वर्षांच्या बटूच्या पावलांना स्पर्श करण्यास उतावीळ झालेली गोदावरी दिसते. कारण या बालपदस्पर्शामुळे तिच्या दोनशे-अडीचशे वर्षांपूर्वीच्या स्मृती जागृत होतात. या स्मृती आहेत पैठणला आलेल्या ज्ञानदेवादी भावंडांच्या. एका अर्थाने 'ज्ञानाचा एका' या लोकोक्तीची सांगडच येथे घातलेली दिसते. नाथांच्या जीवनप्रवासाची साक्षी असलेली गोदावरी येथे तेजस्वी स्त्रीरूप धारण करूनही प्रसंगी अवतीर्ण होते आणि नाथांच्या आयुष्याची इतिकर्तव्यता पूर्ण झाल्यानंतर आपल्याकडे कायमच्या विसाव्यासाठी आलेल्या या 'देवतुल्य लेकराला कुशीत घ्यायला ती आतुर होते' (पृ. ३२६)

नाथांनी केलेल्या भारतभ्रमणात त्यांना निसर्गाची असणारी ओढ, त्यांची संवेदनक्षमता, कठोर साधना आणि असीम गुरुकृपा यातून एक माणूस आणि एक द्रष्टा योगपुरुष म्हणून नाथांचे घडणारे दर्शन उल्लेखनीय आहे. या प्रवासवर्णनाच्या अनुभवामागे अर्थातच लेखिकेने केलेला प्रदीर्घ प्रवासही आहेच. या साऱ्या वातावरणाशी नाथांचे तत्त्वज्ञानही एकरूप झाल्याने विविध प्रसंगांद्वारे जाणवते. त्यामुळे हे तत्त्वज्ञान क्लिष्ट वा उपरे वाटत नाही किंवा त्याला केवळ विद्वत्ताप्रदर्शनाचाही वास येत नाही.

नाथ हे साधक, शांतिब्रह्म असले तरी 'माणूस' आहेत हे लेखिका विसरलेली नाही म्हणूनच या असामान्य मानवाच्या संभ्रमावस्थेचे, त्यांच्या व्याकुळ पितृहृदयाचे किंवा त्यांच्यातील रसिक पतीचे दर्शनही मध्येच येथे घडते. अर्थात असे करताना तत्कालीन समाजस्थितीचा विसर पडलेला नाही, हे विशेष. त्यामुळेच तरुण नाथांची रसिकता असो, हरिपंडीताचा वडिलांना असणारा विरोध असो की गिरिजाबाईचे मुलासाठी व्याकुळ होणे असो. कोणत्याही प्रसंगात या व्यक्तींचा संयम किंवा काळाची त्यांना असणारी चौकट सुटलेली नाही. सहचारिणी म्हणून गिरिजाबाईची सर्वार्थाने मिळणारी साथ हा नाथांच्या आयुष्यातला महत्त्वाचा विसावा आहे. नाथांनाही त्याची जाणीव आहे. म्हणूनच केवळ पत्नीला बरे वाटावे म्हणून नाथ घरातून जाऊन काशीला स्थायिक झालेल्या मुलाला आणायला जातात. त्यासाठी स्वतःला न पटणाऱ्या हरिपंतांच्या अटीही ते मान्य करतात. एका अर्थाने पत्नीच्या आजवरच्या साथसंगतीबद्दल नाथांनी व्यक्त केलेली ही कृतज्ञता आहे. पती-पत्नीच्या या अद्वैताची जाणीव असलेले स्त्रीमन 'शांतिब्रह्म' मध्ये गिरिजाबाईना सवाष्ण स्त्रीचे कृतार्थ मरण बहाल करते. तर 'महाभागवता'मधील नाथ स्थितप्रज्ञ, तर्कप्रधान असल्यामुळे आणि एक समीक्षक 'लेखक' झाल्यामुळे नाथांच्या समर्पित अखेरीनंतर त्यांच्या पत्नीला काय वाटले असावे ते मात्र नीट कळत नाही. प्रस्तुत कादंबरीत नाथांच्या नंतरही गिरिजाबाई राहिल्या असाव्यात असे वाटते. परंतु त्यांच्या भावस्थितीचा साधा निर्देशही येत नाही. कदाचित नाथांची अखेर हीच लेखकाला महत्वाची वाटत असावी.

संतचरित्राचा विचार करता संतांमध्ये व्यक्ती म्हणून जातीयता नव्हती. परंतु समाजाचा एक घटक म्हणून जातीपातीची बंधने पूर्णपणे तोडणे त्यांना जमले नाही. देवाच्या दारातील समताच त्यांना मान्य

करावी लागली याला एकनाथही अपवाद नव्हते, हे मात्र या दोन्हीही कादंबऱ्यांमधून जाणवते. एकनाथांना ज्ञानदेवांप्रमाणे अलौकिक प्रतिभेचे, लोकसंघटनाचे जन्मजात देणे मिळाले असले तरी त्याचा एक धागा लौकिक जीवनाशी निगडित आहे. त्यांच्या व्यक्तिमत्त्वात एक विरक्त, ज्ञानी पुरुष अंतर्भूत असला तरी त्याला लौकिक प्रपंचाचा तिटकारा नाही, हेदेखील या कादंबऱ्या स्पष्टपणे दर्शवितात.

थोडक्यात महाराष्ट्राच्या इतिहासात महत्त्वपूर्ण ठरणाऱ्या, मानवतेचा अखंड उद्‌घोष करणाऱ्या महामानवाचे महाराष्ट्राला आजही स्मरण आहे, हेच 'शांतिब्रह्म' आणि 'महाभागवत' च्या रूपाने जाणवते.

डॉ. श्यामा घोणसे
११७८/११, साईपुष्प, हिंगणेखुर्द,
सिंहगड रोड, पुणे ५१.

## ॥ ॐ वाक् सुमनांजलि ॥

*नमितों एक्या भावें जनीं वनीं एकनाथ संतांसी ।*
*जेणे भगवत् हृदगत हृदयंगम, अर्पिलें समस्तांसी ॥ १ ॥*
*प्राकृत ग्रंथामाजीं ज्ञानसुधा-सिंधु सांग साठविला ।*
*भगवत् पथ पथिकांना निष्कंटक संतमार्ग दाखविला ॥ २॥*
*भागवताची नौका मराठिच्या बंदरात लावोनी ।*
*एका नावाडी हा भगवत्प्रांतासिने वलावोनी ॥ ३ ॥*
*या निष्किंचन होऊनि रिक्त कराने नको मला पैसा ।*
*कैसा समय सुमंगल अलभ्य ऐसा मिळेल आपैसा ॥ ४ ॥*
*जो पाचारी लोकां जे का भवभय-भ्रमांत भरकटले ।*
*अति पतित पापपीडित मुक्त करें सर्वजीव सोडविले ॥ ५ ॥*
*एका एकत्वाच्या अधिष्ठानि बसुनिया प्रतिष्ठानी ।*
*सोकावी लोकांसी यास्तव सन्मानिला प्रतिष्ठानी ॥ ६ ॥*
*माया मृगजळ - मोहित मानव मृग मोक्षमार्ग मोकाळिती ।*
*सकल कलात्मक एका चंद्र जणू उगवला नभः प्रांती ॥ ७ ॥*
*शीतल किरण वितरणें जुरवी मृगजळ तृषा हरी सारी ।*
*वारी संसाराची सहज हरी नित्य ऐक्य परिवारी ॥ ८ ॥*
*तो एका एकत्वातेंही सांडोनिया जनीं विजनीं ।*
*नांदे ब्रह्मानंदे कोंदोनी राममानसीं वदनीं ॥ ९ ॥*

**कै. डॉ. रा. य. परांजपे**
**उर्फ सद्गुरु अण्णा महाराज.**

# देवा माझे मन लागो तुझे चरणी

**सौ. प्रभा टेंभेकर**

एम.ए. अर्थशास्त्र, निवृत्त प्राध्यापिका धरमपेठ महाविद्यालय, नागपूर. काव्यरचण्याचा छंद. आध्यात्मिकतेकडे जास्त ओढा. यज्ञशिखा, वंदनीय मावशी केळकर यांच्या जीवनचरित्रावर आधारित काव्य कुसुमांजली. समर्थदर्शन, दिव्यत्वाची जेथे प्रचिती, स्वामी विवेकानंद यांच्या जीवन गाथेवर आधारित व तेजोमय तव जीवनदर्शन रा. स्व. संघ आद्यसंस्थापक डॉ. हेडगेवार यांच्या जन्मशताब्दीप्रित्यर्थ वाहिलेली गीत सुमनांजली हे काव्यसंग्रह प्रकाशित. वरील गीतांचे संगीत कार्यक्रम सादर.

*देवा माझे मन लागो तुझे चरणी*
*संसार व्यसनी पडो नेदी ।*
*पायी तीर्थयात्रा मुखी रामनाम*
*हाचि माझा नेम सिद्धी जावो*
*आणिक दुसरे नको नको देवा*
*एका जनार्दनी सेवा नित्यनेमे ॥*

"देवा माझे मन लागो तुझे चरणी" असं संतश्रेष्ठ श्री एकनाथ देवापाशी मागणं मागताहेत. भगवंतासारखा दाता नाही म्हणूनच त्याला मागायचं. अनेक संतांनी देवाजवळ मागणं मागितलं आहे. 'हेचि दान देगा देवा । तुझा विसर नव्हावा... नलगे मुक्ति धनसंपदा साधुसंग देई सदा ।" असे तुकाराम महाराज म्हणतात. संतशिरोमणी ज्ञानोबा माऊलीन विश्वात्मक देवाजवळ पसायदान मागताना साऱ्या विश्वाचं कल्याण व्हावं यासाठी प्रार्थना केली अणि श्री समर्थ रामदास स्वामींनी अशी काही खुबी केली आहे की ते म्हणतात, "मागणे निरसे जेणे ऐसे देगा रामराया ॥"

तात्पर्य, संत जे मागणं मागतात त्यात ऐहिकाचा अंतर्भाव नसतो. त्यांना स्वतःला काहीच नको असते. पण जगाच्या कल्याणासाठीच त्यांचा जन्म असल्याने ते भगवंताची प्रार्थना करतात व त्यासाठी पारमार्थिक भूमिकेवरून देवाजवळ मागणं मागतात. आम्हा प्रापंचिकांची मजल ऐहिकाच्या पलीकडे जातच नाही. माझा संसार म्हणजे मुलं-बाळं, घर-दार, जमीन-जुमला इत्यादी ऐहिक विषय सुखेनैव मिळावेत म्हणून आम्हाला देव हवा. पण ज्याच्या कृपेने हे सारं प्राप्त होते त्याचे मात्र विस्मरण होते.

वरील अभंगात श्री एकनाथ महाराज भगवंताजवळ काय मागतात? तर देवा *माझे मन लागो तुझे चरणी । संसार व्यसनी पडो नेदी ॥* प्रपंचाच्या विषयासक्तीत आकंठ बुडालेल्या सामान्य जीवांसाठी हे मागणं आहे. जड शरीराच्या ठिकाणी चैतन्य शिरल्याबरोबर सर्व शरीर चेतनामय होऊन त्या शक्तीच्या सत्तेने सर्व व्यवहार सुरू होतात. सर्व शरीराबरोबर मन हे इंद्रियदेखील कार्यरत होते व अहंभावापासून हे कार्य सुरू होते. परंतु हा अहंभाव कुणी दिला हे मात्र शरीरस्थ चैतन्य म्हणजेच जीवात्मा विसरतो. त्याचबरोबर सर्व कर्तृत्व स्वतःकडे घेऊन तो मनाच्या तंत्रानेच वागू लागतो. मनाची धाव ही सतत देहाच्या बाहेर दृश्य विषयांचा उपभोग घेण्यासाठी असते. ही धाव जोपर्यंत बाहेर आहे तोपर्यंत त्याला दुःखाशिवाय काहीच प्राप्त होत नाही. सुख मिळाले तरी ते क्षणिक किंवा मायिक असते. मनाचा हा स्वभाव ओळखूनच ज्ञानेश्वर माऊली म्हणते की,

*तरी मना या बाहेरिली कडे । यावयाचि सविया मोडे*
*हे हृदयाचिया डोही बुडे । तैसे कीजे ॥ अ. ८ - १११॥*

श्रीसमर्थांनीसुद्धा मनाच्या श्लोकात या मनालाच वारंवार उपदेश करून *"मना सज्जना भक्ती पंथेची जावे"* असे सांगून खऱ्या सुखाचा मार्ग दाखविला आहे. चिकटणे हा मनाचा स्वभाव विशेष आहे. सुखाच्या आशेने ते विषयांशी असेच संलग्न होते. परंतु त्याठिकाणी खरे सुख नाही असा बोध होऊन जर ते भगवंताच्या चरणी जडले तर तिथेच ते स्थिर होईल. तेव्हा मनाच्या धावण्याची फक्त दिशा बदलली की काम झाले व हे कार्य संतांच्या सहवासात सुलभ होते. यासाठी भगवंताला शरण गेल्या खेरीज जीवाचा उद्धार नाही. म्हणूनच *सर्वधर्मान् परित्यज्य मामेकं शरणंव्रज॥* असे श्रीकृष्ण अर्जुनाला सांगतात.

जन्माला आल्यापासून देहाच्या अंतापर्यंत संसारशिवाय गत्यंतर नाही. संसार म्हणजेच जीवन पण सामान्य जीव या संसाराच्या आहारी जातो आणि प्रारब्धानुसार वाट्याला येणारी सुखःदुखे भोगीत राहतो. वास्तविक सुख-दुःख हे वस्तू किंवा परिस्थितीत नसून ते मनाच्या अवस्थेवरच अवलंबून आहे. म्हणूनच *मन एव मनुष्याणां कारणं बंधमोक्षयोः ।* असे म्हटले जाते. यासाठी जे काही घडेल ते भगवंताच्या इच्छेने घडते हा भाव स्थिर झाला तर मनाला सुख-दुःखाची बाधा होत नाही. ते खऱ्या अर्थाने समाधानी होते. कधीही खंड न पडणारा आनंद असे मन भोगू शकते. हा आनंद केवळ भगवंतापाशीच आहे तो सच्चिदानंद स्वरूपच आहे. जीव हा परमेश्वराचाच अंश असल्याने त्याची ओढ आनंदाकडे असते. पण तो कसा व कुठून मिळेल याची जाणीव मात्र केवळ अज्ञानामुळे विसरतो व दुःखी होतो. म्हणूनच संसारात राहूनही त्याला संसाराचे व्यसन म्हणजेच आसक्ती लागू नये म्हणून भगवंताची प्रार्थना रुढार्थाने जो संसार आहे तो श्री एकनाथांनी पण शेवटपर्यंत केला. त्यांचे घर म्हणजे "वसुधैव कुटुंबकम्" होते. सुदैवाने पत्नी अत्यंत अनुकूल होती. त्यामुळेच त्यांचे घर अतीत अभ्यागताना माहेर व गोरगरिबांना आपले आधारस्थान वाटायचे. वरवर पाहता नाथांचा प्रपंच चार-चौघांसारखाच दिसला तरी अंतरंग दृष्ट्या तो अकर्तात्मबोधाचा सर्वोत्तम आदर्श होता म्हणून संसारात

राहूनही ते त्यात गुंतले नाहीत. केवळ परमार्थाचे साधन म्हणूनच त्यांनी प्रपंच केला. अंतर्यामी ते आत्मानंदी रंगलेले होते म्हणूनच कोणत्याही बऱ्या-वाईट प्रसंगी त्यांच्या मनाचा समतोल ढळला नाही.

काशीसारख्या संस्कृत विद्येच्या माहेरघरी श्रीएकनाथांनी भागवताच्या एकादश स्कंधावर मराठी भाष्य पूर्ण केल्यानंतर त्या ग्रंथाची काशीतील पंडितांनी पालखीतून मिरवणूक काढून त्यांच्या मराठी ग्रंथाचा एवढा गौरव केला की ज्ञानेश्वरीसारख्या दिव्य ग्रंथांच्या बरोबरीने त्याला महत्त्व प्राप्त झाले. पण या लौकिकाने ते हुरळून गेले नाहीत. त्यांच्या सर्व समावेशक किंवा उदारमतवादी धोरणाला विरोध म्हणून त्यांचा विद्वान मुलगा हरिपंडित गृहकलह विकोपास जाईल म्हणून आपली बायको व मुले घेऊन घर सोडून काशीला निघून जातो. नाथांसारख्या थोर सत्पुरुषावर वृद्धापकाळात असा प्रसंग यावा हे केवढे दुर्दैव ! पण याही प्रसंगी त्यांचे चित्त जराही विचलित झाले नाही व काही वर्षांनी तितक्याच शांत मनाने त्याची समजूत काढून ते त्याला घरी परत आणतात. सर्वांभूती भगवद्‌भाव ठेवल्यानेच साक्षात भगवंत आपल्या भक्ताची चाकरी करण्यासाठी श्रीखंड्याच्या रूपाने त्यांच्या घरी १२ वर्षे राहून त्यांची सेवा करतो असे उदाहरण केवळ श्रीएकनाथांच्याच जीवनात बघावयास मिळते.

*गृहस्थाश्रमु न सांडिता । कर्मलेखा नोलांडिता । निजव्यापारी वर्तता । आत्मबोध न मळिये ॥* हे त्यांच्या जीवनाचे सूत्र होते. प्रपंच हा परमार्थ स्वरूप व्हावा त्याचे व्यसन लागू नये व ते भगवंताच्या चरणी सदैव गुंतले जावे म्हणून जी साधन परंपरा आहे त्यात पहिले साधन तीर्थयात्रा सांगितली आहे.

*पायी तीर्थयात्रा मुखी रामनाम ।*

*हाचि माझा नेम सिद्धी पावो ॥* असे श्रीएकनाथ पुढच्या चरणात म्हणतात. यात्रा म्हणजे परिभ्रमण ! पायी यात्रेत मनुष्य एकाकी असतो. संग हा वासनांचा जनक असतो. समर्थ म्हणतात, *''नकोरे मना संग हा खेदकारी ।''* तेव्हा वासना ईश्वराभोवतीच फिराव्यात यासाठी एकांत आवश्यक परंतु *ध्यायते विषयात् पुंसान* यानुसार मनाचा संग बाह्य विषयाशीच असतो पण त्यातून त्याला बळजोरीने काढूनच भगवंताच्या पायाशी न्यायचे म्हणून तीर्थयात्रा. तिथे साधुसंतांच्या तपस्येने पवित्र झालेली भूमी, देवदेवतांची दर्शने व सत्‌समागम इत्यादींनी मनाला वळण लावणे सोपे जाते. पण खरी तीर्थयात्रा मानवी शरीरातच घडते. *। काशीक्षेत्रं शरीरं त्रिभुवनजननी पावनी ज्ञानगंगा भक्तिश्रद्धा गयेयं निजगुरुचरणी लब्धयोगः प्रयागः विश्वेशोयस्तुरीयः सकल जनमन साक्षीभूतांतरात्मा इत्थं सर्वं मदीये हृदिवसति पुनः क्षेत्रमन्यत् किमस्ति साक्षेत्रमन्यत् किमस्ति ॥*

वरील श्लोकांत आपल्या शरीराच्या ठिकाणी काशी, गया व प्रयाग यांचे रूपकात्मक वर्णन मोठ्या मार्मिक पद्धतीने केले आहे. काशीला दोन गोष्टी आहेत १) विश्वेश्वर व २) गंगा. मनुष्याच्या शरीराच्या ठिकाणी ज्ञानगंगा आहे जी अन्य कोणत्याही शरीरात नाही. त्यामुळेच मी कोण? याचे ज्ञान फक्त याच योनीत होऊ शकते. अशा या नरदेहाचे सार्थक भगवत् प्राप्तीतच आहे. अशा रीतीने मनुष्य जन्म जर तीर्थक्षेत्र मानले तर या जन्मात केलेले पाप म्हणजेच भगवंताचे विस्मरण हे वज्रलेप होईल, कारण

*अन्यक्षेत्रे कृतं पापं । तीर्थक्षेत्रे विनश्यति*

*तीर्थक्षेत्रे कृतं पापं । वज्रलेपो भविष्यति ॥*

ज्ञानगंगेबरोबरच भक्ती (श्रद्धा) रूपी यमुनादेखील मानवी देहांतच सापडते. ही श्रद्धा म्हणजेच गया होय. प्रयाग म्हणजे श्री सद्‌गुरुंच्या चरणाच्या ठिकाणी निष्ठा. ही सद्‌गुरु सेवेत परिणत होते.

*गुरुर्ब्रह्मा गुरुर्विष्णु गुरुर्देवो महेश्वरः* असे आपण सद्‌गुरुंचे वर्णन करतो. प्रयागला गंगा-यमुना-सरस्वती यांचा संगम आहे. म्हणजे त्यांचे पती (गंगा - शंकर, यमुना -विष्णु, सरस्वती - ब्रह्मा) त्या ठिकाणी राहणारच. काशीला विश्वेश्वर आहे. विश्वाचा तो ईश्वर म्हणजे तो विश्वात आहे. काशीतच आहे असे नाही. मनाचा साक्षीभूत अंतरात्मा तोच आहे. म्हणजे विश्वमनाचा अंश असणारे आपले मन त्याला आपल्यालाच अंतरात शोधू शकते. ही तुरीय अवस्था प्राप्त होण्यासाठी प्रथम मन एकाग्र होणे आवश्यक आहे. त्यासाठी ईश्वराच्या नामस्मरणाची गरज आहे. सर्वसाधनांती जे साधू शकते ते केवळ नामस्मरणाने साधते. ईश्वराशी जवळीक साधणारे ते साधन आहे. सर्व संतांनी नामसाधनेला अनन्य साधारण महत्त्व दिले आहे. ज्ञानेश्वरीसारखा अध्यात्मप्रवण ग्रंथ लिहिणारे ज्ञानेश्वर महाराज हरिपाठाचे अभंग लिहिताना भगवंताच्या नाम प्रेमात नुसते न्हाऊन निघतात. *काहीच न करोनी प्राणी ।रामनाम जपे वाणी । तेणे संतुष्ट चक्रपाणी । भक्तालागी सांभाळी ।* इतकी खात्री श्रीसमर्थ नामस्मरणाच्या समसातून देतात. अगदी अलिकडच्या काळात झालेले थोर नामवतारी संत श्रीब्रह्मचैतन्य गोंदवलेकर महाराज तर नामासाठीच जन्माला आले व हजारो स्त्री-पुरुषांना त्यांनी नामाला लावले. भगवंत आणि नाम हे एकच आहेत ही त्यांची अढळ निष्ठा. *''जेथे नाम तेथे माझे प्राण''* असे आश्वासन त्यांनी भक्तांना दिले आहे. अशा नामाने भगवंत आपलासा करून घेता येतो. सद्‌गुरु जेव्हा शिष्याला नाम देतात तेव्हा त्यात नामाची शक्ती देतात. हे नाम प्रेमाने घेतले तर भगवंत वश झाल्याखेरीज राहत नाही. अशा या आनंदमय ईश्वराला जर माणसाचे अंतरंग चिकटले तर तेथून ते परत फिरणार नाही. ते अमृत प्रेमाने भरून जाते. नव्हे नव्हे ते भगवत् स्वरूपाशी तद्रूप होऊन जाते. संत तुकाराम महाराजांना 'तुका झाला पांडुरंग' अशी अवस्था प्राप्त झाली होती. या नामनौकेच्या आश्रयानेच संत नामदेव, जनाबाई, कान्होपात्रा, गोरा कुंभार, मीराबाई आदि कितीतरी संत या भवसागरातून पार तरून गेले. श्रीसंत एकनाथसुद्धा ब्रह्मनिष्ठ असे साक्षात्कारी संत होते. तसेच ते अद्वैती असून त्याचे दर्शन त्यांच्या वाङ्‌मयातून घडून येते. तरीपण हे पवित्र असे अद्वैत दर्शन प्रतिपादन करीत असतानाच व्यवहाराच्या पातळीवरून सर्वसामान्यासाठी भक्तिप्रेमाची माधुरी वर्णन करताना त्यांच्या प्रतिभेला बहर आ[illegible] आहे. देहबुद्धी जाऊन आत्मबुद्धी येण्यास भक्तीसारखे श्रेष्ठ साधन नाही, ही गोष्ट त्यांनी आवर्जून सांगितली.

सगुणाचे त्यांना अपरंपार प्रेम होते व नामसाधनेशिवाय सगुणाचे अनुसंधान साधत नाही. म्हणून त्यांनीही हरिपाठातून नामसाधनेचा गौरव केला आहे. शेवटी ते देवाला प्रार्थना करतात की,

*आणिक दुसरे नको नको देवा*
*एका जनार्दनी सेवा नित्यनेमे ॥*

देवा तुझ्याशिवाय मला दुसरे काहीही नको. तुझी सेवा मात्र नित्य घडू दे. त्यातच इंद्रियांचा विसर पडून मन तुझ्या ठिकाणी स्थिर होईल.

संसारात राहूनही *"पद्मपत्रनिवांभसा"* यानुसार अलिप्त राहून ज्यांचे आत्मानुसंधान यत्किंचितही ढळले नाही अशा थोर श्रीएकनाथांचे वर्णन संतनामदेवरायांच्या शब्दात करायचे तर

*"संसार सागर भरला दुस्तर*
*विवेकी पोहणारा विरळा संत ॥"*

असेच करावे लागेल.

श्रीसंत एकनाथांचे चरणी साष्टांग दंडवत.

सौ. प्रभा टेंभेकर
२१६, हनुमाननगर
नागपूर ४४० ००९.



### नाथांचा हा बोध

*सहज सुंदर देह दैवे लाभे*
*परी त्याची निगा राखेविना*
*बाह्यरूप सारे सजवूनी ठेवले*
*अंतरी प्रकाश फाकेविना ॥*
*संकल्प विकल्प दाटुनिया आले*
*उरी मळकट हलेचिना*
*विवेकाचा बंध तुटोनिया गेला*
*मायेचे पटल विरेचिना ॥*
*अंतरंगी वसे चैतन्याचा दीप*
*माथा झुकवूनी पाहेचिना*
*मग कैचा देव मनी नाही भाव*
*निरामय सुख लाभेचिना ॥*
*नित्य शाश्वताचे रूप तेचि जाण*
*ठायी ठायी भरे नारायण*
*दया क्षमा शांति समाधान वृत्ती*
*नाथांचा हा बोध नांदो चित्ती ॥*

**सौ. सरोज अनंत करंदीकर**
कृतार्थ सोसायटी, 'स्वरूप' बिल्डींग, २/८,
पुणे-सातारा रोड, पुणे ४११ ०३७.

# कीर्तनप्रेमी संत एकनाथ

**प्रा. वि. न. घारपुरे**

बी.एससी (ऑनर्स) एम.ई. सिव्हिल, डीएमएस संगीत विशारद. ३१ वर्षे प्राध्यापक व विभागप्रमुख / स्थापत्य अभियांत्रिकी विभाग व शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय येथे शिक्षण - वृत्तपत्रांतून स्फुटलेखन, पाच पुस्तके व लेखमाला. संगीत, कीर्तन, यात रस, पुणे आकाशवाणीसाठी लेखन व सहभाग.

'मी वर्तमानपत्राचा संपादक झालो नसतो तर कीर्तनकार झालो असतो' हे उद्गार आहेत १९ व्या शतकातील लोकमान्य बाळ गंगाधर टिळकांचे. तर १७ व्या शतकातील समर्थ श्रीरामदासस्वामी म्हणतात की, *'पहिले ते हरिकथा निरुपण । दुसरे ते राजकारण ॥ तिसरे सावधपण । सर्व विषयी ॥'* निद्रिस्त महाराष्ट्राला जागे करण्यासाठी श्री शिवरायांच्या साहाय्यातून जे माध्यम वापरण्यात आले ते म्हणजे संतांचे अभंग, ओव्या, पोवाडे, राष्ट्रगीते आणि कीर्तने. प्रखर राष्ट्रवादासाठी धर्माचे अनुष्ठान हवेच. निधर्मी राष्ट्रकल्पना ही एक भ्रामक समजूत आहे. प्रत्यक्षात राष्ट्रातील प्रत्येक मानवाचा स्वतःचा असा धर्म वेगळा असला तरी त्या धर्मानुसार तो परमेश्वराचे आशीर्वाद, सुख-समाधान मिळण्याकरिता मागत असतो. इथे परमेश्वराबद्दलची संकल्पना प्रत्येक धर्मानुसार वेगळी असली तरी अखेर 'परमेश्वर एकच आहे', हे निरंतर सत्य आहे. धर्म ही जगण्यासाठी घालून दिलेली एक संहिता आहे. सर्वधर्म समावेशक असा जर कोणता धर्म असेल तर तो म्हणजे 'राष्ट्रधर्म'. अठरापगड जाती असलेल्या भारतासारख्या देशातील समाजाला 'आनंदमय जीवन' जगायचे असेल तर त्याकरिता सर्वप्रथम गरज आहे ती 'जीवन शुद्धीची.' यासाठी सातशे वर्षांपूर्वी संजीवन समाधी घेतलेले संत श्री ज्ञानेश्वर महाराज म्हणतात - *'तरी कीर्तनाचेनि नटनाचे । नाहीले व्यवसाय प्रायश्चित्ताचे । जे नामचि नाही पापाचे । ऐसे केले ॥ ऐसे माझेनि नामघोषे । नाहीचि करिती विश्वाची दुःखे । अवघे जगचि महासुखे । दुमदुमत भरले ॥'* म्हणजे नामसंकीर्तन आणि दुःखनाश यांचा परस्पराचा संबंध कसा आहे हे सामान्यांना कळले नाही तरी विचार शक्ती आणि विवेकबुद्धी असणाऱ्यांना हे निश्चित कळले आहे की 'जीवन जेव्हा निर्दोष होईल, विकाररहीत होईल तेव्हा आपोआपच दुःख विरहित शांति-समृद्धी लाभेल. मात्र त्यासाठी धर्मनिष्ठेबरोबरच ईश्वरभक्ती आवश्यक आहे.'

भारतात वेदकालापासून कीर्तनाची परंपरा असून श्री देवर्षी नारद हे हरिकीर्तन महामंत्राचे ऋषी होत. वेदास प्रारंभ करताना 'हरि : ॐ' असाच प्रारंभ केला जातो. वेदातील सामगायन हा एक कीर्तन प्रकारच आहे. कारण *'चहू वेदी जाणसाही शास्त्री कारण अठराही पुराणे हरिसी गाती ॥'* संकीर्तन हे भगवंतास अत्यंत प्रिय आहे, असे महर्षी नारदांचे सांगणे आहे. श्री व्यासपुत्र शुक्राचार्यांच्या वाद्यवृंद साथीदार इत्यादींसह होणाऱ्या अभूतपूर्व अशा कीर्तनाचे वर्णन पद्म पुराणात केलेले आहे. आजपर्यंत वेळोवेळी भगवंतानी अनेक अवतार घेऊन प्रजारक्षणार्थ समाजकंटकांचा निःपात केला आहे आणि म्हणून श्री ज्ञानेश्वर महाराज म्हणतात *'पांडुरंगी मन रंगले । गोविंदाचे गुणी वेधले ॥ गुणगाईन आवडी ॥'* नाथांनी पुराण आणि कीर्तन या दोन प्रभावी आणि परिणामकारक साधनांचा फार यशस्वीपणे उपयोग केलेला आहे.

*धर्माची वाट मोडे । अधर्माची शीग चढे । ती आम्हां येणें घडे । संसार स्थिती ॥*

*नाना मते पाषांड । कर्मठता अति बंड । तयाचें ठेंचणें तोंड । हरिभजने॥*

असा उल्लेख नाथांनी संतांच्या कार्यासंबंधी लिहिला आहे. यामागे 'लोकांना उपदेश करून सन्मार्गाला लावण्याचे त्यांचे ध्येय आहे.' असे आढळून येते. त्यांच्या मते कीर्तनाचे माध्यमातून जनतेला ज्ञान प्राप्त करून देऊन, कर्तव्यनिष्ठा जागृत करून त्यांचे जन्माचे सार्थक व साफल्य मिळवून देता येईल. यासाठी नाथांनी लिहिलेले एक सुंदर पद की जे अतिशय लोकप्रिय झाले ते असे -

*संत संगें अंतरंगे नाम बोलावें । कीर्तनरंगी देवासन्निध सुखे डोलावें॥*

*सगुणचरित्रें परमपवित्रें सादर वर्णावीं । निराभिमाने सज्जनवृंदे आधी वंदावीं ॥*

*भक्तिज्ञानाविरहित गोष्टी इतरांना कराव्या । मनोभावें वैराग्याच्या युक्ति जोडाव्या ॥*

*जेणें हृदयी सत्वर मूर्ति ठसावे हरीची । ऐशी कीर्तन मर्यादा आहे या संत घरची ॥*

*श्रवण मननें अद्वय भजनें वाजवी कर टाळी । एका जनार्दनी मुक्ति झाली तत्काळी ॥*

संत एकनाथांच्या पदोपदीच्या उपदेशाचा मुख्य हेतू 'हरिकीर्तन' श्रवण करून मनुष्याची अंतःकरण म्हणजेच मनाची शुद्धी होऊन संसारातील दुःखांपासून सुटका होऊन मुक्ती मिळावी हा होता. त्याचबरोबर स्वतः मनुष्याने सतत हरिस्मरण करीत उल्हासी मनाने नित्य कर्म ईश्वर चरणी अर्पण करीत जगावे असे त्यांचे सांगणे होते. नाथांच्या अनेक ग्रंथांत कीर्तनाचे महत्त्व विषद करून सांगितले आहे. पुराण सांगताना ते अशा पद्धतीने सांगत की त्यांचे सांगणे लोकांना पटत असे, रुचत असे, तर कीर्तन करत असताना हरिनामाचा गजर करून ते श्रोत्यांची मने आकर्षित करून त्यांचे लक्ष खेचून घेत असत. त्यांची वाणीच अशी काही होती की शब्द कानी पडताच सर्व श्रोतृवृंद कीर्तनात तल्लीन होऊन जात, रंगून जात. प्रारंभीच्या पूर्वरंगावर आधारीत कीर्तनातील

विषय निरुपणाची रचना नाथ स्वतःच्या अनुभवांवर करीत असल्यामुळे ते ऐकण्यासाठी लोकांचा मोठा समुदाय लोटत असे. लोकांना जे हवे असे त्यांची जी अपेक्षा असे नेमकी तीच हेरून नाथ आपल्या रसाळ आणि सोप्या शब्दांत त्याची पूर्तता करीत असत आणि त्यामुळे लोकशिक्षणाचे कार्य ते कीर्तनाच्या माध्यमातून यशस्वीपणे पुरे करू शकले. कीर्तनाची महती सांगताना नाथ म्हणतात,

*कीर्तनें स्वधर्म वाढे । कीर्तनें स्वधर्म जोडे । कीर्तनें परब्रह्म आंतुडे । मुक्तिकीर्तनापुढे लाजोनि जाये ।। भावें करितां हरिकीर्तन । तेणे संतोषे जनार्दन । उभयतां पडे आलिंगन । मिठी परतोन सुटेना ।। तेव्हा सबाह्याभ्यंतरी । देव प्रगटे चराचरीं । दुजें देखावया संसारीं । सर्वथा उरीं उरेना ।। एवं योगयोगादि तपसाधनें । पोरटी केलीं हरिकीर्तनें । कलियुगी नामस्करणें । जड उद्धरणें कीर्तनीं ।।*

कीर्तनकार आणि प्रवचनकार स्वतः कसा असावा याबद्दल संत एकनाथ स्वानुभवावरून सांगतात की, श्रोतृसमुदायावर उत्कृष्ट परिणाम होण्यासाठी अमोघ-रसाळ वाणीला शुद्ध आचरणाची जोड हवी. उपदेश करण्याचा अधिकार निरलस आणि निर्लोभ असणाऱ्या कीर्तनकारालाच पोहोचतो. वक्तृत्व, सशास्त्र आणि सुरेल गायन, निष्काम कर्मभावनेने उच्चतम असे बोधामृत देण्याची अंतरीक तळमळ यासारख्या गोष्टी कीर्तनकाराचे अंगी असणे आवश्यक आहे. कीर्तनसमाप्तीचे प्रसंगी प्राप्तीवर दृष्टी न ठेवता किती श्रोतृसमाज भक्तिमार्गाला लावता आला असा विचार, असे विश्लेषण कीर्तनकाराने सतत करीत राहिले पाहिजे. अहंकाराऐवजी जे घडते आहे ते परमेश्वरांच्या इच्छेने, साह्याने घडते आहे असा विचार मनावर बिंबवला पाहिजे. असे सर्व पथ्य पाळले तर -

*भक्तिज्ञान वैराग्य मुक्त । व्याख्यानी रस अद्‌भुत । नित्य नूतन गोडी उपजत । प्रेम ओसंडत श्रवणार्थिया । लांचावले सुख चित्र । नित्य आनंद भोगीत । उत्कर्ष वाढला भक्तिपंथ । नामजागर होत घरोघरीं ।।*

पण असे सर्व होण्यासाठी कीर्तनकाराने हे लक्षात ठेवले पाहिजे की -

*तुम्ही करुनिया सेवा । वाढविले मज नावा ।*
*ऐसा कृपाळु उदार । पांडुरंगा तू निर्धार ।।*
*नानापरी उपचार । नित्य पुरवा अपार ।*
*उतराई नोहे देखा । म्हणे जनार्दन एका ।।*

संत एकनाथांचा कालखंड हा मुसलमानी सत्तेचा होता. हिंदू धर्मियांचा ठायीठायी अतोनात छळ होत होता. राजकारणाबाबत उघडपणे बोलणे अशक्य होते. तेव्हा अशा परिस्थितीला तोंड देत हिंदू धर्माचे रक्षण करण्याचे बहुमोल कार्य नाथांना करावयाचे होते आणि ते त्यांनी अत्यंत जोखमीने केले यात काहीच शंका नाही. धर्मस्थापनेकरिता 'सततं कीर्तयन्तो मां यतंतश्च दृढव्रता :' या भगवंताच्या उक्तीप्रमाणे पुराण आणि कीर्तनद्वारा नाथांनी आपले कार्य सतत चालू ठेवले होते.

नाथांनी केलेली पद्यरचना गेय स्वरूपाची आहे. त्यातील कथानके मुख्यतः श्रीकृष्ण चरित्रावर आधारीत असल्यामुळे त्या रचना बहुजन समाजात पटकन रुळल्या गेल्या. उदा. वारियाने कुंडले हाले, 'असा कसा देवाचा देव बाई ठकडा' इ. त्याचप्रमाणे नाथांची 'आदिमाया विंचू, जागल्या, कुडबुड्या जोशी' या विषयांवरील भारुडे प्रसिद्ध आहेत तर त्यांचे कित्येक उत्तमोत्तम अभंग सर्वतोमुखी राहिले आहेत.

वरील विवेचनांवरून एक गोष्ट लक्षात येते की ज्याच्या अंगी काव्यलेखन, वक्तृत्व, गायन या सारख्या कलांची प्रतिभा आहे तो कीर्तनाकडे वळला नाही तरच नवल. कीर्तनभक्ती हा परमेश्वराजवळ पोहोचण्याचा एक उत्तम मार्ग आहे हे अनेक संतांनी अनुभवले आहे आणि खरे तर त्याचा जनक नारदीय कीर्तनकार श्री महर्षी नारदच होय. मग संत एकनाथ तरी त्याला अपवाद कसे असणार? त्यांनी आपल्या एका प्रसिद्ध अशा अभंगातच म्हटले आहे की कीर्तनांमधून देवांची व संतांची पावन चरित्रे मोठ्या तन्मयतेने सांगावीत-गावीत. मात्र हे असे करीत असताना नाथांनी काही पथ्येही पाळायला सांगितली आहेत. ती म्हणजे कीर्तनात भक्तिज्ञानाविरहित इतर वायफळ गोष्टी, लौकिक गोष्टी, विनोदी कथा यासारख्या भक्तीरसाला विचलित करणाऱ्या अप्रस्तुत गोष्टी नसाव्यात. कारण नामभक्तीचे प्रेमभावाने मिळणारे सुख स्वतः कीर्तनकार आणि श्रोतृवर्ग यांना मिळवायचे आहे. त्यासाठी कीर्तनात रंगून जायचे आहे, आनंदाने डोलायचे आहे, स्वतःला विसरून जाऊन श्रीहरिची मूर्ती हृदयात ठसवायची आहे. मग त्यासाठी टाळ, मृदुंग, चिपळ्या, टाळ्या यांची साथ घेण्यास नाथांची हरकत नाही. नाथ म्हणतात -

*सगुण चरित्रे परम पवित्रे सादर वर्णावी । सज्जनवृंदे मनोभावे आधि वंदावी ।। संतसंगे अंतरंगे नाम बोलावे । कीर्तनरंगी देवासन्निध सुखे डोलावे ।। भक्तिविरहित गोष्टी इतरां न कराव्या । प्रेमभरे वैराग्याच्या युक्ती विवराव्या । जणे करूनी मूर्ती ठसावे अंतरी श्रीहरिची । ऐशी कीर्तनमर्यादा या संतांच्या घरची ।।*

संतांचा संदेशच असा आहे की कीर्तनांतून केवळ प्रभुप्रेम भक्तीचा साक्षात्कार व्हावा. समाजसुधारणा, समाजप्रबोधन अशा गोंडस नावाखाली ग्रामसुधारणा, साक्षरताप्रसार, आरोग्य, स्वच्छता, संततीनियमन आणि यासारख्या अन्य विषयांवर रचित / कीर्तने ही खऱ्या अर्थाने कीर्तने नव्हेतच. तो केवळ कीर्तनाचे अंगाने केलेला प्रचार व प्रसार आहे.

हरिकीर्तनासंबंधी नाथ म्हणतात,

*" मनें करावें हरीचें ध्यान श्रवण करावें कीर्तिश्रवण । जिव्हे करावे नामस्मरण । हरिकीर्तन अहर्निशीं ।।"*

कीर्तनासंबंधी नाथ म्हणतात,

*'स्त्रीशूद्र अंत्यजन । उद्धरण हरिनामें । कीर्तनें स्वधर्म वाढे । कीर्तनें स्वधर्म जोडे । कीर्तनें परब्रह्म आतुडे । मुक्ती कीर्तनापुढें चालोनि जाय ।।'*

सर्व संतांचे आवडते क्षेत्र म्हणजे पंढरपूर. एक तीर्थस्नान. या एकाच ठिकाणच्या श्री पांडुरंगाच्या वास्तव्यावर अनेक संतांनी पुष्कळ अभंग रचले आहेत. एकनाथांनी एकाच ओळीत या स्थानाचे वर्णन केले आहे, *'बहुत तीर्थेक्षेत्रे बहुता परी । न पावती सरी पंढरीची'*

यावरून पंढरीचा महिमा लक्षात येतो. दरवर्षी लाखो भाविक देहुहून संत तुकारामांच्या तर आळंदीहून संत ज्ञानेश्वरांच्या पालख्या पंढरपुरास आषाढी एकादशीला विठ्ठलाचे दर्शनासाठी येऊन जातात, वारी करतात त्या मागचे रहस्य हेच आहे.

संत एकनाथांच्या सर्व साहित्याचा समावेश कीर्तनाच्या पुर्व रंगात आणि उत्तररंगात चपखलपणे बसण्यासारखाच आहे हे अनुमवास येते आणि त्याचे कारण एकच कीं त्यांना किर्तनकलेची संपूर्ण जाण होती, प्रतिभा होती, आवड होती. मात्र सध्याच्या अराजकतेच्या परिस्थितीत पुन्हा एकदा संत एकनाथांसारख्या संतांनी पुर्नजन्म घेऊन समाजाचे रक्षण करण्यासाठी धावून येण्याची वेळ येऊन ठेपली आहे असे वाटते.

श्रीकृष्णार्पणमस्तु

श्री. वि. न. घारपुरे
९ वसंतबाग सोसायटी,
बिबवेवाडी परिसर,
पुणे ४११ ०३७.













# ॥ 'साहित्य रत्नांची एका - जनार्दनी उजळली ज्योती ॥'

**श्री. अजित कुलकर्णी**

बी. ए. (तत्त्वज्ञान) एम.ए. तत्त्वज्ञान, समाज शास्त्र, पी.एच.डी. काम सुरू. रजिस्ट्रार बी.एम.सी. कॉलेज. पुस्तके, लेखमाला प्रसिद्ध. गेली २५ वर्षे प्रवचन, कीर्तन, व्याख्यान. श्रीज्ञानेश्वरी, भागवत, दासबोध, रामकृष्ण, विवेकानंद इ. गाढा अभ्यास. शंकराचार्यांकडून गौरव पुरस्कार, पुणे महानगरपालिका आदर्श शिक्षक व गौरव पदक. धर्मभूषण पदवी श्रीमत् जगदगुरु शंकराचार्य (पुरी) १९९६.

संतांची चरित्रे ही माणसाच्या मनावर चांगले संस्कार करीत असतात. यामुळे मनुष्याचे व्यक्तिगत जीवन व समाजजीवन समृद्ध बनवित असते. परंतु असे समृद्ध जीवन संपन्न होण्यासाठी मनुष्याजवळ व्यापक दृष्टी आणि बोध मुरण्यासाठी मनुष्याचे मन सक्षम असावे लागते.

परमार्थाच्या प्रांगणात संतश्रेष्ठ शिरोमणी ज्ञानदेवांनंतर संत एकनाथ महाराजांनी भागवत धर्माची पताका फडकविली आणि मराठीजनमानसात श्रद्धा, भक्ति, प्रेम, समता आणि विश्वबंधुत्वाचे अतूट नाते निर्माण केले आहे. या लेखातून नाथांच्या साहित्यांचा मागोवा आपण घेणार आहोत.

नाथांची साहित्य संपदा विपुल असून ती भक्तीच्या ओलाव्यानी परिपूर्ण चिंब झालेली आहे.

नाथांची साहित्य संपदा येणेप्रमाणे :

१) एकनाथी भागवत, २) भावार्थ रामायण, ३) चतुःश्लोकी भागवत, ४) हस्तामलक टीका, ५) शुकाष्टक टीका, ६) स्वात्मबोध, ७) चिरंजीवपद, ८) आनंदलहरी, ९) अनुभवानंद, १०) आनंदामृत, ११) मुद्राविलास, १२) लघुगीता, १३) रुक्मिणी-स्वयंवर, १४) अभंग गाथा - सुमारे २०० विषयांचे वर्गीकरण चार प्रकरणांतून मांडले आहेत.

### एकनाथी भागवत

एकनाथ महाराजांनी श्रीमद् भागवताच्या अकराव्या स्कंधावर जी टीका लिहिली त्याला 'एकनाथी भागवत' असे म्हणतात. सन १५७३ मध्ये कार्तिकी पौर्णिमेस महाक्षेत्र वाराणसी येथे ही ग्रंथ रचना लिहून पूर्ण झाली होती. पहिले पाच अध्याय पैठण गावात लिहून झाले होते. तेव्हा कोण्या एका भाविकाने हे पाच अध्याय लिहून घेऊन वाराणसीला बरोबर नेले होते. हे भागवताचे पाच अध्यायांचे मराठीकरण पाहून काशीक्षेत्रातील संस्कृतभिमानी लोक नाराज झाले होते. तेव्हा नाथांना या विद्वत् सभेत बोलाविले गेले ! तेव्हा नाथ वाराणसीला गेले! त्या वेळी आचार्य व इतर विद्वान मंडळींबरोबर चर्चा झाली व त्या वेळच्या नाथांचा अतिविनम्र भाव, साहित्य सौंदर्य व त्या वेळच्या अद्‌भुत अनुभवांमुळे नाथांचा फार मोठा गौरव करण्यात आला होता.

चतुःश्लोकी भागवत गुरु आज्ञेने पूर्ण झाले तर, भागवतावरील ही टीका म्हणजे लोक आग्रहास्तव केली होती - याबाबत नाथ म्हणतात :

*एकांती आणि लोकांती । थोर साक्षेप केला संती ॥*

श्रीमत् भागवत या ग्रंथातील अकराव्या स्कंधामध्ये श्रीकृष्णाने उद्धवाला जो उपदेश दिला त्याला 'उद्धवगीता' असे म्हणतात. श्री ज्ञानदेव व श्री एकनाथ यांच्यामध्ये कार्य व कर्तृत्वाचे एक नातं असे आहे की, नाथांनी उद्धवगीतेवर टीका लिहिली आणि ज्ञानदेवांनी भगवद्गीतेवर टीका लिहिली आहे.

श्रीमत् भागवताच्या अकराव्या स्कंधातील प्रत्येक अध्यायावर सविस्तर मराठी भाषेत ओवीबद्ध लिखाण केले असून ३१ अध्यायामध्ये एकूण १८,७८९ ओव्या आहेत. यामधील टीकेचे स्वरूप अत्यंत स्वच्छ व मधुर पाण्याच्या प्रवाहापणे भासत आहे. हा ग्रंथ अत्यंत रसाळ अशा भाषेत असून अनेक रूपके, उपमा, उत्प्रेक्षा व निरनिराळ्या व्यावहारिक दाखल्यातून त्यांनी याची योजना केली असल्याने हा ग्रंथ अत्यंत समृद्ध व सर्वांग परिपूर्ण झाला आहे. यातून नाथांना होणारी सामाजिक जाणीव, समाजातील अघोरी कृत्यांचा निषेध, प्रसंगांतून व्यक्त करून मूळ परमार्थाचे ज्ञान नाथांनी मांडले आहे. निर्व्याज प्रेम, भक्ती, ज्ञान, वैराग्य, समाधी इ. विषयांवर चिंतन मांडून सांस्कृतिक प्रबोधनाचे कार्य नाथांनी केले आहे. वेदांताचे अद्वैत तत्त्वज्ञान वैदिक परंपरेला अनुसरून, तात्कालीक समाजाचे निरीक्षण करून, समाजजीवनात भक्ती, ज्ञान, वैराग्याचे प्रेम शब्दगंगेतून प्रवाहरूपाने वाहताना दिसत आहे.

### भावार्थ रामायण

श्री एकनाथ महाराजांच्या जीवनातील ही शेवटची साहित्य संपदा! नाथांचे एक वैशिष्ट्य असे की, एखाद्या विषयाचे चिंतन सुरू झाले म्हणजे नाथांचे प्रतिक्षणी त्या विषयाचे चिंतनच असे. भावार्थ रामायण लिहिताना नाथांच्या जीवनातील हा उत्तर काळ होता. यामध्ये नाथ म्हणतात -

*उन्मेखेसी बोलिला आपण ।*
*भावार्थ रामायण चालवी वेगी.॥*

भारतीयांच्या जनमानसात, महाभारतातील 'कृष्ण' व रामायणातील

'राम' यांची स्थाने अत्यंत श्रेष्ठ-तम असल्याने त्यांच्या विचारातूनच व्यक्त झालेले चिंतन, जीवनचरित्रातील प्रसंग याच्या माध्यमांनी समाजात तळागाळातील लोकांपर्यंत हे स्फुरण नाथांनी मांडले आहे.

भावार्थ रामायण ही वाल्मिकी रामायणावरील टीका आहे. यामध्ये सुमारे चाळीस हजार ओव्या आहेत. त्यामध्ये शेवटचे ४४ अध्याय पर्यंतचे लिखाण नाथांनी केले असून, पुढील भाग नाथांकडे राहत असलेल्या गावबा याने पूर्ण केला आहे.

नाथकालीन समाजस्थिती जुल्मी होती. आचार-विचारांचे लोकांना स्वातंत्र्य नव्हते. धर्मांतरे घडत होती. समाज स्वाभिमान विसरला होता. तसेच समाज म्लानही झाला होता. या समाजाला जागृती यावी यासाठी नाथांनी रामाचे चरित्र सांगण्यास सुरुवात केली होती. भावार्थ रामायण हे मूळ वाल्मिकी रामायणाचे भाषांतर नाही तर रामायण कथेवर केलेली ही ओवीबद्ध रचना आहे. ही रचना आध्यात्मिक चिंतन, रूपकाने रामायणाच्या द्वारे अत्यंत ओजस्वी व रसाळ भाषेत मांडली आहे. यातूनच नाथांचे आध्यात्मिक व समाजप्रबोधनाचे कार्य दिसून येते.

नाथ महाराज हे भावार्थ रामायणात लिहीत असताना इतके तन्मय झाले की रामांनी शरयू नदीत प्रवेश केला त्याप्रमाणे भक्तीरसात तल्लीन झालेल्या नाथांनी गोदावरी नदीच्या कुशीत प्रवेश केला होता. सर्व काही शांत ! शांत ! शांत ! झाले...

**चतुःश्लोकी भागवत :**

गुरु आज्ञेने व गुरु सान्निध्यात नाथांनी केलेली ही पहिली साहित्य निर्मिती आहे. चतुःश्लोकी भागवत म्हणजे श्रीमत् भागवताच्या दुसऱ्या स्कंधाच्या नवव्या अध्यायावर केलेली टीका आहे. मूळ संहिताग्रंथातील या अध्यायात ४४ मंत्र आहेत तर नाथांनी यावर १०३६ ओव्यांमध्ये विवरण केले आहे.

यामध्ये ब्रह्मदेवांनी भगवंताला केलेल्या प्रार्थनेत आणि भगवंताच्या उपदेशात जे तत्त्वज्ञान सांगितले आहे ते सविस्तर ओवी रचनेत फुलविले आहे.

श्री नाथांनी प्रारंभी गणेश-शारदा-सदगुरुंना वंदन करून लेखनाला सुरुवात केली आहे. यामध्ये गुरुभक्ती व अभिजात विनम्रता दिसून येते. ओवी-ओवीतून गुरुभाव व्यक्त होत आहे. नाथ म्हणतात, "गुरुभाव हा खरं म्हणजे अनुभूतीचा विषय आहे."

ब्रह्मदेवांनी नारायणाची आराधना केली तर परब्रह्मरूपी नारायणाकडून 'तप' 'तप' हा प्रथम ध्वनी ऐकला. त्यानंतर तप साधना केल्यावर जे ज्ञान प्राप्त झाले त्या ज्ञानाचे वर्णन यामध्ये आले आहे. अभिजात संस्कृत भाषेतील ज्ञान त्या काळी फक्त पंडितांनाच होत असे, ते ज्ञान मराठी भाषेत आणून मराठी भाषेलाच जणू साज चढविला आहे. या प्रकरणात तप म्हणजे काय? तपाशिवाय, भगवतभक्तीशिवाय ज्ञानप्राप्ती होत नाही. चित्शुद्धी सद्भावपूर्वक असावी. मन निर्वासनारूप झाले पाहिजे. समाधी म्हणजे सम-साम्यतावृत्ती असे सांगत आहेत. नाममहिमेतील स्वानंदास्थिती सांगितली आहे. तसेच माया म्हणजे काय? तिची लक्षणे, छाया व मायेचे साम्य याचे सुंदर विवेचन या प्रकरणात दिले आहे. भगवत् भक्तीने परमात्मा प्राप्त होतो हे अंतरीचे गुह्य-ज्ञान नाथ सांगत आहेत. त्याबरोबरच गुरु-शिष्य यांचा संबंध सांगितला आहे. कसा तर -

*जेवी दोन्ही दीप एक होती ।*
*तेथे प्रकाशे प्रबळदीप्ती ॥*

नारदांनी हे ज्ञान उपदेश रूपाने व्यासांना दिले आहे. नाथ या प्रकरणात स्वानंदात रमलेले दिसत आहेत व असे विचार व्यक्त झालेत की,

*माझे हेचि मनोगत । संतुष्ट व्हावे साधुसंत ।*
*यालागी श्री भागवत । आरंभिला ग्रंथ भावार्थेसि ॥ ५३२ ॥*
*ऐकोनिया वचनासि । साच देखोनि सद्भावासी ।*
*अतिसंतोष सज्जनांसी । रिझोनि ग्रंथार्थेसी बोलते जाले ॥५३३॥*

**हस्तामलक**

नाथांचीही ओवीबद्ध रचना. यात शंकराचार्यांच्या मूळ १४ श्लोकांचे विवरण ६७४ ओव्यांत केलेले आहे. नाथांनी यातीलही गुह्य ज्ञान जनसामान्यांपर्यंत पोहोचविले आहे.

या प्रकरणाचा विषय असा आहे की, एका ब्राह्मणास एक पुत्र झाला होता. तो जेव्हा जन्माला आला, तेव्हा तो रडला नाही. हसला नाही. केवळ लौकिकदृष्ट्या हा मुलगा मूढ वाटावा अशीच सर्व लक्षणे होती. मुलगा पुढे मोठा झाला तरी त्याच्या ठिकाणी सुख-दुःख, आनंद इ. कोणताही विकार संभवत नव्हता. माता-पित्यांनाही याचे ज्ञान नसल्याने ते फार दुःखी होते. मोठ्या आशेने त्यांची मुंज केली. परंतु आत्मरूपी क्रीडेत मुलगा आत्मरत झालेला होता.

एकदा आद्य शंकराचार्य या मुलाच्या वडिलांचे घरी आले होते. शंकराचार्यांना पाहून मुलाला भरते आले. कसे तर,

*साच आणि मवाळ । मितले आणि रसाळ ।*
*शद्ध जैसे कल्लोळ । अमृताचे ॥*

आजपर्यंत मौनात असलेला मुलगा दृष्टादृष्टीनी त्याच्या अंतरीचा ज्ञाननिधी उचंबळून आला होता. या पूर्णज्ञानी पुत्राची ओळख माता-पित्यांना व्हावी म्हणून आचार्यांनी मुलाला बोलते करण्याकरिता प्रश्न विचारला -

*करतळा मलक, प्रकाशीज्ञान । या लागी तेचि अभिधान ।*
*हस्तामलक जाण । या हेतुने म्हणती ॥ ६३ ॥*
*तू कैचा? कोणाचा? कोठील? कोण? । काय नाम? कोण*
*वर्ण? । तुझे कोठुनि आगमन? । पुढारे गमन तुज कोठे?*

यामुळे अत्यंत आनंदानी या ज्ञानरूपी पुत्राला भरती आली आणि हा मुलगा म्हणतो,

*नाहं मनुष्यो नच देवयक्षौ ।*
*न ब्राह्मणक्षत्रियवैश्य शूद्राः ।*
*न ब्रह्मचारी न गृही वनस्थो ।*
*भिक्षुर्नचाहं निजबोधरूपः ॥ २ ॥ मूळसंस्कृत (श्लोक)*

तो मुलगा म्हणतो - मी मनुष्य, देव, यक्ष, चारीवर्णाचा, चारी

आश्रमाचा नसून सकळसृष्टी कर्ता आत्मा आहे. आत्माबोध हेच माझे स्वरूप आहे. आत्मा नित्य, शुद्ध, बुद्ध, नित्यमुक्त आहे. त्यासाठी त्याने निजबोधाची लक्षणे सांगितली आहेत.

हस्तामलक म्हणजे काय? तर तळहातावर ठेवलेला आवळा जसा पाहता येतो, तसे अतर्क्य 'ज्ञान' त्या मुलाने सांगितले म्हणून त्याला हस्तामलक नाव मिळाले आहे.

यासाठी ज्ञानदेवाच्या हरिपाठातील

*कर तळी आवळे तैसा हरी ॥*

याची आठवण होते.

यापुढे नाथांनी हस्तामलकने जे निजबोधाचे वर्णन केले होते ते सहजसुलभ भाषेत मांडले आहे. आत्म्यावर सूर्याच्या दृष्टांतांचे निरूपण करून आत्मा केवळ निष्कलंकीत कसा आहे हे मांडले आहे. देही असून आत्मा विदेही कसा आहे हे ब्रह्मज्ञान बालकाने सांगितल्याने आचार्यांनाही परमानंद झाला होता.

आत्मा व शरीर इंद्रियसंबंध सांगून, आत्मा यामध्ये असंगी कसा आहे हे जाणणे आवश्यक आहे. जे लोक हे जाणत नाहीत त्यामुळे ते दु:खी होतात. यासाठी आरसा, रविकिरण यांचा दृष्टांत देऊन आत्मा केवळ सच्चिदानंदस्वरूप स्वयंप्रकाशित कसा आहे हे सांगत आहेत. जे विषयासक्त, अज्ञानी असतात त्यांना हे आत्मदर्शन होत नाही. यासाठी नाथ महाराज चित्तशुद्धीची आवश्यकता सांगत आहेत. सद्गुरुंचे लक्षण सांगून सद्गुरु हे देहबुद्धीने पाहू नये. सद्गुरुवाचून सर्व साधने व्यर्थ आहेत. कारण असे की, सद्गुरु शिष्याला कर्मबंधनात टाकीत नाहीत व मनुष्याच्या कर्माचा भ्रम दूर करतात. परंतु आत्मानुभव सहजसाध्य नाही. यासाठी सर्वांभूती विनम्रता व समबुद्धी असणे आवश्यक आहे. हे एकदा घडले की हे जीवात्मे देहात राहून लोकोद्धारासाठी मुक्तपणे वावरत असतात.

नाथ म्हणतात -

हे आत्मज्ञानी महात्मे नित्यमुक्त कसे असतात

तर - *एवं ज्ञानियांच्या ठायी । जन्ममृत्यूची वार्ता नाही ।*
*हे श्रुत्यर्थें ठेविले ठायी । वर्तता देही नित्यमुक्त ॥ ३७२ ॥*

अशा प्रकारे मुक्ताची लक्षणे आहेत.

आत्म्याचा अलिप्तपणा सांगताना व आत्म्याचे सर्वश्रेष्ठत्व सांगताना नाथ म्हणतात -

*सूर्य उदयो अस्तूचा आवर्ती । त्यासी आत्मा न म्हणे श्रुती ।*
*जो सूर्याचे गतीची गती । तो निश्चिती जगदात्मा ॥*

त्यामुळे आत्मा हा पापपुण्यापासून अलिप्त आहे. तो सर्व व्यापी आहे. त्यामुळे मुक्ती ही त्याची अवस्था आहे. ब्रह्मज्ञान हीही शब्दातीत स्थिती आहे. तसेच आत्मा आकाशाप्रमाणे निर्लेप आहे व शेवटी परमार्थ व प्रपंचाचे संबंधाचे स्पष्टीकरण केले आहे. याबाबत नाथ म्हणतात -

*प्रपंच तो उपाधीकृत । उपाधीकत्वे मिथ्याभूत ।*
*ब्रह्मपूर्णत्वे नित्य सत्य । स्फटिक दृष्टांतु तदर्थी दावी ॥ ५८० ॥*

शेवटी नाथांनी चौदा श्लोकांचे महत्त्व सांगितले आहे.

*हे चौदा श्लोक जाण । चौदा विद्यांचे निजजीवन ।*
*जीवी जीवा समाधान । ते हे निरुपण हस्तामलक ॥ ६३७ ॥*

त्यानंतर हस्तामलक हा आचार्यांबरोबर गेला होता हे सांगून नाथांनी या प्रकरणात आचार्यांची गुरुपरंपरा, दहा आचार्य, चार दिशांचे आचार्यांचे मठ व तेथील मठाधिपती सांगून शेवटी नाथ म्हणाले,

*पूर्णत्वाचे पूर्णपण । सद्गुरुचेचि चरण । एका जनार्दना शरण ॥ एकपण नुरऊनी ॥ ६७४ ॥*

**शुकाष्टक**

नाथांचे हे प्रकरण ४४७ ओव्यांचे आहे. आद्य शंकराचार्यांच्या स्तोत्रापैकी हे एक अष्टक आहे. या प्रत्येक श्लोकाचा शेवटचा चरण - *'निस्त्रैगुण्ये पथि विचरता को विधी : को निषेध : ॥'*

असा आहे.

नाथ प्रथम याबाबत म्हणतात -

*ते अपूर्व शुकोच्छिष्ट । फळ देखिले श्रेष्ठ । जे नित्यतेसी अवीट ते शुक सेवी ॥ १०॥ ते शुकमुखीचे अष्टक । जे गुह्यज्ञान निष्टंक । वदवीतसे व्यापक । जनार्दन वाचे ॥ ११ ॥*

शुकाचार्य महाराज आपल्या आनंदस्थितीत आहेत. त्या आनंद स्थितीत विधी किंवा निषेधांचे कोणतेही बंधन नाही. आचार्यांनी शुकाचार्यांच्या निमित्ताने अध्यात्मज्ञान जे या अष्टकात सांगितले, तेच ज्ञान नाथांनी रसाळवाणीने व शब्द गंगेच्या प्रवाहात आलेले आहे. स्वप्रकाशी आत्मा हा त्रिगुणरहित व विधीनिषेधातीत असतो हे या अष्टकाचे सूत्र आहे. ते या ठिकाणी सांगितले आहे. त्यामुळे आत्मस्वरूपात रमलेल्या महात्म्याला विधीनिषेधाची बाधा होत नाही. तो आत्मा सदैव निरंतर नित्ययुक्त आनंदरूपात असतो.

या प्रकरणात नाथांनी अष्टकाचा एक संस्कृत श्लोक दिला आहे व त्यावर विवरण व ओवीबद्ध निरूपण केले आहे. सोने व सोन्याचे अलंकार यात सोने म्हणून जसे नाते आहे आणि अलंकार मोडल्यावर फक्त सोने राहते म्हणजे अलंकाराचे नाम व रूप संपून जाते तसे, परमात्म्याचे व आत्म्याचे नाते आहे. शरीर व नाम हे रूप व नाम आहे ते देहाचे आहे व देह पडला की आत्मा परमात्मा एक आहे. अशा निरनिराळ्या उदाहरणांनी सांगितले आहे. सर्वांच्याअभ्यंतरी एकच आत्मा आहे हे सांगत आहेत. तसेच नद्या भेदरूपाने जरी असल्या तरी शेवटी त्या सर्व समुद्राला मिळतात. मग भेदरूपाने असलेले नदीचे अस्तित्व संपून जाते. यामध्ये विश्वाची समरसता सिद्ध झाली आहे. अशाला कोणता विधी व कोणता निषेध सांगावा, कारण त्यांची (आत्मरूप झालेल्यांची) बुद्धीही ब्रह्मरूप झालेली असते. जोपर्यंत मनुष्य मायेच्या त्रिगुणाच्या कक्षेत आहे तोपर्यंत विश्वात्मैक्याचे सम्यक् ज्ञान बुद्धीत मुरत नाही. मनुष्य निस्त्रैगुण्याच्या मार्गावर आपोआप जेव्हा येतो तेव्हा तो त्रिगुणाच्या पलीकडे असतो. त्या वेळी त्याला विधी-निषेधाची जरुरी नसते. जे विषयासक्त असतात त्यांचेसाठी विधीनिषेधाची बंधने आहेत.

शेवटी नाथ म्हणतात -

*एका जनार्दनी । की जनार्दन एकपणी ।*

*सागरी जैसे पाणी । तरंग जाले ॥ ४४४ ॥*

**स्वात्मबोध**

या प्रकरणाला स्वात्मसुख असेही म्हणतात. हे प्रकरण ५११ ओव्यांचे आहे. यामध्ये सद्गुरु भजनाचा महिमा सांगितला आहे. साधकाचा गुरुबाबत अनन्य भक्तिभाव होणे आवश्यक आहे. यामध्ये नाथांचे भाष्य खरोखर अर्थपूर्ण व अनुभवाच्या मुशीतून प्रकट झालेले दिसून येत आहे. यामध्ये आत्मसाधना, सद्गुरुसेवा, समाधी याविषयीची चर्चा आहे.

या प्रकरणाचे लिखाण कशाकरता केले याबाबत नाथ म्हणतात - *जे आपुली स्वरूपस्थिती । ते वानावी अभिनव कीर्ति । जेणे संतसज्जन होती । संतुष्ट सदा ॥ ११ ॥* म्हणजे यामध्ये संत, महात्मे स्वात्मस्वरूपाविषयी जे जे सांगत आहेत ते नाथ यामध्ये सांगत आहेत. प्रथम सद्रूपाची उपपत्ती सांगून स्वस्वरूपाच्या प्राप्तीचे उपाय सांगितले आहेत. यासर्वात मूळ अधिष्ठान हे सद्गुरु कृपेचे आहे, हे नाथ सांगत आहेत. साधक जीवनात गुरुकृपेचे सामर्थ्य असते. एकदा का या स्वरूपाची गोडी लागली की, कशातही गोडी वाटेनाशी होते आणि कळिकाळसुद्धा गुरुचा दास होतो. त्यावर गुरुकृपेमुळे मायेचा प्रभाव लटिका होतो आणि असाध्य अशा सर्व गोष्टी साध्य होतात.

अभिमान अहंकार याने मनुष्याचा विकास खुंटून जातो व स्वस्वरूप पूर्णपणे विसरून जाते. यासाठी ज्ञानी, महात्मे, साधक ज्ञानप्राप्तीनंतरही प्रारब्धभोग हा देहाने भोगत असतात. यामध्ये नाथांची एक वैशिष्ट्यपूर्ण ओवी आहे.

*यालागी समाधी आणि व्युत्थान । या दोहोंचे लक्षण ।*
*अपक्वासीचि घडे जाण । पूर्णासी नाही ॥ ३०० ॥*

जे लोक पूर्णत्वाला पोहोचले त्यांना समाधी आणि व्युत्थान हे संभवत नाही. तर ते नित्यमुक्त अवस्थेत रममाण झालेले असतात. अशा लोकांचे वर्णन, परिपूर्ण पुरुषोत्तमाचे वर्णन आहे. तपसाधनेने अगाध सामर्थ्य निर्माण झालेले असते.

नाथ मायेकडे मोठ्या व्यापक दृष्टीने पाहत म्हणतात -

*माया ब्रह्म राखे गुप्तता । यालागी आवडे समतां ।*
*मुमुक्षु अति अवस्था । वैराग्यता श्रद्धाळू ॥ ३३४ ॥*

नाथांना मायेचे लक्षण असे वाटले तरी ते उपकारक वाटत आहे. पुढे असे होते की, हे मुक्त असलेले आत्मे इतरांनाही मुक्त करीत नाहीत, म्हणजे त्यांचा हा अभिमान नसून, त्यांना सर्व चराचरच स्वतःप्रमाणे मुक्त भासत असते.

परंतु हे सर्व मनुष्याला अविद्येचा निरास झाल्यानंतरच होत असते. यासाठी स्वात्मसुखाचे महत्त्व असून ते सद्गुरुकृपेने प्राप्त होते. यासाठी सद्गुरुचे सामर्थ्य नाथांनी सांगितले आहे. यासाठी सर्व साधकांनी साधना स्वात्मसुखार्थ कराव्यात. यासाठी शुद्धभाव असणे आवश्यक आहे. तो कसा तर ३२ ते ४७ ओव्यांत सांगितला आहे.

*मृदू तिख आणि पिपळी । ती नावे एक चापेकळी ।*
*तेवी सच्चिदानंद बोली । वस्तु एकली एकत्व ॥ ३३ ॥*

या जगात सर्वत्र एकात्म दृष्टीने पाहणे, अनुभवणे याला आत्मसाधना असे नाथ म्हणतात. एकात्मदृष्टी वृत्ती ही अखंड राहिली पाहिजे यासाठी सद्गुरुसेवा ही साधना आहे. समाधी ही तादात्म्यतेची अवस्था आहे. शरीर निश्चेष्टत करणे, तटस्थ राहणे याला समाधी म्हणता येणार नाही. कारण सृष्टीत झाडे, खडक, माणसाची मूर्च्छा याला समाधी म्हणावे लागेल, परंतु तसे घडत नाही. यासाठी मनुष्याच्या सर्व क्रिया जरी घडत राहिल्या तरी सर्व काळी सर्वदेशी एक अखंड-परब्रह्म स्थिती ही अवस्था आहे. याला नाथ समाधी असे म्हणतात. ही स्वसंवेद्य अशी अवस्था आहे. अशा प्रकारे अत्यंत सुंदर वर्णन केले आहे.

**चिरंजीव पद**

नाथांचे हे ४२ ओव्यांचे छोटे प्रकरण आहे. साधकांनी चिरंजीवपद प्राप्त करून घ्यावे यासाठी या प्रकरणात उपाय सांगितले आहेत. याबाबत म्हणतात -

*हे बोल माझिया मतीचे । नव्हेति गा साचे । कृष्णे सांगितले उद्धवहिताचे । मी साच ते बोलिलो ॥ ४० ॥*

चिर म्हणजे निरंतर - कायम - दीर्घ, अजीव आत्मरूप होणे, पद म्हणजे स्थान जागा. म्हणजे चिर् + (अन्) जीव + पद = चिरंजीव पद अशी शब्दफोड पाहिली तर आत्मरूप जीवानी राहणे. स्थान कोणते? व ते कसे प्राप्त होईल? हे रुढार्थ नाथ सांगत आहेत. (पुत्र - दर्शक - आशीर्वचनपर) पेक्षा भिन्न अर्थाने नाथ यामध्ये मार्गदर्शन करीत आहेत.

श्रीकृष्णाने उद्धवाला केलेल्या उपदेशानुसार जे नाथांना चिरंजीवपदाबद्दल वाटले ते नाथांनी यामध्ये सांगितले आहे.

नाथ या प्रकरणात म्हणतात - साधकांना आत्तापर्यंत झालेल्या कर्माचा अनुताप झाला पाहिजे. मनुष्याचा मृत्यू सदैव जवळ आहे हे जाणणे आवश्यक आहे. नरदेह दुर्लभ आहे व त्याचे देहसुख अत्यल्प आहे. यासाठी परमार्थ साधना करून वैराग्य सहजपणे अंगी बाणले पाहिजे. यासाठी वैराग्याचे सत्त्व, रज, तम हे तीन प्रकार नाथांनी सांगितले आहेत. साधकांनी सत्त्वशील वैराग्याचा अंगीकार करून त्यासाठी प्रीति धरावी. पंचविषयामध्ये मनुष्याने सावध राहावे. मानपान, कीर्ति, रसविषयात, गंधविषयात गुंतू नये. शुद्ध परमार्थाचे ज्ञान करून घ्यावे म्हणजे काय होते तर, *अखंड एकांती बैसणे । प्रमदासंगे न राहाणे । जो निःसंगे निराभिमाने । त्याचे बैसणे सर्वदा ॥ ३६ ॥* हे चिरंजीवपद आहे. अखंड एकांती बसून, ईश्वराचे ध्यान करावे. वैराग्याचे मूळ ज्ञान ज्यांना होते ते कृष्णचरणी राहत असतात. कृष्णचरण हेच चिरंजीवपद आहे. यासाठी नाथ म्हणतात -

*साधावया वैराग्यज्ञान । मनुष्यदेही करावा प्रयत्न ।*
*सांगे एका जनार्दन । आणिक प्रयत्न असेना ॥ ४२ ॥*

**आनंदलहरी**

नाथ महाराजांचे हे प्रकरण १५४ ओव्यांचे आहे. या प्रकरणात नाथ महाराज स्वानंदाच्या पूर्ण अवस्थेचे वर्णन करीत आहेत. प्रथम चरणात नाथ महाराजांनी सद्गुरु महिमा सांगितला आहे.

यामध्ये नाथ म्हणतात -

*तुझे निज रूप पाहता काही । बद्धमुक्त दोन्ही नाही । व्यापक तू सर्वदेही । आनंद डोही जेवी तरंग ॥ ८ ॥ बंधमुक्तीची कहाणी । ऐकिली होती जेवी स्वप्नी । जागृती माजी येवूनी । सांच मनी कोण ती ते ॥ ९ ॥*

जीवाला स्वर्ग व नरक हे दोनही बंधनाकारण आहेत. सगुण व निर्गुण हे दोन्हीही भ्रम आहेत. या भ्रमांच्या अज्ञानाचा निरास सद्गुरुकृपेनेच होत असतो. एकदा ही सद्गुरुकृपा झाली, पुरुषोत्तमाचे नाम मनोभावे बसले की, भवभयाचे सर्व व्यवहार संपून जातात. म्हणजे जो सद्गुरुंच्या चरणांचा आश्रित आहे तो कधीही बद्ध होत नाही. परंतु तसे प्रत्यक्ष दिसतही नाही कारण ही सर्व मायेची करणी आहे. सद्गुरु भक्ताला माया मृगजळवत् भासत असते. या मायेचा मालक तो आदिनारायण आहे. हे जाणून सद्गुरुकृपेने मनाचे मनपण विरून जाणे आवश्यक आहे. हे होण्यासाठी पुण्यसंपत्तीच्या योगाने गुरुभजनाची गोडी लागते. मग या गोडीत रमल्यावर, मुरल्यावर, सद्गुरु शरणांगताला इतर योगयोगादी साधनांची आवश्यकता उरत नाही. भगवंतांनी वेळोवेळी अवतार घेतले व तेही सद्गुरुंना शरण गेले आहेत. यासाठी नामदेवांचे उदाहरण प्रसिद्ध आहे. असे हे गुरुस्वरूप अनादि, अनंत, ओंकाररूप, निरुपाधिक व अखंड तेजोमय असे अगम्य आहे. नाथांनी यामध्ये बंध, मोक्ष, सगुण, निर्गुण, स्वर्ग-नरक, माया, प्रारब्ध, संचित इत्यादी विषयांवर सूक्ष्म चिंतन केले आहे. साधकांनी जन्म-मरणाच्या फेऱ्यांतून सुटावे व मोक्षाचे अधिकारी व्हावे असा नाथ संदेश देत आहेत. त्यामध्ये एक सिद्धांत नाथ मांडत आहेत. :

*तैसे सद्गुरु कृपेवीण । पावले मोक्षाचे सदन ।*
*भूत भविष्य वर्तमान । ऐकिले नाही जनी कोठे ॥ ११८ ॥*

याप्रकारे नाथ हे आत्मनुभूतीने आनंदलहरींवर देहभान विसरले होते. आनंदाच्या अनुबंधनातून अशी मृदूमुलायम शब्दगंगा प्रवाहीत झाली आहे. तीहि करुण कोमलांगी आनंदलहरी आहे.

## अनुभवानंद

या प्रकरणाला अनुभवामृत असेही म्हणतात. हे प्रकरण ३० ओव्यांचे आहे. श्री ज्ञानदेवांच्या अनुभवामृतातील पहिल्या पाच संस्कृत श्लोकांवरील हे ओवीरूप निरुपण आहे.

नाथ महाराज प्रथम श्लोकांवर सांगतात की, सद्गुरु निवृत्तीनाथ कसे आहेत तर, *केवलानंद स्वयंज्योती । शब्द नव्हे त्याची व्यक्ती । नाशरहित सर्व भूती । श्रुती वदती* ॥ २ ॥ यासाठी सद्गुरुंना शरण जावे, म्हणजे स्वयंज्योती स्वरूप ज्ञानप्राप्ती होते.

दुसऱ्या श्लोकावर नाथ म्हणतात - *वृत्त्यानुभवे निवृत्ती । वृत्तीस कवण उपपत्ती । विषय ज्ञाने वृत्ति । येर निवृत्ती सर्वही ॥ ६ ॥* मनुष्याने जीवनातील अनुभवांनी तरी प्रवृत्ती ही निवृत्तीकडे वळविणे आवश्यक आहे. याचा उपदेश नाथ करीत आहेत. येथे विद्येवाचून गुरुला गुरुत्व नाही, म्हणून जी विद्यारूप वस्तू आहे तीच गुरु आहे. म्हणजेच 'हे ज्ञान तेच आत्मवस्तू' हे जाणणे ती निवृत्ती होय.

तिसऱ्या श्लोकांवर नाथ म्हणतात - *पिंड ब्रह्मांड याचे रूप । दृश्यादृश्य हेचि अमूप । यासि जाणता ज्ञानप्रताप । हरे सर्व सर्वापरी* ॥ १७ ॥ या जगात चेतन अचेतन एकरूप असून यात द्वैतरूपता नाही. हा खरा या ज्ञानाचा प्रताप आहे.

चवथ्या श्लोकावर नाथ म्हणतात - *अमृत म्हणजे मोक्ष । तयाचा अनुभव प्रत्यक्ष । साक्षात्कार अपरोक्ष । अर्थ जाणित्या पाविजे* ॥ २३ ॥ या मूळ प्रकृतीचे व पुरुषांचे तात्त्विक स्वरूपाचे यथार्थ ज्ञान व्हावे यासाठी मोक्ष कसा आहे व प्रत्यक्ष अनुभव कसा आहे, तर साक्षात्कार हा अपरोक्ष असतो. यासाठी अद्वैत रूपाच्या अर्थाची अनुभूती घेता आली पाहिजे.

पाचव्या श्लोकावर नाथ म्हणतात - *आदिमध्यांतरहित गुरु । तेथ मना नव्हे अधिकारू । म्हणौनी आदिमध्यांत निवृत्येश्वरु । अद्वयत्वे वंदिला* ॥ २७ ॥ जे सृष्टीच्या आदि, मध्य व अंती असून ते अद्वयत्व आहे. हे सांगण्यासाठी हे अनुभवण्यासाठी गुरुशिवाय कळणार नाही. हे शिवशक्तीचे कार्य कसे चालले आहे. हे सद्गुरु निवृत्तीनाथ ईश्वरामुळे सहज प्राप्त झाले आहे.

## आनंदानुभव

नाथांचे हे प्रकरण २४१ ओव्यांचे आहे. हा एक गुरु-शिष्यांचा संवाद आहे. गुरुंनी शिष्याला केलेला उपदेश म्हणजे शिष्याने सर्वच ब्रह्मरूपाने कसे पाहावे हे सांगितले आहे.

नाथ म्हणतात - *मी जीव किंवा शिव । उभया माजि मी न जाणे सोय । म्हणौनि मज दावा निश्चत । जे मी कोण असे* ॥ ५ ॥ शिष्याच्या या प्रश्नाला श्रीगुरु उत्तर देत आहेत. असे अध्यात्याचे गुप्त ज्ञान चैतन्य धनस्वरूप गुरु शिष्याला देत आहेत. येथे विवेक उजळून निघतो, अनुभव संपतो आणि -

*ब्रह्मसागरीचा तरंग । ते हे जाणीजे जग ।*
*जगपणा सांडिता सर्वांग । ब्रह्मचि असे ॥ २२८ ॥*
*ब्रह्मसागरीचा तरंग । तू आपणीया भावो जग ।*
*ब्रह्म सागरचि सर्वांग । होवोनी असे ॥ २२९ ॥*

नाथ महाराज शिष्याला रूपकाद्वारे आनंदाचा अनुभव कसा आहे हे ते सांगत आहेत. ब्रह्मभाव म्हणजे मनुष्याच्या बुद्धीत सर्वांभूती ब्रह्म असल्याच्या ज्ञानाने सर्वांशी समत्वाने वागण्याची सिद्धता आहे. ब्रह्माला जात नाही, वर्ग नाही, आश्रम नाही, रूप नाही, पाणी व लाटांचे अभिन्न स्वरूप तेच खरे ब्रह्म. पंचमहाभूतांची घडामोडी ती माया आहे. हवेहवेसे वाटणे तो हव्यास व मोह आहे हे सारे घट, आकाश व मठाकाशाची उदाहरणे देवून आनंदाचा अनुभव म्हणजे ब्रह्मभाव स्थित राहणे, हे सूत्र नाथ सांगत आहेत.

नाथांना याची अनुभूती आली आहे म्हणून नाथ काय करतात तर, *सेवितो हा रस वाटितो आणिका । घ्यारे होवू नका रे रानभरे॥*

याप्रमाणे आनंद अनुभवाचा रस सर्वांना नाथ वाटत आहेत. याचा आस्वाद प्रत्यक्ष वाचनाने-मनाने घ्यावा असे वाटते.

## रुक्मिणी स्वयंवर

श्रीमत् भागवताच्या दशमस्कंधातील अध्याय ५२, ५३ व ५४ यातील रुक्मिणी स्वयंवराचे आख्यान आले आहे. नाथ काशीक्षेत्रात असताना सुमारे १६०० ओव्यांचा हा ग्रंथ त्यांनी लिहिला होता. चैत्रमासात रामनवमीचा योग साधून ही रचना पूर्ण केली होती.

याबाबत नाथ म्हणतात -

*नाही ग्रंथारंभ संकल्प । नव्हता श्रोतयांचा आक्षेप ।*
*ग्रंथी उजळला कृष्णदीप । सुखरूप हरिकथा ॥ ६१ ॥*

हा ग्रंथ लिहावा असा कोणताही संकल्प नव्हता. तसेच श्रोत्यांकडून काही अपेक्षा (सूचना) नव्हती. केवळ कृष्णभक्तीचे हे फळ आहे.

हा ग्रंथ अत्यंत सुंदर असून विवाह सोहळा पूर्णपणे विदीत केला आहे. रुसवा-फुगवा, हळद लावणे, कृष्णाची पूजा करणे, रुखवत, तेलफळ, मधुपर्क, लग्नकंकण, सूनमुख इत्यादिचे अत्यंत मनोहर असे वर्णन केले आहे. त्यामुळे ते वाचत असताना सर्व सोहळा डोळ्यांसमोर जसा-तसा येत असतो.

या ग्रंथात एकूण १८ प्रसंग आहेत. पाच युद्धाचे प्रसंग, पाच लग्नसमारंभाचे, तर उरलेले आठ म्हणजे १) कृष्ण व रुक्मिणी जन्म २) रुक्मी (रुक्मिणीचा भाऊ) कृष्णांची निंदा करतो ३) सुदेव हे द्वारकेत जातात ४) सुदेव कृष्णाला रुक्मिणीचे पत्र देतात ५) सुदेव व कृष्ण कुंडिनपूरकडे रवाना ६) कृष्णाचे कुंडिनपूरच्या नागरिकांना दर्शन ७) रुक्मिणीच्या सौंदर्याचे वर्णन ८) कृष्णाने रुक्मिची विटंबना केल्यामुळे बळीरामाने कृष्णाला दिलेला दोष - रुक्मिणीची कृष्णभक्ती असा सर्व भागांचा यात समावेश आहे. ही स्थूलमानाने या ग्रंथाची विभागणी आहे.

या ग्रंथातील नाथांचे वैशिष्ट्य म्हणजे प्रत्येक गोष्टीला नाथांनी आध्यात्मिक रंग दिला आहे. उदा. भीष्मक हा मूर्तिमंत विवेक आहे तर पत्नी शुद्धमती ही 'श्रद्धा', रुक्मिणीचा गर्भवास म्हणजे नवविधा भक्ती, पाच विषय हे तिचे बंधू आहेत. त्यानंतर भक्तीरूपी रुक्मिणीचा जन्म आहे. साधकांनी पंचविषयांवर मात केल्याशिवाय स्वर भक्तीचे रूप जाणता येत नाही.

शेवटी प्र. १८ ओवी ७२ मध्ये नाथ विचार व्यक्त करतात की -

*ये ग्रंथींचे निरुपण । जीव-शिवा होतसे लग्न ॥*

यामध्ये परमात्मा कृष्ण हा शिव आहे तर रुक्मीणी ही जीव आहे. जीवाला शिवाच्या मीलनाची अपेक्षा आहे.

अशा प्रकारच्या संपूर्ण सूक्ष्म छटांच्या रंगांतून आध्यात्मिक रंगांची उधळण नाथांनी या ग्रंथातून केल्याचे आढळून येत आहे.

## समारोप

सामान्यपणे तत्त्वज्ञान मांडावयाला-सांगावयाला कदाचित् सोपा जाईल, ऐकावयाला गोड वाटेल परंतु ते ज्ञान बुद्धीत मनात मुरले पाहिजे. हे ज्ञान रोजच्या आचरणातून व्यक्त होण्यासाठी बलिष्ठ अशी तन्मय अवस्था नाथांची झाली होती. गुरुगृही राहून नाथांनी उपनिषदे, गीता, श्रीमत् भागवत, योगवासिष्ठ, पूर्वमीमांसा, आध्यात्मशास्त्राचे ग्रंथ, महाभारत, रामायण, पुराणे यांचा अभ्यास केला होता. हे सर्व जगरहाटीप्रमाणे नाथांनी केले असले तरी, ते निरीक्षण व चिंतन करीत एकनाथांनी केले आहे, हे त्यांच्या या ग्रंथसंपदेवरून दिसून येते.

नाथांनी सर्व साहित्यांतून मानवी जीवनाचे साध्य काय आहे, याचा सर्वांगाने विचार केलेला आहे. अत्यंत सूक्ष्म असे चिंतन प्रत्येक प्रकरणांतून व्यक्त होत आहे. नाथांनी वैदिक परंपरेतील अद्वैत ज्ञानाची पखरण सर्व साहित्यातून केली आहे. परमार्थ साधनेतच मनुष्याचे मन असणे आवश्यक आहे. मन निर्विकल्प होणे आवश्यक आहे. यासाठी साहित्यद्वारा मनुष्याला मार्गदर्शन करीत आहे व मनुष्याला जीवन जगण्याचा मार्ग नाथ सांगत आहेत. भक्ती ही स्वतः करावयाची गोष्ट आहे. मनातील संकोच-विकल्प-विकारांचे कंगोरे नाथांनी अत्यंत मुलायमपणे दूर केले आहेत. या सर्व साहित्यातून अपूर्व असे तेजोवलय विलसत आहे. अभिजात संस्कृतातील ज्ञान जे पंडितांपुरते मर्यादित होते, ते ज्ञान नाथांनी मराठीत आणून जणू मराठी भाषेलाच स्वानंदरसाचा साज चढविला आहे. त्यामुळे या सर्व साहित्याला आगळे-वेगळे तेजोवलय प्राप्त झाले आहे.

## उपदेश नवनीत

एकनाथ महाराजांच्या सर्व साहित्यांतून व्यक्त होणारा उपदेश हे नाथांच्या **'साहित्यांचे उपदेश नवनीत'** आहे. ते फक्त आपल्यापुढे मांडीत आहे.

मनुष्याने अत्यंत नीतिसंपन्न आचरण ठेवावे. परमेश्वर सर्व शक्तीमान म्हणून जर आपण प्रेम करणार असू तर प्रथम सर्वत्र दिसणाऱ्या मानव सृष्टीवर प्रेम करावे. तरच तो परमात्मा-परमात्मा तत्व हे तुमचे तारक साधन घडेल. प्रत्येकाने निर्व्याज, निर्हेतुक कर्मे करावीत.

तसेच ज्याप्रमाणे सागराला नदी वा पाण्याचा थेंब मिसळतो व आपले अस्तित्व संपवितो त्याप्रमाणे सर्व व्यक्ताचे, रूपाचे-आकाराचे अस्तित्व संपणार आहे, हे लक्षात ठेवावे.

मनुष्याने प्रपंच करावा. ते सृष्टीकर्त्याचे कार्य म्हणून करावा. पण त्यांत गुंतू नये. हे सारं एका विश्वात्मक परमेश्वराचे लेणं आहे. हे पाहावयाला शिकले पाहिजे. प्रपंच व प्रपंचासंबंधी सर्व संपदा ही त्याची आहे. तुम्ही एक त्याचे विश्वस्त आहात हे जाणावे. कमलाप्रमाणे पाण्यात राहून पाण्याला स्पर्श करीत नाही त्याप्रमाणे प्रपंच करावयास शिकावे.

माणसा-माणसांचा द्वेष करू नये. मानव देह हेच खरे म्हणजे परमेश्वराचे मंदिर आहे ही दृष्टी ठेवणे आवश्यक आहे. मनुष्यमात्रांवर सर्वत्र समत्वभावाची दृष्टी ठेवून प्रेम करावे. स्पृशास्पृश्य भाव टाकून द्यावा. संत सज्जनांचा आदर करावा. इतरांवर निरपेक्ष दया करावी. सदैव आध्यात्माच्या पातळीवर विवेकाने राहण्याचा प्रयत्न करावा. *'सगुण चरित्रे परमपवित्रे सादर वर्णावी । सज्जन वृंदे मनोभावे आधी वंदावी ॥'* याप्रमाणे सदैव चिंतन करावे. मनन करावे. अखंड नाम घ्यावे. विहित धर्माचरण करावे. सद्गुरुंच्या कार्याला मदत करावी.

आपली उन्नती आपण करून घ्यावी. निदिध्यासात धुंद व्हावे व उत्कट भाव भक्तीप्रेमात मन ठेवावे. यासाठी शुद्ध चिंतन व आचाराची गरज आहे. याचा सदैव समतोल राखावा तसेच वास्तवाचे भान ईश्वरसाक्षीने ठेवावे.

---

तळटीप :

१) ज्या कोणाला यात जी स्फुट प्रकरणे दिली आहेत व ती पाहावयाची असतील त्यांनी 'मे. यशवंत प्रकाशन' सदाशिव पेठ, पुणे ३०. यांचे श्रीसंत एकनाथ महाराजकृत आठ ग्रंथ - या पुस्तकाचे अवलोकन करावे. संपादक - श्री. न. वि. पणशीकर आहेत.

२) मुद्राविलास व लघुगीता ही दोन स्फुट प्रकरणे मला उपलब्ध झालेली नाहीत. वाचकांना नम्र विनंती, जर कोणाला ही प्रकरणे उपलब्ध झाली तरी मला कळवावीत ही विनंती. यातील साहित्य रचनांचा समग्र संग्रह व्हावा ही इच्छा.

३) तसेच याशिवाय इतर कोणतीही स्फुट प्रकरणे असल्यास कृपया अधिक माहितीसाठी कळवावीत, ही विनंती.

श्री. अजित कुलकर्णी
६९५, नारायण पेठ,
फ्लॅट नं. १३, संपदा अपार्टमेंट,
लोखंडे तालीम शेजारील बोळात,
पुणे ४११ ०३०.

# भागवतोत्तम कर्मयोगी संत एकनाथांची समदृष्टी

**श्री. गजानन प्रभाकर वाघ**

जन्म शेगाव, व्यवसाय - मूर्तिकला, कापड, स्टेनलेस स्टील भांडी, फटाके, नोकरी सरकारी ३३ वर्षे. छंद - काव्य, वक्तृत्व, खेळ, संशोधन, प्रवास, समाजकार्य सत्संग, गणेशचित्र साधना, विश्वकल्याणपथ या संस्थेची निर्मिती, समाजोपयोगी कार्यात सहकार्याची तयारी व काही प्रमाणात व्यवसाय मार्गदर्शनाची तयारी व सहभाग.

प्रचलित विज्ञान युगात विज्ञानाचे काही प्रयोग सफल झाले आणि सर्वकाही विज्ञानाने साध्य होईल असा गैरसमज जगात वाढला. भौतिक विश्व व वासनापूर्तीसाठी विज्ञान निष्ठा हेच साधन सुखासाठी स्वयंपूर्ण आहे असा भ्रम निर्माण झाला आहे. प्रत्यक्ष जीवनात शरीर, मन आणि आत्मा यांच्यात आकाश-पाताळाचे अंतर निर्माण झाले. आजच्या भयभीत, चिंतामग्न, असमाधानी व अस्थिरतेच्या चक्रात दुःखी असलेल्या समाजाची सुटका कोणत्या उपायाने होईल असा बिकट प्रश्न निर्माण झालेला आहे. कोणाचा आदर्श अनुसरावा असे नेतृत्वही दिसत नाही. एकनाथ प्रणित सर्वांभूती भगवतभाव जागविणाऱ्या भागवत धर्माची आचरणाची शिकवण आज प्रकर्षाने आवश्यक वाटते.

यापूर्वीदेखील भारतामध्ये बुद्धकालानंतर जनतेवर संन्यासाश्रमाचा प्रचंड पगडा बसून ज्ञानीवर्ग गिरीकंदरी राहू लागल्याने सामान्य जनतेला मार्गदर्शन होईना. विश्वाच्या शाश्वत नियमाची जाणीव करून देऊन समाज धारणेस योग्य आचार जनतेपुढे ठेवणाऱ्या आदर्श ज्ञानी पुरुषाची गरज होती. विश्वाच्या शाश्वत नियमांची जाणीव करून देऊन विश्वाची धारणा करण्यासाठी आणि समाजाला उपकारक आचार जनतेपुढे ठेवण्यासाठी समदृष्टी प्राप्त झालेल्या ज्ञात्याची गरज भासते. प्रापंचिक साधू ज्ञानी तसेच क्रियाशील परोपकारी वृत्तीचे असतात. त्यामुळे त्यांनी केलेले सहज कर्म विश्वोद्धाराला पोषक ठरते. (ए. भा. ११-८७०) नाथांनी कर्मसंन्यस्त साधूचा आदर्श पुरस्कारिला आहे.

*तैसा काया वाचा मने प्राणे । साधू वाढला उपकारा कारणे।*
*आपले पारखे म्हणो नेणे । उपकारू कारणे सर्वांसी ॥*

याचे मूर्तिमंत स्वरूप असलेल्या भागवतोत्तम एकनाथ महाराजांचा अवतार शके १४५० (इ. स. १५२८) मध्ये पैठण येथे झाला.

नाथांनी भागवत, रुक्मिणी स्वयंवर, भावार्थ रामायण, अभंग गाथा, चतुश्लोकी भागवत, हस्तामलक, आनंद लहरी, शुकाष्टक भारुडे, चिरंजीव पद, स्फुटे इत्यादी विपुल लिखाणातून, कीर्तनातून, पुराण सांगताना तसेच गृहस्थाश्रमातील स्वतःचे आचरणातून वैदिक तत्त्वज्ञानाचे प्रत्यक्ष प्रमाण जनताजनार्दनापुढे ठेवले.

आजची विश्वव्यापी विकलता नाहीशी होण्यासाठी मानवाचा विकास व विश्वाची प्रगती यांत अविरोध निर्माण करणे गरजेचे आहे. नाथांच्या भागवत धर्माने असा मार्ग दाखविला आहे. धर्माचे केवळ ज्ञान प्रमाण न मानता त्याचा प्रत्यक्ष अनुभव प्रमाण मानला आहे आणि असा प्रत्यय आला की विश्व आणि मानव, जन आणि जनार्दन, बुद्धी आणि मन, स्वार्थ व परार्थ, प्रपंच व परमार्थ यातील अद्वैताचे भान येते व नराचा नारायण व पुरुषाचा पुरुषोत्तम होतो. हीच व्यापक आत्मनिष्ठा व सहज प्रकाशाची भक्ती समाज विकास घडवेल अशी खात्री वाटते. कारण समदर्शन हे सत्य आहे. सत्य हेच परब्रह्म आहे असे नाथ सांगतात. नाथांनी विविध लिखाणांमधून याचे कसे प्रतिपादन केले ते पाहूया.

*"ज्या नाव बोलिजे निजसत्य । ते मी सांगेन निश्चित ।*
*समब्रह्म देखणे सतत । ते परमसत्य उद्धवा*
*वस्तू न देखता सर्व सम । जे देखणे गा विषम ।*
*तेचि असत्य अति दुर्गम । सत्य जे ब्रह्म समसाम्य*
*केवळ जे सत्य भाषण । ते निज सत्य नव्हे जाण ।*
*तेचि विश्वीचे निरूपण । स्वये श्रीकृष्ण सांगत ।*
*इतर कविंची वदंति । ऋत या नाव सत्य म्हणती*
*हे सत्य मानावे प्रवृत्ती । समब्रह्म निवृत्ती माजी सत्य ।*
*ऋत म्हणिजे ते ऐसे येथ । सत्यत्वाचा जे श्रोत्यांचे हित ।*
*तेहि दुःख संबंध रहित । ऋत निश्चित बोलिजे ।*
*चित्र पाहता दिसे विषम । त्यामाजि भिंति सदा सम ।*
*तेवी जग दिसता विषम । ज्या ब्रह्म सम निजबोधे ।*

म्हणजे विषम दिसणाऱ्या विश्वात सत्य किंवा परब्रह्म हे सम असते. विश्वात आढळणाऱ्या विविध आकार, प्रकार, परिमाण व गुणधर्मानियुक्त वस्तुमात्रामध्ये परमेशाचे अधिष्ठान समान असते. ऋग्वेदातील अंतिम सूक्ताची समत्वाची कल्पना नाथांनी या ठिकाणी सत्य रूपाने स्पष्ट केली आहे. दुःख संबंधरहित व हितकारक सत्यवाणी असा ऋताचा अर्थ नाथांनी येथे दिला असला तरी वैदिक ऋताची कल्पना पुन्हा उकलून दाखविताना केवळ सत्य वचन म्हणजे सत्य नसून समत्वदर्शन हे सत्य होय आणि समत्वबोधाने या सत्याची आलेली प्रचिती हीच परब्रह्म प्राप्ती आहे असे प्रतिपादिले आहे. (ए. भा. १८-४६० ते ४६५)

*"सर्व भूतेषु यः पश्येद भगवद् भाव मात्मनः*
*भूतानि भगवत्यात्मन्येष भागवतोत्तमः"* अर्थ - सर्व प्राणिमात्रांचे

ठिकाणी भगवंताचे रूपाची अनुभूती घेणारे भागवतोत्तम होत. भा. स्कं ११ अ २ खऱ्या साधूचे लक्षण *सर्वांभूती दया । साधू म्हणावे ऐसिया । जगद्ब्रह्मरूप जाण । हेची साधूचे लक्षण ॥* ए. भा. अ. २६ सर्वांभूती समदृष्टीचाचे बोध नाथांनी केला असून नाथांचे ठायी याची प्रत्यक्ष प्रचिती येई.

*सर्वांभूती समदृष्टी तोचि साधु इये सृष्टी*
*एका जनार्दनी संत नित्य साधी आत्महित*

म्हणजे प्रपंच आणि परमार्थ समान मानणारा साधू शांतीचा सागर, सदाचाराचा आदर्श आणि ज्ञानाचे भांडार असतो. प्रपंच आणि परमार्थ एकरूप मानणाऱ्या नाथांच्या समदृष्टीला संस्कृत व मराठी या दोन्ही भाषा ईश्वराने निर्मिलेल्या म्हणून समान श्रेष्ठ वाटल्या. ते म्हणतात, "प्रपंच आणि परमार्थ एकरूप होत, आहे ज्याचा हेत रामनामी" अद्वैत प्रतितीचे वर्णन करताना तर नाथांचे वाणीला बहर येतो. त्यांची अद्वैत प्रतिती केवळ बौद्धिक नसून ती त्यांचा प्रत्यक्ष अनुभव आहे. त्यांनी अद्वैत जाणले तसेच अनुभवले. ते अद्वैत जगले. अद्वैत सुखाचे वर्णत करताना ते स्वतःला विसरतात. आत्मबुद्धीने जाणलेले ब्रह्मज्ञान शुद्ध स्वरूपात त्यांच्या ज्ञानचक्षुपुढे साकारते व त्या चिदानंदाशी कर्मानुभवातून एकरूप होवून सर्वांभूती जनार्दन (भगवंत) भरल्याचा स्वानुभव ते वर्णन करतात.

वैदिक तत्त्वज्ञान व त्याचे प्रत्यक्ष व्यवहारात होणारे आचरण यामध्ये फार विसंगती नाथकालांत दिसत होती. ती स्वतःचे आचरणाने नाहीशी करण्याचा त्यांनी आयुष्यभर प्रयत्न केला. जन्माने व्यक्त होणाऱ्या भेदांची प्रतिष्ठा ज्ञानियाने ठेवू नये. सर्व प्राणिमात्रांचा आत्मा एक असून त्याचा सन्मान करण्यासाठी सर्व माणसे, पशू-पक्षी व जीवमात्रांशी समदृष्टीनेच व्यवहार केला पाहिजे अशी शिकवण त्यांचे आचरणातून प्रकट होत असे. शुकाष्टकातून नाथांनी आद्य शंकराचार्यांच्या *निस्त्रैगुण्ये पथि विचरिता को विधिः कोनिषेधः* या अष्टकाधारे आत्म्याचे सर्वव्यापकत्व, एकविधता आणि समरसता, निर्लेप त्रिगुणरहितता याबाबत अनेक दृष्टांत देवून सुंदर विवरण केले आहे. भारूडांचे माध्यमातून लोकरंजनाद्वारे समाजाच्या तळागाळातील लोकांचे शिक्षणासाठी विषय व पात्रांची केलेली निवड व योजना यांतही नाथांची समतेची दृष्टी दिसते. त्यांत त्यांनी माणसांबरोबरच पशू, पक्षी आणि निर्जिव वस्तूंचाही उपयोग केला आहे. भारुडातील रूपके, नाट्यमयता, लोकभाषा, परंपरा व रूढी यांच्या दर्शनाइतकेच त्यातील समाजदर्शनही अत्यंत मौलिक व प्रभावी असून सर्व समाजघटकांना एकाच रंगमंचावर आणण्यातही समदृष्टीची प्रचिती दाखविली आहे. समाजात खालचे स्थान असलेल्यांना पूर्वीच्या संतवाङ्मयात स्थान नव्हते. नाथांनी महार, मांग, डोंबारी, कोल्हाटी, गारुडी, वैदू, कंजारी, भांड, माळी, जागल्या, चोपदार, पाईक, जोशी, बाळ संतोष, वासुदेव, वाघ्या, मुरळी, भुत्या, भटीण, अपंग (आंधळा, मुका, बहिरा, पिसा इ.) जंगम, मानभाव, नानक, फकीर, दरवेश इ. पात्रयोजनेतून आपली समदृष्टी दाखविली. केवळ आपल्याच मुक्तीचा स्वार्थी विचार असणाऱ्या तथाकथित धर्मरक्षकांवर नाथांनी केलेला हा प्रहार भोळ्या-सामान्यजनांना प्रेरक ठरला व प्रस्थापित व इतर सगळा समाज वारकरी संप्रदायाचे रूपात समान भावनेने एकवटला. सर्व विषयांवर भारुडे रचून लोक विश्वास, लोकरुढी व लोककल्पना यांत समता साधली. उदा. शंखीण, डंकीण, शकुन, सरोदा, भूत स्वप्न यातून कुतूहल जागृती तर प्रापंचिक जीवनातील घटना उदा. लग्न, हळदुळी, सासुरवास, टिळा, पाळणा, संसार, शिमगा, होळी, बाजार, व्यापार, गावगुंड, छापा, किल्ला, पाईक, डाका, अभयपत्र, ताकीदपत्र, कऊलपत्र, अर्जदस्त, अर्जाचा जाब, फुगडी, महालक्ष्मी, सटवाई, मरीआई, यल्लम्मा, अंबा, मेसाबाई, गोंधळ, जागरण, पाखरु, पिंगळा, वटवाघूळ, टिटवी, पोपट, सर्प, विंचू, बैल, गाय, एडका, कुत्रा इ.

चतुःश्लोकी भागवतात निरुपण करताना (१) माठ करण्यापूर्वीचे आकाश, माठातले आकाश व माठ फुटल्यानंतरचे आकाश. (२) प्रथम सोन्याचा गोळा नंतर त्याचा केलेला दागिना व दागिना वितळवून पुन्हा झालेला गोळा यातील सोने यांत आदी मध्ये व अंती जसे आकाश व सोने हे तत्त्व समान व अखंड दिसते तसेच *"सूक्ष्म स्थूल माया घटी।माझ्या निजांगे जगत्व उठी:*
*माझे संपुर्णत्वाचे पोटी : भासली सृष्टी तेही मीच" ॥*

एका ईश्वरात असलेली विविध तत्त्वे विलग होऊन कमी-जास्त प्रमाणात एकमेकांत मिसळून मायेच्या प्रभावाने चल-अचल, अंडज, स्वेदज, जलचर, भूचर, खेचर इ. विविध रूपाने सृष्टीची निर्मिती होऊन द्वैताचा भास झाला तरी मूळ चैतन्य स्वरुप परमात्मा त्या सर्वांमध्ये समानतेने असतो व सृष्टीकर्ता, पालक व संहारक ईश्वरतत्त्व आदी, मध्ये व अंती सर्वत्र अखंड असते. याचे विवेचन नाथांनी अनेक दृष्टांत देऊन केलेले आहे. गौळण या काव्य प्रकारातून नाथांनी प्रपंच आणि परमार्थाला एकाच भावभक्ती रसात न्हाऊन काढून आपल्या समदृष्टीचा परिचय दिला आहे. हरिपाठ आणि इतर स्फूट अभंगामधून नाथांनी अध्यात्मिक पारमार्थिक व वैश्विक अनुभवांना वास्तवाची जोड दिली. तिन्ही लोकांत फक्त आनंदच उरला ही पातळी आपल्या अनुभवांना आणली त्यामुळे *"जनीं नारायण अवघा भरला जनार्दन"* हा भाव अभंगातून व्यक्त होताच या वृत्तीशी नाथ तल्लीन होत. जगाला सुखी करण्यासाठी मी-तू पणा सोडून सर्वांभूती परमेश्वर ही भावना मनात बिंबवावी असे ते सांगत. त्यांनी गुरुंकडे पसायदान मागितले ते असेच "जनी जनार्दन भेटे सर्वत्र असे करा."

गेल्या हजार वर्षांत वैदिक धर्माचा प्रचार बोले तैसा चाले या पद्धतीने अनेक संतांनी प्रभावीपणे केला त्यामध्ये श्रीज्ञानेश्वर माऊलींनंतर संतश्रेष्ठ नाथांनी लेखन-वाचन व आचरण या त्रिसूत्रीचे पालन करून सर्वांभूती समभावाची शिकवण, श्रेष्ठापासून कनिष्ठांपर्यंत, प्रपंचात राहून परमार्थ कसा साधावा हे साध्या-सोप्या पद्धतीने दिली. त्याच्या आचरणाचे काही दाखले असे :

(१) महाराघरी भोजन : एक दिवस ज्ञानेश्वरीवर प्रवचन करताना 'अणोरणीयान' इत्यादी या श्रुतीवाक्याचा खुलासा की ब्राह्मण क्षत्रीय वैश्य शुद्र इ. मानवच काय पण पशू-पक्षी इ. सर्व प्राणीमात्र एकमेकांची

सख्खी भावंडे असून एकच सच्चिदानंद तत्त्व अखिल सृष्टीत व्याप्त आहे. हे नाथांचे बोल ऐकून राणू महाराने त्यांना आपले घरी भोजनास बोलावले. त्या काळी वर्णभेदाचे कडक पालन केले जाई व हे धार्मिक नियम मोडणाऱ्यास कडक शिक्षा होई. त्यात पैठण हे कर्मठ शास्त्री पंडितांचा बालेकिल्ला. अशा कठीण काळात त्या वेळच्या रुढीप्रमाणे निषिद्ध पण माणुसकीच्या खऱ्या धर्माला आवश्यक असे कृत्य सर्वांभूती परमेश्वर अशी समदृष्टी असणाऱ्या नाथांनी केले व शंकराचार्यांचे अद्वैत प्रत्यक्ष आचरून ज्ञानेश्वरांचा माणूसधर्म फुलवून क्रियाशील पंडित ठरले.

(२) पितरांसाठी श्राद्धाचे दिवशी शिजविलेले सुग्रास अन्न वाडग्याशेजारून जाणाऱ्या अंत्यजांना देताना "सर्वांभूती देव वसे । निच्या ठायी काय नसे । नीच कोठोनी जन्मला । पंचभूता वेगळा झाला" ते अन्न सर्वांभूती वसणाऱ्या देवालाच मिळेल. ही श्रद्धा सर्वांठायी समदृष्टी ठेवणाऱ्या नाथांची होती.

(३) सर्वांभूती परमेश्वर या समदृष्टीने काशीहून रामेश्वरला अभिषेकासाठी आणलेले गंगेचे पाणी वाटेत तहानेने व्याकूळ झालेले गाढव दिसताच त्याचे मुखात घातले.

(४) सजीवाप्रमाणेच निर्जीव जड पाषाणाच्या ठिकाणीसुद्धा समत्वदृष्टीने ईश्वराचा वास आहेच अशी पक्की श्रद्धा ठेवून "प्रतिमेसी ये देवपण । ऐसे ब्राह्मणाचे वचन । तुवा ही कृपा करोन । हे महिमान राखावे ॥" असे नाथांनी म्हणताच दगडाचे नंदीने जीभ बाहेर काढून कडब्याची पेंडी तोंडात ओढली.

या व अशाच प्रकारच्या अनेक कृतींतून संत एकनाथ आयुष्यभर प्रपंच आणि परमार्थातही अद्वैताची भावना मनात जागृत ठेवून लोकजागृती आणि लोककल्याण करीत राहिले. कीर्तन करताना आरतीनंतर प्रार्थना करताना श्रीहरीपाशी

*"मागणे हेचि माझे देवा । दुजेपण दुरी ठेवा ।*
*मी तू ऐसी नको उरी । जनार्दनी कृपा करी"* असे मागणे मागत.

महाराष्ट्रातील वारकरी पंथाचे वर्तमानयुगीन आचार्य सोनोपंत दांडेकरांनी सांगितल्याप्रमाणे नाथांचे अगोदरचे संतांनी भागवत धर्माचा उपदेश करताना भक्तिला अद्वैत तत्त्वज्ञानाची जोड दिली. शुद्ध, निर्मळ तत्त्वज्ञान उपनिषदातून घेऊन त्याला भक्तीची जोड दिली. कर्माचा त्याग न करता कर्म, ज्ञान व भक्ती यांचा समन्वय साधला. अद्वैत भक्तीबरोबरच धर्म व नीती यांचा संगम साधला. भक्तीयोग, कर्मयोग व ज्ञानयोग यांची एकता असलेल्या भागवत धर्माची धुरा समर्थपणे पेलताना स्वतःच्या क्रियाशील धर्माचरणातून उच्च नैतिक आदर्श समाजापुढे ठेवला. स्वराज्य स्थापनेच्या महान कार्यात आणि स्वधर्म रक्षणासाठी शिवाजी राजांना याचा त्या काळी फार उपयोग झाला. दोन आरशातील बिंबे आरसा लहान अथवा मोठा असला तरी समग्र वस्तूंचे दर्शन घडवितात व त्यात एकवाक्यता असते. त्याप्रमाणे नाथांच्या विविध वाङ्मय प्रकारांत सर्वांभूती समभावाची समान प्रतिमाच दिसते. गेल्या अर्धशतकात मन, जीवन व आत्मा यांत प्रचंड अंतर निर्माण झाल्याने सर्वत्र भ्रष्टाचार, दहशत, अनिश्चितता वाढून जनजीवन दुःखमय झाले आहे. नाथांनी सांगितलेल्या भागवत धर्माचे आचरण केल्याने हे अंतर संपून विश्वातील सर्व प्राणीमात्र सुखी होतील. मानवमात्राचे कल्याण हेच आत्मकल्याण अशी व्यापक लोकनिष्ठा सांप्रत अत्यावश्यक आहे. जनीजनार्दन ही सर्वांभूतीं समदृष्टीची नाथांची शिकवण वर्तमान काळी अत्यंत प्रेरक असून भारतातील लोकशाहीची विसकटलेली घडी पुन्हा नीट करण्यालाही सहाय्यभूत ठरेल. जनतेच्या आराधनेत ईश्वरपूजा व लोकदर्शनात ईश्वर दर्शन घडविणारा आणि सर्व प्राणीमात्रांचे ठायी समदृष्टीने आत्मभावाची जागृती करणारा भागवतोत्तम संतश्रेष्ठ श्रीएकनाथ महाराजांचा भागवत धर्म पुन्हा जनमानसांत बिंबविण्यासाठी महाप्रयाणाचे वेळी कबूल केल्याप्रमाणे परमपूज्य, परमप्रिय नाथांनी पुन्हा भारतभूमीत अवतार घ्यावा व सर्वांभूती भगवतभाव जागृत करून विश्वकल्याण करावे अशी विनम्र प्रार्थना.

श्री. गजाजज प्रभाकर वाघ
७, श्री अपार्टमेंट, गृहकल्प सोसायटी, बिबवेवाडी,
पुणे ४११ ०३७. दूरध्वनी ४१४६९८



# कर्माची गती

**डॉ. व. र. घोले**

महाराष्ट्र शासनाच्या कारागृह खात्यात ३६ वर्षे सेवा. प्राचार्य किशोर सुधारालय या पदावरून सेवानिवृत्त, थिऑसॉफिकल सोसायटीचे गेले ४० वर्षे सक्रिय सभासद. मराठी थिऑसॉफिकल सोसायटीचे उपाध्यक्ष. थिऑसॉफिकल या ज्ञानशाखेचा कारागृह खात्यातील सेवेत जीवन समजून घेण्याचे दृष्टीने चांगला उपयोग. सेवा निवृत्तीनंतर होमिओपाथिमध्ये प्राविण्य मिळविले. गेली १५ वर्षे रुग्णांवर विनामूल्य औषधोपचार.

दृश्यादृश्य सृष्टीचे नियमन ज्या निसर्ग नियमांमुळे होते त्या सर्व नियमांना "The great Law", "महत् संहिता" अशी एकत्रित संज्ञा आहे. यामध्ये "The Law of Periodicity" or "The Doctrine of Constant renewal" म्हणजे "नित्यनूतनता तत्त्व", "The Law of Karma or of Adjustment" or "Doctrine of Balance and Harmony" म्हणजे "कर्माचा सिद्धांत किंवा संतुलनवाद", "The Law of Essential unity", म्हणजे "पूर्णत्ववाद", "The Law of Motion" म्हणजे "गतितत्त्व" किंवा "उत्क्रांतिवाद", "The Law of Sacrifice" म्हणजे "आत्मसमर्पणतत्त्व", "The Law of Compassion" म्हणजे "अद्वैत तत्त्व" वगैरे अनेक तत्त्वांचा समावेश आहे. द्वैत करुणेला बाधा आणते, अद्वैतातूनच करुणेचा जन्म होतो म्हणून "The Law of Compassion" ला "अद्वैतवाद" म्हटले जाते. या महत्‌संहितेपैकी आज आपण "The Law of Adjustment" or "The Law of Karma" म्हणजे "कर्माचा सिद्धांत" या उपसंहितेचा विचार करणार आहोत. या उपसंहितेला "The Law of Cause and Effect" किंवा "The Law of Action and Reaction" म्हणजे "कार्यकारणभावतत्त्व" किंवा "क्रिया प्रतिक्रियातत्त्व" असेही म्हणण्याचा परिपाठ आहे. सृष्टीचे व त्यावरील जीवमात्रांचे एकसूत्री स्वरूप व संतुलन कायम राहावे असा ह्या सिद्धांताचा हेतू आहे.

सृष्टी व सृष्टीवरील जीवनास एक प्रकारची लयबद्धता आहे आणि ती एका अविश्रांत गतिमानतेचे स्वरूप आहे. ही गतिमानता दृश्य व अदृश्य अशा दोन प्रकारांनी व्यक्त होत असते. या गतिमानतेत किंवा लयबद्धतेत कोठेही आणि कोणत्याही कारणाने व्यत्यय आला तर तो आपोआपच दूर व्हावा म्हणून निसर्गाचे स्वयंप्रेरित कार्य सातत्याने चालू असते. खरे म्हणजे या सृष्टीरचनेत बिघाड फक्त माणूसच करीत असतो. कारण त्यालाच केवळ स्वतंत्र बुद्धी लाभलेली आहे. सृष्टीतील इतर सर्व जीवांचे निसर्गप्रेरणेनेच वर्तन घडत असल्यामुळे त्यांचा योगक्षेम निसर्गनियमानुसार स्वाभाविकपणे सांभाळला जातो. माणसाने निसर्गनियमानुसार कर्म केले तर ते त्याला व सृष्टीसह इतर जीवांना फलदायक ठरते आणि त्याने जरी निसर्गनियमांचे उल्लंघन केले तरी निसर्ग त्याच्या कर्मामुळे सृष्टीचे संतुलन बिघडू देत नाही. परिणामतः माणसास निसर्गाचा समतोल बिघडविणाऱ्या त्याच्या कर्माचे दुष्परिणाम भोगणे भाग पडते. यात नुकसान असे कर्म करणाऱ्या माणसाचेच होते. आपल्या यानंतरच्या विवेचनासाठी या नियमावलीस आपण "कर्माचा सिद्धांत" असे संबोधू. वास्तविक कोणताही सिद्धांत घेतला तरी त्यास स्वतंत्र असे स्थान नाही. इतर अनेक सिद्धांताशी तो निगडीत असतो. परंतु ह्या सर्व संबंधांचा या ठिकाणी विचार करावयाचा म्हटल्यास मूळचा कर्माचा कठीण सिद्धांत अधिकच कठीण होईल म्हणून त्या संबंधीचे विवेचन या ठिकाणी करण्याचे टाळले आहे.

कर्माचा सिद्धांत असे सांगतो की जसे पेरावे तसे उगवते, करावे तसे भरावे. कोणतेही कर्म केले तरी परिणामाच्या रूपाने ते तुमच्याकडे परत येत असते. It is a process of boomeranging. It recoils on the originator. जितक्या जोराने आपण चेंडू एखाद्या भिंतीवर मारावा तितक्याच वेगाने तो आपल्याकडे परत येतो असा याचा अर्थ आहे. आपण जर एखाद्यास चिमटा घेतला तर त्याने जरी नाही तरी कोणीतरी आपला चिमटा काढणार हे नक्की. प्रत्येक क्रियेला प्रतिक्रिया असते आणि ती तितकीच जोरदार व विरुद्ध दिशेची म्हणजे कर्म करण्यावरच परिणाम करणारी असते. हा तो सिद्धांत. अतिशय सोपा पण तरीही सखोल आणि विश्वव्यापी. धनुष्याची प्रत्यंचा ओढून बाण सोडणे सोपे पण सुटलेल्या बाणाचा परिणाम तुम्ही रोखू शकत नाही. दुसऱ्याचा तुम्ही मत्सर केलात तर त्याच्या मत्सरास तुम्ही बळी पडता. सद्‌विचारांची पेरणी केलीत तर तेच सद्‌विचार तुमचे कल्याण करतात. असे म्हटले जाते की झाडावरचे एखादे सुंदर फूल ओरबाडून तोडले तर हजारो किलोमीटर दूर असलेला तारा थरारतो. या उदाहरणांत फूल आणि तारा यांचे नाते दाखविण्याचा हेतू असला तरी तुमच्या कृतीचा तो एक परिणामही होऊ शकतो व अर्थातच त्या परिणामाची जबाबदारी तुमच्यावर राहते. स्थूल देहाकडून घडलेल्या कर्मापेक्षा भावनिक आणि वैचारिक स्तरांवरील कर्माचे परिणाम तुलनेने खूपच तीव्र असतात. "कर्माचा सिद्धांत" ही काळ्या दगडावरची रेघच असते. त्यास Immutable Law of Nature म्हणजे निसर्गाचा अढळ नियम म्हटले आहे. हा सिद्धांत भारतीय घटनेसारखा नसतो की ज्यामध्ये दरवर्षी दुरुस्त्या कराव्या लागतात. हा ईश्वरी अबाधित असा सिद्धांत. येथे अंधश्रद्धेला वाव नाही. आपल्या वैयक्तिक आणि सामुदायिक कर्मांची फळे आपण व्यवहारातही प्रत्यही पाहत असतो. ज्याला हा सिद्धांत समजला तो गोंधळलेल्या परिस्थितीत असत नाही. आपल्या कर्माचे काय परिणाम होणार हे समजणे मग मुळीच कठीण नसते.

ज्ञानाच्या उंबरठ्यापाशी गेलेला माणूस निश्चयी वृत्तीचा असतो, निर्धाराचा मेरुमणी असतो. चांगले, वाईट, शाश्वत-अशाश्वत त्याला कळते आणि म्हणून तो विचारपूर्वक, उंचावलेल्या जबाबदारीच्या जाणिवेने पावले टाकतो. कर्माचा सिद्धांत आत्मसात केल्याचा हा परिपाक असतो. असा माणूस कोणाचा सल्ला मागत नाही. आपल्या निःस्वार्थी कर्मांची जाहिरातबाजी करीत नाही व निर्धारपूर्वक, विवेकाने पावले टाकतो. भगवद्गीतेत दुसऱ्या ते पाचव्या, नवव्या व अठराव्या अध्यायांमधून कर्मासंबंधी भरपूर विवेचन केलेले आढळते. यामध्ये कर्म म्हणजे काय, कर्माची कारणमीमांसा, विकर्म, अकर्म, नैष्कर्म्य, कर्मसंन्यास, कर्मत्याग, प्रारब्ध, संचित, क्रियमाण वगैरे अनेक महत्त्वाच्या बाबींचा उहापोह केलेला आहे. इतक्या खोल पाण्यात आज आपण शिरणार नाही परंतु काही व्यावहारिक मुद्यांवर विचार करणार आहोत.

कर्माच्या सिद्धांताचा विचार अनेक बाजूंनी केला गेला आहे. माणसाखेरीज इतर जीवांच्या कर्माची दखल निसर्ग घेत असल्या कारणाने माणसाच्या दृष्टीने या विषयाचा विचार येथे अभिप्रेत आहे. एक महत्त्वाचे सूत्र असे की कर्माशिवाय माणूस क्षणभरही राहू शकत नाही. कर्म हे शरीरद्वाराच घडू शकते असे नाही. शरीर स्वस्थ असले तरी मनाची क्रिया चालूच राहते. शारीरिक कर्म, भावनिक कर्म, वैचारिक कर्म, बौद्धिक कर्म, आध्यात्मिक कर्म असे कर्माचे अनेक प्रकार सांगता येतील. पुष्कळ वेळा आपण केलेले कर्म जाणीवपूर्वक असतेच असे नाही. कर्माची जाणीव असली तरी ते विचारपूर्वक केले असेल असेही नाही. भावनेने उद्दिपित होऊन अनावरपणे कर्म घडते. लोभी वृत्ती, मोहवशता, विषयवासना, क्रोध, मत्सर इत्यादींच्या उद्रेकामुळे कर्मे घडत असतात. अविकारी प्रेमभावनेने केलेले कर्म वरच्या दर्जाचे असते. इतर अनेक कर्मे, स्वार्थरहित व निरहंकार बुद्धीने करणारे लोकही कमी नसतात.

तथापि कर्म म्हटले की कर्मबंधन आले. कर्म श्रेष्ठ असो वा कनिष्ठ, उच्च असो वा नीच, सुष्ट असो वा दुष्ट, दृश्य असो वा अदृश्य, भावनिक असो वा वैचारिक, स्वार्थी असो वा निःस्वार्थी, कर्म करणाऱ्यांची कर्मबंधापासून मुक्ती नसते आणि मोक्षाची खरी व्याख्या कर्मबंधापासून मुक्ती ही आहे. मग हे कसे साधावयाचे? कर्मबंधनापासून मुक्त होण्याची गुरुकिल्ली भगवद्गीतेत सांगितली आहे. त्यामधील तिसऱ्या अध्यायातील चौथ्या श्लोकांत असे सांगितले आहे की स्वधर्माप्रीत्यर्थ केलेले कर्म सोडले तर बाकी इतर सर्व कर्मे बंधनाला कारणीभूत होतात. स्वधर्माचा अर्थ या ठिकाणी समजावून घेणे आवश्यक आहे. ''स्वधर्मा प्रीत्यर्थ केलेले कर्म'' म्हणजे ''विहित कर्म''. जे विहित कर्म संतोषाने व निर्विकार बुद्धीने केले जाते त्याचे फळ ब्रह्मार्पण होते. त्यानंतर चौथ्या अध्यायातील चौदाव्या श्लोकात असे म्हटले आहे की स्वतःकडे कर्माचे कर्तेपण न घेता कर्मफलाविषयी अनासक्त राहून जो कर्म करतो तो कर्मबंधनापासून मुक्त होतो. पुनः पाचव्या अध्यायातील दहाव्या श्लोकात म्हटले आहे की जो ब्रह्माच्या ठिकाणी कर्मे अर्पण करून फलाची आसक्ती टाकून कर्मे करतो तो कमलपत्राप्रमाणे पापापासून अलिप्त असतो. अठराव्या अध्यायातील ५७ व्या श्लोकांत श्रीकृष्ण अर्जुनाला सांगतात की सर्व कर्मे माझ्या ठिकाणी समर्पून मत्पर होऊन, बुद्धीयोगाचा आश्रय करून सर्वकाल माझ्या ठिकाणी चित्त जडलेला असा तू हो. या शिवाय दुसऱ्या अध्यायातील ४८ वा श्लोक तर सुप्रसिद्ध आहे. ''कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन ।'' फलाची अपेक्षा न धरता अनासक्त होऊन म्हणजे निष्काम कर्माचा उपदेश हे कर्मयोगाचे सार आहे. फलाशा बाळगल्यामुळे कर्म श्रेष्ठ दर्जाचे होऊच शकत नाही. फलाशा कर्मास बाधा आणते. कारण चित्ताचा एक भाग फलाशेत गुंतलेला असतो. हा उपदेश अत्यंत मोलाचा आहे. निर्हेतुक कर्म, निष्काम कर्म हे सर्व यशाचे गमक आहे. गीतेची थोरवी याच्यातच आहे की ती कर्म करून कर्मबंधनापासून मुक्त होण्याचा मार्ग शिकविते. गीतेत पलायनवाद नाही. गीता ही कर्मास तोंड देण्यास साधकास समर्थ करते. डॉ. राधाकृष्णन् यांनीही म्हटले आहे की Geeta preaches not renunciation of Karma but renunciation in Karma. अर्थ स्पष्ट आहे. गीतेत कर्मत्याग सांगितलेला नाही. अभिलाषारहित कर्म सांगितलेले आहे. कर्मे टाकताच येत नाहीत. तेव्हा नैष्कर्म्य होणे म्हणजे कर्मे टाकणे नव्हे. कर्मांत नैष्कर्म्य असे गीतेचे प्रतिपादन आहे.

"Light on the Path" या अनमोल पुस्तिकेमध्ये शेवटी Mabel Collins या लेखिकेने कर्मावर फार सुरेख आणि विचारप्रवर्तक निबंध लिहिलेला आहे. त्यात त्या म्हणतात A man may refuse to allow himself to think of reward. But in that very refusal is seen the fact that reward is desired. या विधानाचा विचार फार सूक्ष्म आहे. She further reveals the secret that there is no cure for disire, no cure for the love of reward, no cure for the misery of longing same in the fixing of the sight and hearing upon that which is inivisible and sound less.

भावार्थ असा आहे की वासना सूक्ष्मरूपाने माणसामध्ये वावरत असते. ''अमूक एक गोष्ट मला हवी'' ही वासना आहे पण ''अमूक एक गोष्ट मला नको'' हीदेखील एक वासनाच आहे. ''मी फलाशेचा विचारदेखील करू शकत नाही'', असे एखादा म्हणेल तर या विचारामध्ये या नकारात्मक विचारमध्येही वासनाच लपलेली आहे हे सामान्य माणसाच्या मुळीच लक्षात येत नाही. बाई पुढे असे म्हणतात की वासनेला म्हणजे वासना संपूर्ण नष्ट होण्यासाठी औषध नाही. फलाशा मूलतः सांडून देण्यासाठीही औषध नाही, तीव्र वासनेच्या दुःखासाठी औषध नाही पण तीच तीव्र वासना जर ईश्वर प्राप्तीसाठी वळविली तर तिला एक वेगळी परिमिती लाभते. शोध घेता-घेता एकदम काहीतरी अनमोल गवसावे असा हा वाक्यार्थ आहे. एक गूढ त्यांनी सांगून टाकले आहे. कर्तेपण स्वतःकडे घेऊ नका, कर्ता हा ईश्वर आहे, तुम्ही नाही. तुम्ही फक्त ''माध्यम'' आहात. एकदा कर्तेपण गेले की वासनेचा कोठे संबंधच येत नाही. जे कृष्णमूर्ती त्यांच्या "At the Feet of the Master" या पुस्तकात म्हणतात, "Be a pen in the hand

of God, through which is thoughts may flow and find for itself an expression down here, which, without a pen, if could not have" तुमचे संपूर्ण शरीर, तुमच्या संपूर्ण भावना, तुमच्या संपूर्ण वासना परमेश्वराला अर्पण करून परमेश्वरी शक्तीसाठी सत्पात्र, विशुद्ध, विमल व सुंदर असे 'माध्यम' बना. Mabel collins शेवटी म्हणतात, "'Begin even now to practice it and a thousand serpents will be kept from the path" "आजपासूनच अशी वृत्ती बाणण्यासाठी अभ्यास करा आणि मग हजारो विषारी सर्प तुमच्या पथापासून दूर जाऊन तो निर्विघ्न करतील." म्हणून आपण हे समजावून घेतले पाहिजे की निःस्वार्थी, निरपेक्ष कामातसुद्धा आपणास एक प्रकारची आसक्ती असते. एखाद्या निःस्वार्थी कामाला आपण वाहून घेतले असले तरीसुद्धा त्यांत अहंकार असतोच. कोणतेही काम करताना आपले मन आणि आपली प्राणशक्ती, आपल्या भावभावना त्यापासून काहीतरी लाभ मिळविण्याचा प्रयत्न करीत असतात. वैयक्तिक सुख-समाधान मिळावे, कीर्ति मिळावी, स्वतःविषयी इतरांचे चांगले मत व्हावे अशा सुप्त अपेक्षा असतात. हे सर्व टाळणे अतिशय कठीण आहे तरीसुद्धा अत्यंत प्रामाणिकपणे आपण नेहमी असे म्हणावे की "देवा, तुझी इच्छा सफल होऊ दे. माझी नव्हे." म्हणजे योग्य भूमिका ठेवणे आपणास कधीतरी साधेल. आणखी एका महत्त्वाच्या बाबीचा विचार करू व आजच्यापुरता हा विषय संपवू.

माणसाचा जन्मच मुळी त्याने अगोदरच्या जन्मी केलेल्या अनेकविध कर्मांचे कारण असते. कर्मभोगासाठीच तो जन्म घेतो व प्रारब्ध म्हणजे त्या जन्मात फेडावयाची कर्मे फेडून तो परलोकी जातो. कर्मे करणाऱ्या माणसाला पूर्वी केलेल्या कर्मांचे भान नसते. त्याच्याकडून घडलेली सर्व कर्मे तो विसरून जातो. तथापि तो जरी विसरला तरी कर्मदेवता ज्यांना "Secret Doctrine" या मॅडम ब्लॅव्हॅट्स्की यांनी लिहिलेल्या महान ग्रंथात 'लिपिका' म्हटलेले आहे त्यांचा सर्व अचूक हिशोब ठेवीत असतात. त्यात चूक होण्याचा संभवच नसतो. पुष्कळ वेळेला माणसे विचारतात, माझी मुलगी लग्नानंतर लगेच विधवा झाली, तरणाताठा सुंदर मुलगा युद्धात मारला गेला, प्रामाणिकपणे व्यवहार करूनही मी धंद्यात बुडालो; कोर्टात माझी बाजू न्याय्य असूनही माझ्याविरुद्ध निकाल लागला, साधारण बुद्धीचा मनुष्य वैभवात व आरामात लोळताना दिसतो आणि विद्वान ब्राह्मणाच्या नशिबी दारिद्र्य येते हे असे का घडते? याला कारणे काय? प्रत्येक व्यक्तीसमोर जीवनभर अशा तऱ्हेचे प्रश्न उभे असतात. वैयक्तिक कर्मांचे जसे वैयक्तिक परिणाम घडतात, तसे सामुदायिक कर्मांचे सामुदायिक परिणाम घडून येतात. विमान कोसळून ३२९ प्रवासी जळून ठार झाले, वायुगळतीमुळे भोपाळमध्ये हजारो लोक मृत्युमुखी पडले व काहींना जन्माच्या व्याधी जडल्या, भूकंपामध्ये शहरे बेचिराख होऊन हजारो लोकांना प्राण गमवावे लागले हे नेमके कशाचे परिणाम? संतांनी कर्मगती हे अशा प्रश्नांचे उत्तर दिले आहे. अशा प्रश्नांना समाधानकारक उत्तरे देणे कठीण असते याचे मुख्य कारण सर्व कर्मांवर शरीर, भावना व विचार यांचा पगडा असतो. शारीरिक कृती दिसते पण तीही नेहमी दिसते असे नाही. भावनिक आणि वैचारिक कृति दिसत तर नाहीतच पण प्रत्यक्ष कर्म करणाऱ्यासदेखील त्या वेळी त्याचे भान नसते आणि सर्व काही पाहता न आल्यामुळे कार्यकारणभाव लावता येत नाही. पण कर्माशिवाय परिणाम नाही हे तत्त्व एकदा समजले म्हणजे वरील सर्व गोष्टी कारणाशिवाय घडणे शक्य नाही हे लक्षात येणे अवघड नसते. शिवाय कर्म करावयास अगर घडावयास काही क्षण पुरतात परंतु त्यांचे परिणाम घडून यावयास कर्मांच्या तीव्रतेनुसार कमी-अधिक कालावधी लागतो. आपण काही उदाहरणे घेऊ म्हणजे हा मुद्दा अधिक स्पष्ट होईल.

समजा माणसाच्या बोटाला सुईने टोचले तर रक्त येण्याची क्रिया परिणाम म्हणून लगेचच सुरू होईल. एखाद्याने चार प्लेट भजी खाल्ली तर पोट दुखावयास लागेल पण ते चार तासानंतर दुखेल. माणसाच्या अंगात टॉयफॉईडचे जंतू टोचले तर त्याला टॉयफॉईड होईल पण त्यास नऊ-दहा दिवस लागतील आणि असे म्हणतात की AIDS च्या विषाणूंची लागण झाल्यास AIDS नावाची व्याधी जडते पण त्याला पाच-दहा वर्षांचा कालावधी लागतो. या सर्व उदाहरणांवरून दिसून येईल की कर्म करण्यास वेळ लागत नसला तरी ते पक्व होऊन त्याचा परिणाम घडून यावयास वेळ लागतो व तो केलेल्या कर्माच्या स्वरूपावर अवलंबून असतो. काही कर्मे परिपक्व होण्यास काही जन्म लागल्याचेही संशोधनात दिसून आले आहे. हे संशोधन कसे करतात हा स्वतंत्र विषय आहे व या लेखात ती माहिती देणे शक्य होणार नाही. असो.

या सर्व विवेचनाचे सार असे सांगता येईल की आपल्या जीवनामध्ये बऱ्याच वेळा परिस्थिती 'रहस्य' रूपाने उभी राहते आणि अनेक 'कोडी' निर्माण झाल्याचे आपल्या अनुभवास येते व आपण गोंधळून जातो आणि काही आसुरी शक्तींनी आम्हास गिळंकृत करण्याचा चंग बांधला आहे असे आपणास वाटते. परंतु खरोखरी एकही अपघात, शापित घटना किंवा दुर्दैवी प्रसंग आमच्या जीवनात घडू शकत नाही किंवा जिचा आम्हास या जन्मात अगर मागील जन्मात मागोवा घेता येणार नाही, आणि प्रत्येक माणूस स्वतःचा कायदा व शास्ता आहे. स्वतःला प्रकाशाकडे किंवा अंधाराकडे नेणारा आहे. स्वतःच्या जीवनाचा सर्व काही तोच आणि बक्षीस व शिक्षेचा धनीही तोच असतो हे घोषित असे एक महान सत्य आहे.

डॉ. व. र. घोले
हर्मिताजा, श्रीहरी सोसायटी, श्रीधरनगर,
धनकवडी, पुणे ४११ ०४३.



# संत एकनाथ महाराजांचे जीवन व त्यातील चमत्कार

**केशवचंद्र गंगाधर भडभडे**

बी. एससी., ६५ वर्षे थिऑसॉफिकल सोसायटीचे सक्रीय सभासद. ठिकठिकाणी थिऑसॉफिवर प्रभावी भाषणे. अध्यापन आवडीचा विषय, स्वेच्छेने शिक्षकी पेशा पत्करला. युवकांनी थिऑसॉफिचा सखोल अभ्यास करावा म्हणून प्रयत्नशील. विपुल लेखन, निस्वार्थीपणा, सेवाभाव व विनम्रता गुणविशेष. अंतःप्रज्ञा व अद्भूत बालक ही पुस्तके मुक्तीच प्रसिद्ध झाली.

चमत्कार : निसर्गात घडणाऱ्या अनेक अकल्पित गोष्टींचा सुसंगत व तर्कसंगत अर्थ आपल्याला अनेकदा लावता येत नाही. त्या गोष्टींची उकल व मीमांसा करता न आल्यामुळे आपण त्यांना चमत्कार म्हणतो.

पाण्यात एक सरळ काठी बुडवली तर ती वाकडी दिसते. घनमाध्यमातून विरळ माध्यमात जाताना प्रत्रशारे व क्रोधभवनहीन याच्या मागच्या वैज्ञानिक सत्याची माहिती नसल्यामुळे आपण त्या घटनेला 'चमत्कार' म्हणतो.

दुपारी तापलेल्या वाळवंटात दूर झुळझुळ पाणी वाहत आहे असा आपल्याला भास होतो. तापलेल्या रस्त्याकडे दुरून पाहताना पाणी वाहत असल्याचा भास होतो. तृषार्त हरिणे वाळवंटत वाहणाऱ्या पाण्याच्या आभासाला पाणी समजून त्याकडे धाव घेतात. जसजसे पुढे जातात तसतसा जळप्रवाहही पुढे पुढे सरकतो. तिथपर्यंत पोचण्यासाठी हरणे आणखी जोराने पळतात पण त्यांना पाणी मिळत नाही व तहानेने व्याकुळ होऊन ती दमून खाली पडतात व मरून जातात. या घटनेला 'मृगजळ' म्हणतात. तापलेली हवा विरळ झाल्यामुळे हलकी होते व वर सरकते व बाजूची हवा तिची जागा घेण्यासाठी त्या ठिकाणी येते व वाहत्या पाण्याचा आभास निर्माण होतो. हे वैज्ञानिक सत्य माहीत नसल्यास हा एक 'चमत्कार' वाटतो.

थिऑसॉफिकल संस्थापिका मॅडम ब्लॅव्हॅट्स्की यांच्याकडे एक मनुष्य आला व म्हणाला, 'तुम्ही ज्यांना गुरुदेव म्हणता ते फार योग्यतेचे नाहीत. मी तुम्हाला चमत्कार दाखवतो.' त्या वेळी आकाश अगदी निरभ्र होते. 'मी तुम्हाला १५ मिनिटांत पाऊस पाडून दाखवतो.' तो पावसाळा नव्हता व पावसाची कोणतीच लक्षणे दिसत नव्हती. त्याने ओठ घट्ट मिटून आपला चेहरा लोखंडासारखा कठीण केला. काही मिनिटांतच ढग जमले व १५ मिनिटांत पावसाची जोरदार सर आली.

मॅ. ब्लॅव्हॅट्स्कींना त्यांच्या गुरुदेवांनी सांगितले की, हा मनुष्य एक 'असूर' आहे. उत्क्रांतीक्रम चालू नये अशी त्याची इच्छा आहे. या चमत्कारासाठी त्याला फार मोठ्या शक्तीचा व्यय करावा लागला. त्याला पुनः येऊ देऊ नको.

थिऑसॉफिकल सोसायटीचे चवथे आंतरराष्ट्रीय अध्यक्ष श्री. सी. जिनराजदास यांनी त्यांच्या जीवनातला एक प्रसंग वर्णिला आहे तो असा : 'थि. सो. चे आंतरराष्ट्रीय अधिवेशन चालू होते. सायं. ७ वाजण्याच्या सुमाराला काही मुद्रिते शोधनासाठी त्यांच्याकडे आली. ते ती दुरुस्त करत असताना त्यांना काही मिनिटे डुलकी लागली. जागे होऊन पाहतात तो काय मुद्रिते तपासून आवश्यक सुधारणा केलेल्या होत्या. गुरुदेव कुथूमींच्या हस्ताक्षरात त्या सुधारणा होत्या.'

यावरून भगवान कृष्ण जनाबाईला दळायला लागले होते ही घटना खरी असणे शक्य आहे. मुद्रिते एकदाच तपासली तसे अत्यंत आवश्यक असतानाच दळायला लागले असतील.

दत्तात्रय १२ वर्षे एकनाथांकडे चोपदाराचे काम करत असतील व श्रीकृष्ण १२ वर्षे श्रीखंड्या म्हणून काम करीत असतील हे शक्य वाटत नाही. कारण अत्यंत जरुरीच्या वेळीच मदत केली असणे शक्य आहे.

एकनाथ महाराजांच्या जीवनात अनेक चमत्कार घडले, असे श्री. जगन्नाथ रघुनाथ आजगावकर यांनी लिहिलेल्या लहान व मोठ्या चरित्रांत लिहिले आहे.

एकनाथ महाराजांच्या जीवनात, प्रत्यक्ष भगवान श्रीकृष्ण श्रीखंड्याच्या रूपाने त्यांच्या घरी १२ वर्षे चंदन उगाळत होते व कावडीने पाणी भरत होते असा उल्लेख आहे.

एकनाथ हे ऋग्वेदी देशस्थ ब्राह्मण व त्यांच्या पूर्वीच्या अनेक पिढ्या पैठण येथे होऊन गेल्या. आई-बाप लवकर वारल्यामुळे पितामह चक्रपाणी यांनी त्यांचं पालन-पोषण केले. एकनाथ बालपणापासून मोठे सात्त्विक, श्रद्धाशील व तैलबुद्धी असले पाहिजेत असे त्यांच्या पुढील चरित्रावरून व ग्रंथरचनेवरून दिसून येते. हरिभजनाकडे त्यांची प्रवृत्ती लहानपणापासून होती. सहाव्या वर्षी मौजीबंधन झाले व संस्कृत भाषा, नित्य नैमित्तिक ब्रह्मकर्म वगैरेंचे शिक्षण त्यांना मिळाले. त्यांना आपल्याला ब्रह्मज्ञान करून देणारा सद्गुरु केव्हा व कोठे भेटेल ही त्यांना चिंता होती. 'देवगिरी (हल्लीचे दौलताबाद) येथे जनार्दन स्वामी नावाचे सत्पुरुष आहेत त्यांजकडे जाऊन त्यांचा अनुग्रह घे', असा त्यांना दृष्टांत झाला व कोणालाही - आजा-आजींना न कळवता ते पायीच निघाले व देवगिरीस जनार्दन स्वामींपाशी दाखल झाले. त्या वेळी बहुतेक सगळा महाराष्ट्र मुसलमानांनी व्यापला होता. त्यांची चाकरी इमाने - इतबारे करूनही जनार्दन स्वामींनी धर्माचे निशाण फडकावले व एकनाथांसारखे सच्छिष्य तयार करून स्वधर्माचा दीप भावी पिढ्यांसाठी

प्रज्वलित करून ठेवला. श्रीदत्तात्रयांनी अनुग्रह करून जनार्दन स्वामींना कृतार्थ केले. नोकरीचा काळ वजा जाता त्यांचा बहुतेक वेळ स्नानसंध्या, दत्तोपासना व समाधीधारणा यातच व्यतीत होत असे.

पहिल्या भेटीच्या वेळी नाथांसारख्या विरक्त बालभागवतास पाहून त्यांची विचारपूस करून जनार्दन स्वामींनी त्यांना प्रेमाने जवळ ठेऊन घेतले. तिथे त्यांची परमार्थप्रवणता व अध्ययन वाढतच गेले. हळूहळू बालपण संपून नाथ तारुण्यात प्रवेश करू लागले. मग गुरु-शिष्य तीर्थयात्रेला निघाले. पंचवटीला श्रीरामचंद्रांचे दर्शन घेऊन त्र्यंबकेश्वराला जाऊन जनार्दन स्वामी देवगिरीला गेले व एकनाथ एकटेच उत्तर हिंदुस्थानात गेले व सर्व तीर्थक्षेत्रे व देशस्थितीचे अवलोकन करून व जगाचा अनुभव घेऊन पुष्कळ वर्षांनी पैठणला आले. तिथे फिरत असता आजा-आजींनी त्यांना पाहिले व ओळखले. दरम्यान जनार्दन स्वामींकडून आणलेले पत्र चक्रपाणीं त्यांना दाखवले. 'आजा-आजींची मर्जी सांभाळून तुम्ही येथेच राहावे' अशी त्यात आज्ञा होती ती शिरसावंद्य मानून एकनाथ पैठणास राहिले व हळूहळू त्यांना एक वाडा बांधून मिळाला. पुढे लोकांची श्रद्धा पाहून नाथांनी कीर्तन करण्याला प्रारंभ केला. पुढे लवकरच गिरिजाबाई या ब्राह्मण कन्येशी त्यांचा विवाह होऊन त्यांनी गृहस्थाश्रमाला आरंभ केला. गिरिजाबाई अत्यंत सुशील, कार्यकुशल व सुस्वभावी होत्या व त्यांनी नाथांबरोबर उत्तम तऱ्हेने संसार केला.

आजा-आजी वृद्धापकाळाने निवर्तल्यानंतर प्रपंचाचा भार एकनाथांवर पडला व तो त्यांनी उत्तम प्रकारे पार पाडला. तसेच परमार्थाकडेही पूर्ववतच लक्ष ठेवले. 'भूतांची दया हे भांडवल संतां' या सदुक्तीची सार्थकता त्यांच्या ठायी पूर्णत्वाने झाली होती. आपल्या घरी त्यांनी सदावर्त ठेवले होते व अतिथी-अभ्यागताची व्यवस्थाही चांगली केली. एकनाथांच्या चरित्रात अलौकिक चमत्कारांच्या अनेक कथा आहेत. त्यापैकी काहींचा परामर्श इथे घेत आहोत.

## अलौकिक चमत्कार

१. नाथांच्या देवडीवर 'दत्तात्रेय' चोपदार होऊन पहारा करीत असत व जनार्दन स्वामी व दासोपंत यांना तेथे त्यांचे दर्शन झाले होते असा उल्लेख आहे.

२. श्रीखंड्याच्या रूपाने भगवान श्रीकृष्ण १२ वर्षे सेवा करत राहिले होते असे दिसते.

*श्री एकनाथ सदनी माधवजी सर्व काम हे करितो ।*
*स्वकरे चंदन घाशी, गंगेचे पाणी कावडी भरतो ॥*

अशी आर्या प्रसिद्ध आहे. कृष्ण श्रीखंड्या आख्यान ८७ ओव्यांचे आहे.

३. नाथांच्या वडिलांच्या श्राद्धाचे दिवशी ब्राह्मण-भोजनापूर्वी गंगेवर स्नानासाठी गेले असता तीन मुसलमानांच्या रूपाने दत्तात्रय आले. ते फार भुकेलेले आहेत असे कळल्यावर नाथांनी ब्राह्मणांच्यासाठी शिजवलेले अन्न त्यांना खाऊ घालून तृप्त केले व त्यांनी एकनाथांना दर्शन दिले. ब्राह्मण स्नानाहून आल्यावर त्यांना मुसलमानांना त्यांचे भोजन दिले असे कळले व ते संतप्त झाले. त्यांनी एकनाथांना बहिष्कृत केले. ते म्हणाले, 'तुमचे पितर येथे येऊन जेवतील तेव्हाच आम्ही अन्नग्रहण करू.' नाथ म्हणाले, 'तुम्ही भूदेव, तुमच्या आज्ञेने घडून येणार नाही अशी गोष्टच नाही.' नाथांनी आपल्या तीन पूर्वजांना आवाहन केले व

*गगनपंथे तीन्ही मूर्ती । येऊनि स्वस्थानी बैसती ।*
*पाहतांचि ब्राह्मण समस्ती । माना डोलविती त्या काळी ॥*

हे पाहून ब्राह्मण आश्चर्यमूढ होऊन आ वासून बसले व मग ते मुकाट्याने जेवायला बसले.

पैठणात ३०० वर्षांपूर्वी ब्राह्मणांनी ज्ञानेश्वरादींचा असाच छळ केला होता. त्या वेळी ज्ञानेश्वर माऊलीनी रेड्यामुखी वेद वदवून चमत्कार दाखवला होता. त्याची वरील गोष्टीनी पुनरावृत्ती झाली असे दिसते.

४. त्या काळी कृष्णदास एकदेवी उपासक होते. त्यांनी रामायणाच्या युद्धकांडावर ओवीबद्ध प्राकृत रचना केली होती. पण ती पूर्ण होण्यापूर्वी आपला निर्याण काळ सन्निध आल्याचे त्यांना जाणवले. मग त्यांनी अपूर्ण पोथी आणून नाथांच्या पुढे ठेवली व विनंती केली की, ही आपण पूर्ण करावी. पोथीतील वक्तृत्व, कल्पना चातुर्य, सुभाषिते, दृष्टांत आदी पाहून नाथांना फार आनंद झाला. त्यांनी विचारले की पोथी पूर्ण करायला किती दिवस लागतील. कृष्णदास म्हणाले, 'अकरा दिवस.' नाथ म्हणाले, 'अकरा दिवसांपूर्वी मृत्यू येणार नाही, असा निर्धार करा व ही पोथी तुम्हीच पूर्ण करा.' त्याप्रमाणे नाथांच्या वाड्यातच लेखनकार्य चालू राहिले. मृत्युकाळ आला त्या वेळी नाथानी त्यांच्या अंगावरून हात फिरवला व काय चमत्कार ! मृत्युने माघार घेतली. मग कृष्णदासांनी ती पोथी पूर्ण केली व नाथांचे पुढे ठेवली व त्यांनी देह ठेवला.

५. नाथांनी भागवताची पोथी लिहायला आरंभ केला व चार अध्याय लिहून झाले. इतक्यात एक ब्राह्मण आला व त्याने चार अध्यायांची नक्कल करून घेतली. पुढे तो काशीला गेला. तो रोज त्यांचे पारायण करत असे. ही गोष्ट तिथल्या एका मठपतीच्या शिष्यांनी पाहून मठपतींना कळविले. मठपती संतप्त होऊन म्हणाले, 'संस्कृत भागवतावर प्राकृत टीका करणारा हा कोण पाखंडी?' ब्राह्मणाने एकनाथांचे नाव सांगितले. लगेच मठपतीने दोन विद्यार्थ्यांना आज्ञापात्र देऊन एकनाथांना आपल्या समोर हजर होण्याची आज्ञा केली व विद्यार्थी पैठणात दाखल झाले. तिथल्या कुटाळांनी त्यांना फूस देऊन एकनाथांकडे पाठवले. आज्ञापत्र शिरसावंद्य समजून नाथ काशीला पोचले. लिहून झालेले अध्याय बरोबर नेले. एकनाथ मठात बसले असता मठपतींनी ३०० संन्यासी त्यांना काठीने झोडपायला पाठवले; पण त्या संन्याशांना एकनाथांच्या ठिकाणी चतुर्भुज श्रीकृष्णाचे दर्शन झाले व शेवटी मठपतींनाही ते दर्शन झाले व त्यांनी एकनाथांची क्षमा-याचना केली.

६. नाथांचा पुत्र हरिपंडित त्यांच्याचसारखा विद्वान होता पण त्याला नाथांचा भक्तीमार्ग पसंत नव्हता. त्याने रामेश्वराला घालण्यासाठी

काशीहून कावड आणली होती. इतक्या कडक उन्हात तहानेने व्याकुळ होऊन मरणोन्मुख झालेले गाढव त्यांना दिसले व त्यांनी ती कावड त्याला पाजली. हरिपंडित अत्यंत संतप्त झाला पण साक्षात रामेश्वरांनी ब्राह्मणाच्या रूपाने स्वप्नात येऊन दृष्टांत देऊन सांगितले की, 'तुला कावड अर्पण करण्यापेक्षा शंभर पट पुण्य लाभले आहे.'

७. गावबा : हा गरीबाचा मुलगा रोज पुरणपोळीसाठी हट्ट धरून बसायचा. आईने त्याला एकनाथांच्याकडे पाठवले व त्यांनी गिरिजाबाईना आज्ञा केली की त्याला रोज पुरणपोळी द्यावी. पण तो अगदीच मठ्ठ होता. त्याला एकनाथ या शब्दापलीकडे काही लक्षात राहीना. तो उनाडक्या करत होता. त्याला 'एकनाथ' या शब्दाचा जप करायला सांगितले. हळूहळू त्याची बुद्धी पालटलीच व तो नाथांजवळ बसून ते लिहीत असलेले भावार्थरामायण ऐकू लागला. पुढे नाथांचा निधन काळ जवळ आला. तोपर्यंत युद्धकांडाचा ४४ वा अध्याय पुरा झाला होता. नाथांनी 'गावबा हा ग्रंथ पूर्ण करील.' असे जाहीर केले. सर्व श्रोते चकीत झाले. पण नाथांनी गावबाच्या हातात लेखणी देऊन ग्रंथ पूर्ण करण्याची आज्ञा केली व त्याच्या मस्तकावर वरदहस्त ठेवला. गावबाने एकनाथांना नमस्कार करून तिथल्या तिथे एक अध्याय पुरा केला. मग त्याने पुढले अध्यायही पूर्ण लिहून काढले. त्यानंतर नाथांनी लगेच देहत्याग केला. ती वार्ता पैठणात पसरली व शेकडो लोक अंत्यदर्शनाला जमले. त्यात काही कुटाळ म्हणाले, 'इतर लोक मरतात तसाच हा मेला. या सत्पुरुषाचे वैशिष्ट्य ते काय?' नाथ तत्काळ उठून बसले. कुटाळ हा चमत्कार पाहून त्यांच्या चरणी लीन झाले. नाथ म्हणाले -

*सद्‌गुरु जनार्दन जनी । प्रत्यक्ष तुम्हा पाहतो नयनी ।*
*देवें मानुनी तुमची वाणी । अभिनव करणी दाविली हे ।।*
*भगवज्जनांचे मरण । कैंवि होय सकळा समान? ।*
*म्हणोनि येवढे महिमान । देवें आपण प्रकटविले ।।*

पुढे दिंडी तयार करून नाथ रस्त्यात कीर्तन करत लक्ष्मीतीर्थी पोचले व गोदावरीच्या पात्रात कंबरभर पाण्यात जाऊन देहत्याग केला.

गावबा पूर्वकर्मामुळे निर्बुद्ध जन्मला पण तो पूर्व जन्मीच्या योग्यतेचा पुरुष होता व कर्म संपल्यामुळे नाथांच्या स्पर्शाने त्यावर पडलेले पटल दूर होऊन तो आपल्या पूर्व पदाला पोचला. भगवान बुद्धांच्या चरित्रात अशीच कथा आहे. मागल्या जन्मीचा राजा शापाने निर्बुद्ध जन्मला व भगवान बुद्धांच्या प्रभावाने व मागले कर्म संपल्यामुळे परत पूर्वस्थितीत पोचला.

श्री. केशवचंद्र गंगाधर भडभडे
२०३, गणेशवाडी, डेक्कन जिमखाना,
पुणे ४११ ००४.

# श्री एकनाथमहाराजांची भारुडे

**श्रीमती मंदाकिनी गंधे**

**बी. एससी. एम. एड., श्रीगणेशदास राठी विद्यालय, अमरावती ३६ वर्षे अध्यापिका. शिक्षण मंडळावर गेली २५ वर्षे तज्ज्ञमार्गदर्शिका. गणिततज्ज्ञ. आध्यात्मिक ग्रंथ व संत वाङ्मय वाचनाची आवड. कीर्तन, प्रवचन आवड म्हणून करतात.**

*एका जनार्दनी संत तेचि तारु । भवाचा सागरु उतरिती ॥*

आनंद सर्व जीवांचे इष्ट आहे. पण सर्व जीवांना तो नित्य उपलब्ध नाही. निद्रेत काही काल आनंदाचा प्रत्यय येतो आणि जागृतीत प्रपंचभानाने मावळतो. अनुकूल विषयलाभ व प्रतिकूल विषयालाभ यामुळेही आनंद अल्पकाल अनुभवास येतो. तोही अखंड व निरतिशय नसतो. म्हणून ज्या जीवांना तो अनुपलब्ध आहे त्यांची त्याच्या प्राप्तीसाठी अखंड धडपड आहे, त्याकडे त्यांची नित्य प्रवृत्ती आहे.

स्वतःच्या आनंदरूपाचे अज्ञान हे जीवाला अखंड आनंद नसण्याचे कारण आहे. हे कारण निवृत्त होत नाही तोवर त्यांचे इष्ट त्याला अप्राप्त असणारच. जीवाला स्वसामर्थ्याने हे कारण दूर करणे अशक्य आहे. सत्कर्म, चित्तशुद्धी, भगवदुपासना, चित्तस्थैर्य, सद्गुरुबोध, आत्मज्ञान व आनंदावाप्ती हे आनंद लाभाच्या प्रवासातील टप्पे होत. ह्या प्रवासाचा अधिकारी मानवशरीरधारी जीव आहे हे वेगळे सांगणे नलगे. या प्रवासास निघालेल्या पथिकास परमार्थी म्हणतात.

[अज्ञजनास परमार्थाकडे वळवणे, मार्गदर्शन करणे आणि त्यांना सुखेनैव गन्तव्याप्रत पोहोचविणे यासाठी परमदयाळू संतांचे अवतार आहेत.] यासाठी संतांनी विपुल आध्यात्मिक वाङ्मय निर्मिती केली आहे. संत वाङ्मयाची भाषा अर्थगर्भ, मार्मिक, नेमकी रसाळ, परखड व प्रायः सुबोध आहे. हे वाङ्मय परमार्थ मार्गाच्या प्रत्येक टप्प्यावर पुरेसा प्रकाश टाकते.

अनंत जन्मातील प्रापंचिक संस्कारांनी संस्कारित चित्ताला प्रपंचातून बाहेर पडणे अवघड आहे. त्याचे आचार क्षेत्र व विचार क्षेत्र ही प्रपंचच आहे. ही बाब लक्षात घेऊन, 'पाण्यातून बाहेर पडण्याचा मार्ग पाण्यातूनच असतो' या न्यायाने संतांनी संसारातीलच प्रसंग, घटना, इ. चे दृष्टांत, रूपके वगैरे वापरून त्यांच्या गुणदोषांचे चित्रण केले व तद्द्वारा संसारी माणसास परमार्थाचा बोध केला. यातील रूपक काव्य फार प्रभावी काव्यप्रकार ठरला आहे. हे रूपक काव्य 'भारुड' या संज्ञेने संबोधिले जाते. 'बहुरुढ' या शब्दाचे 'भारुड' हे अपभ्रष्ट रूप असावे असे वाटते. व्यवहारात ज्या बाबी नित्य सरावात आहेत, रूढ झालेल्या आहेत त्या बाबी त्याच प्रकारच्या रूढ भाषेत मांडल्या म्हणजे अज्ञांचा कल वळतो. अशा वेळी केलेला उपदेश पचनी पडतो. प्रत्यक्षपणे गांभीर्याने केलेला बोध बहुधा रुचत नाही. अशा लोकांवर भारुडाद्वारे प्रभाव पाडणे शक्य आहे. भारुडातील विनोद, अद्भुतता, अन्योक्ती व मनोरंजन यांचा अपेक्षित परिणाम होतो. बहुतेक सर्व संतांनी भारुडे रचली आहेत. नाथ महाराजांनी ती सर्वाधिक लिहिली आहेत. इंदिरा प्रकाशनाने प्रकाशित केलेल्या श्री. जयवंत शंकर आवटे यांच्या 'श्री एकनाथ महाराज यांच्या अभंगाची गाथा' या ग्रंथाच्या चौथ्या आवृत्तीत (इ. स. १९५२) नाथांची १३२ भारुडे प्रकाशित केली आहेत. त्यांच्या नावाने आणखीही बरीच भारुडे नोंदविण्यात येत आहेत.

या भारुडांमधील काही प्रसंग, घटना, उदाहरणे आज कालबाह्य वाटतात. उदा. रहाट, सरोदा, कैकाई वगैरे. मात्र मनुष्य, प्राण्यांच्या स्वभावविशेषाच्या आधारे लिहिलेली भारुडे आजही सार्थ आहेत. उदा. कोल्हाटी, मुका, नकटी, डोंबारी, सर्प, विंचू वगैरे. 'स्त्री-पुरुषांचा शृंगार संबंध' ही मध्यवर्ती कल्पना घेऊन रचलेल्या भारुडांची संख्या फार मोठी आहे. प्राकृत जनांच्या चित्ताचा ठाव घेणारी ही कल्पना आहे. म्हणून तिचा मुक्तवापर आढळतो. या प्रकारातील भारुडे सौरी, बायला, दादला, पिसा, एडका, थट्टा, शंखीण-डंखीण, हळदुली, अष्टपदी, कानोबा, पिंगळा कहाणी, थाक आणि आणखी बरीच. या भारुडातील वेदांत फार उच्च कोटीचा आहे. विषयपोषण करण्यासाठी ही भारुडे नाहीत. तपस्वी विरक्त भक्तांची काव्यरचना संसार फिका करणारी असते.

**नाथांच्या भारुडांचे (सर्व संतांच्या भारुडांचेही) काही विशेष -**

१. मुख्य रस हास्य रस आहे. करुण रसाला स्थान नाही. 'कोडे' या भारुडातील या ओळी पाहा :

*आम्ही नवल देखिले माई । मुंगीने हत्तीशी केली लढाई ।*
*उंटाचा कान धरूनि बिमाई घरोघरी खातसे ॥ किंवा*
*नाथांच्या घरची उलटी खूण । पाण्याला मोठी लागली तहान ॥*
*हांडी खादली भात फेकिल्या । बकऱ्या पुढती देव कापिला ॥*

२. विनोद भारुडाचा आत्मा आहे.

३. मनोरंजन करणारे आणि सोबतच समाज प्रबोधन करणारे काव्य.

४. अभिनयप्रधानता यात आढळते.

उदा. 'सर्प भारुड' नाट्यपूर्वक सादर करता येते. ओळी आहेत

*साप चावला साप चावला ।*
*अगागागा । अबाबाबा । अताताता । अरेरे ॥ साप.*

असेच अभिनयप्रधान भारुड विंचू, रोडगा, दादला.

५. कूट स्वरूपाची भारुडे. यात भाषा ओळखीची पण अर्थ अति दुर्बोध. यांचा अर्थ सांप्रदायिक पृष्ठभूमी असल्याशिवाय उमजत नाही.

उदा. वर १) मधील कोडी पाहावी.

६. समाजप्रबोधन हा हेतू आहे. 'शकून' या भारुडात भविष्य सांगताना महाराज म्हणतात -

*निर्गुण निराकार दादा माहूर माझे गाव । शकून सांगावया आले यमाई माझे नाव ॥ कलियुगाची दादा ऐकावी थोरी । पुत्र पुत्र तो होईल पित्याचा वैरी । भ्रतारा सोडूनी घरोघरी फिरतील नारी । ऐसा माझा शकून ऐका दादा निर्धारी ॥*

*आणिक दादा ऐका माझा बोल । पृथ्वीवरती वारा थोर झुंजाट सुटेल । थोर थोर दादा पर्वत उडोनि जातील । अठराही जाती एके ठिकाणी जेवतील ॥*

या भविष्यात बरेच तथ्य असल्याचे हल्ली जाणवू लागले आहे. सावध व विवेकी चित्ताने वर्तणूक केल्यास या परिस्थितीला आटोक्यात ठेवणे शक्य होईल. हे भविष्यकथन केवळ माहितीरूप नसून बोध घेऊन समाजाने सुधारावे यासाठी आहे.

नाथांचा 'वासुदेव' पहाटेच्या वेळी लोकांना जागवीत फिरताना म्हणतो आहे -

*करजोडूनी विनवितो तुम्हा । तुम्ही वासुदेव वासुदेव म्हणा ॥*
*नका गुंतू विषय कामा । तुम्ही आठवा मधुसूदना ॥*
*नलगे तीर्थांचे भ्रमण । नलगे दंडण मुंडण । न लगे पंचाग्निसाधन । तुम्ही आठवा मधुसूदना ॥*

भवसागर पार करण्याविषयी मोलाचा उपदेश करणारा नाथांचा 'जोशी' बोलतो बघा -

*आम्ही अलक्षपुरचे जोशी । शकून सांगतो निश्चयेसी ।*
*तेणे चुकती चौऱ्यांयशी । मी निर्गुण पुरचा जोशी ।*
*होरा ऐका दादांनो ॥*
*नका जाऊ मना मागे । थोर थोर जाहले दगे । मी बोलत नाही वाडगे । सावध राहा दादांनो ।*

७. वेदान्त तर भारुडाचा गाभाभूत भाग आहे. नाथांची कोल्हाटीण पुरेशी बोलकी आहे.

*सगुण गुण माया । आली कोल्हाटीण खेळाया ॥ प्रपंचाचा रोविला वेळू । चौशून्यात मांडिला खेळू । ब्रह्माविष्णु जियेचे बाळू । लागती पाया ॥ आला निर्गुणचा कोल्हाटी । सोऽहं शब्दे ढोलके पिटी । उघडुनि चैतन्याची दृष्टी । चला जाऊ पाहा या ॥*

नाथांचा पिसा पाहा कसा वेदांती आहे -

*एका पिसाळला एका पिसाळला । मायराणीचा अभिलाष गेला ।*
*उफराटे झाले डोळे । एका जनार्दनी देखे न कळे ॥*

८. दंभ, ढोंग, अनिष्ट रुढी यावर लिहिताना नाथांच्या लेखणीला कोणाचा मुलाहिजा नाही. स्पष्टपणाची कमाल पाहा नाथांच्या 'संन्यासी' मध्ये -

*संसार व्यर्थ सांडिला । मुलाबाळा तुटी पाडिला । नारायण नाही जोडिला । सावध होई ॥ वर वर शेंडी बोडी । जानवे तोडुनि धोत्रे फाडी । हाती घेऊन दंड लाकडी । सावध होई ॥ वर वर म्हणसी नारायण । आत विषयांचे ध्यान । कासया संन्यास घेऊन । सावध होई ॥*

९. भारुडातील रूपके अप्रतिम आहेत. त्यांची 'गाय' पाहा कोणती आहे -

*संतनाम गाय संत नाम गाय । संत नाम गाय कामधेनू ॥*
*सदासर्वकाळ दुभे भक्ता लागी । उणे पाहता अंगी धाव घाली ॥*

भारुडातील रूपकांसाठी निवडली क्षेत्रे येणेप्रमाणे आहेत. १) वस्तू - पाळणा, चौघडा, रहाट, मोती, बाहुले, टिळा, किल्या वगैरे

(२) खेळ - फुगडी

३) शारीरिक व्यंगे - आंधळा, पांगळा, मुका, बहिरा, नकटी, आंधळा-पांगळा, पिसा.

४) प्राणी - विंचू, सर्प, गाय, बैल, एडका, कुत्रे, वटवाघुळ, पिंगळा, टिटवी, पोपट

५) सेवक विशेष - वाघ्या, मुरळी, भुत्या, वासुदेव, फकीर

६) व्यवसाय - जोशी, वेसकर, जागल्या, कोल्हाटी, चोपदार, डोंबारी, सरोदा, वैदू

७) जाती - माळी, जंगम, महार, मांग, भटिण वगैरे

८) नातेसंबंध - दादला, मुलगी, सासू

९) देवदेवता - महालक्ष्मी, यलमा, मरीआई, सटवाई, अंबा

१०) सण/प्रसंग - होळी, गोंधळ, मल्हारीची वारी, शिमगा, लग्न

११) विधि - अर्ज, अभयपत्र, जाब चिठ्ठी, ताकिदपत्र, कौलपत्र, धावा, जागर, भूत, स्वप्न, व्यापार, जमाखर्च, नवल, कोडे, संन्यासी, संसार, जोहार आणि आणखी कितीतरी.

ही सर्व भारुडे वाचली म्हणजे लक्षात येते, की नाथांचा विविध क्षेत्रांचा चौफेर अभ्यास व सूक्ष्मनिरीक्षण किती समृद्ध होते. प्रत्येक क्षेत्रातील नेमके गुणविशेष हेरून त्यांचे मार्मिक प्रतिपादन करून वेदांतातील गहन संबोधांची उकल करण्यात नाथांचा हात कोणी धरू शकत नाही. त्यांची ही अप्रति क्षमता माणसाला थक्क करते. नमुन्यासाठी दोन-तीन भारुडे पाहू.

१. 'नकटी' मध्ये फार मनोरम पद्धतीने निर्दोष भजन पद्धती त्यांनी विशद केली आहे.

*काजळ कुंकू माथा वेणी । नकटी सुंदर म्हणेल कोणी ॥*
*एका जनार्दनी भावेवीण । कुसरीचे भजन ते नकटेपण ॥*

सौंदर्यात नाकाचे स्थान अनन्य साधारण आहे. कितीही शृंगार केला तरी नाकाच्या देखणेपणाअभावी तो शृंगार व्यर्थच. वाद्ये, तालस्वराचे ज्ञान, मोहक संगीत असूनही भगवद्भाव नसेल तर भजन भगवंताला प्रिय होत नाही. ते भजन केवळ भोगासाठी ठरते. आनंदलाभ हे या भजनाचे फल नाही. कबीर महाराज म्हणतात, 'सूर सुना एक भक्ति बिना'' ॥

२. अविवेक किंवा अहंकार यांचा अंमल ज्याच्या जीवनावर जबरदस्त आहे त्याचे इह व पर दोन्ही सुखापासून वंचित असतात. नाथांचा 'दादला' यावर पुरेसा प्रकाश टाकतो.

अरेरावी, आत्मकेंद्री, उन्मत्त व सतत बेचैन असणारा पती ज्या स्त्रीच्या नशिबी आला असेल तिच्या दैन्य दुःखाला सीमा नाही. त्या

अभागिनीला शेवटी वैताग येतो व ती म्हणते मला नवराच नको. हा प्रापंचिक अनुभव या भारुडात वापरला आहे. जीव प्रकृती आहे. (प्रकृतिं विद्धि मे परां जीवभूताम् |) तिचा ताबा अहंकार / अविवेकाने घेतला म्हणजे जीव कष्टी होतो.

*जोंधळ्याची भाकर आंबाड्याची भाजी । वर तेलाची धार नाही ॥ मला दादला नलगे बाई ॥*

पोटभर व चांगले अन्न नाही म्हणजे संतोष नाही व तेलाची धार नाही म्हणजे कुठे जिव्हाळा, प्रेम, गोडी, या बाबी अहंकाराबरोबरच्या संसारात सापडत नाहीत.

*मोडका पलंग, तुटकी नवार । नरम बिछाना नाही ॥ मला....*

अविवेकी वा अहंकारी जीव कोणत्याच परिस्थितीत स्वस्थ, शांत नसतो. विषयांसाठी अव्याहत धडपड, परिणामी शीण. विश्रांतीची सोयच नाही. विषयांच्या राज्यात विश्रांती ही बाब अशक्य आहे.

*एका जनार्दनी समरस झाले । तो रस येथे नाही ॥ मला- - - -*

नाथ माऊली म्हणते - जनार्दन पदाशी रत झाल्यावर ज्या सुखाचा लाभ झाला ते सुख अहंकारा / अविवेकाच्या संगतीत नाही म्हणून माझा (जीवाचा) यांचेशी संबंध तुटावा हे ठीक. हा असा दादला नको म्हणून अन्य भारुडांत ते म्हणतात -

*दादला मारुनि आहुति देईन । मोकळी कर ग मला । भवानि आई रोडगा वाहीन तुला ॥*

३) महालक्ष्मी - समाजात अनागोंदी, भ्रष्टाचार, दौर्जन्य इ. चे राज्य पसरले म्हणजे समाजजीवन विस्कळित होते. सुधारणेसाठी सामान्य जनता समर्थ नसते. अशा वेळी सुजन पण दुर्बल हृदये परमेश शक्तीला आर्त हाकेने साहाय्यार्थ आवाहन करतात. तिच्या दारी जाऊन प्रार्थना करतात.

*'बया दार उघड, बया दार उघड ॥ अलक्षपुर भवानि दार उघड, माहूरलक्ष्मी दार उघड । कोल्हापूर लक्ष्मी दार उघड, तुळजापूर लक्ष्मी दार उघड ॥ बया दार उघड ॥'*

पूर्वी या शक्तीने अनेक अवतार घेऊन आसुर शक्तीचा नायनाट केला तसा आताही करण्यास तिने शस्त्रधारी होऊन भक्त साहाय्यार्थ यावे. प्रत्येक काळात मानवी बळास ईशबळाचे साहाय्य आवश्यक आहे. ही शक्ती दयाळू आहे.

*एका जनार्दनी माऊली । करी कृपेची साऊली । भक्तजया कारणे बया दार उघड ॥*

समाजातील आसुरी थैमान जसे भयानक तसे अंतःकरणात आसुरी संपत्ती बळावली, की सुखनाश होतो. आसुरी संपत्तीवर विजय मिळवण्यासाठीसुद्धा परमेश साहाय्याची तितकीच गरज आहे. म्हणून भावपूर्ण शब्दांत म्हटलेच पाहिजे 'बया दार उघड ।'

एवं नाथांची सर्व भारुडे श्रवणीय आहेत, मननीय आहेत, वाचनीय आहेत अभ्यासनीय आहेत. भाषा प्रापंचिक पण परिणाम पारमार्थिक असणारी ही भारुडे सर्वांना शुभंकर आहेत. संत श्री एकनाथ महाराज की जय ।

मंदाकिनी गंधे
अंबापेठ, अमरावती.

# "एकनाथ पंचक"

सौ. सुनीता सदानंद तांबे

एम फिल (मराठी) 'रत्नाकर मतकरींच्या एकांकिका' हा विषय. एस.एन.डि.टी. मुंबईमधून मराठी पत्रकारिता हा लघुकोर्स पूर्ण. एस.एन.डि.टी. मुंबई येथे १९८७ मध्ये ३ महिने अभ्यागत व्याख्याता. संध्या कला व वाणिज्य महाविद्यालय दापोडी व केसरी संघवी कॉलेज पिंपरी येथे अभ्यागत व्याख्याता. २०/२२ लेख व लघुकथा प्रकाशित. काही कथा बक्षीसपात्र. एकनाथ पंचक या विषयावर पी.एचडीसाठी संशोधन सुरू.

## आरंभिक

'पंचक' याचा अर्थ पाचांचे, पाचांचा समूह ! ऋग्वेद काळी हा शब्द जनमानसात रुजला असावा. त्या काळी आर्य लोक अनेक जनात (समुदायात) विभागले होते. त्यातील पाच प्रमुख 'ज्ञानी' पुरुष इतके प्रसिद्ध होते की देवांबरोबर त्यांची गणना होत असे. 'पंचकाची' संकल्पना वेदकालीन त्या पाच जनप्रमुखांवरूनच पुढील काळात प्रसारित झाली असावी. त्यानंतरच्या शंकराचार्यांच्या काळात संपूर्ण समाज निरनिराळ्या धर्मपंथात विभागला गेल्याने समाजात अनेक देव-देवतांचे प्रस्थ माजले आणि त्यांच्या उपासकात श्रेष्ठत्वाविषयी वैमनस्य निर्माण झाले. परिणामी जैन-बौद्धांसारख्या अवैदिक धर्मपंथांचा समाजावरील प्रभाव वाढला म्हणूनच गणेश, सूर्य, विष्णू, शिव आणि देवी या पाच प्रमुख देवतांचे 'पंचायतन' स्थापून त्यांची एकत्रित पूजा घरोघरी करण्याविषयी शंकराचार्यांनी समाजाला दंडक घालून दिला. उपास्यांची अनेकता असली तरी सर्व देवता मुळात एकच आहेत. *'एकं सत् विप्रा बहुधा वदन्ती'* (ऋ. मं. १ : १६४) असा अद्वैत विचार त्याद्वारे समाजात प्रसृत झाला. पांगारकरांच्या मते 'पंचायतनाची' कल्पना सृष्टीतील पृथ्वी, आप, तेज, वायू आणि आकाश या पंचमहाभूतांवरूनही सुचली असावी.

श्रीशंकराचार्यांच्या पंचायतनामागील अद्वैत प्रतिपादक संकल्पनेत 'एकोहऽम्'चा निनाद होता त्याचप्रमाणे 'अहं ब्रह्मास्मि' विषयीचा दृढ विश्वासही होता. त्या पुढीलच्या यादवकाळात वारकऱ्यांचे 'ज्ञानेश्वर पंचायतन' मध्ययुगीन काळात भागवत धर्मियांचे 'एकनाथ पंचायतन' आणि शिवकाळात समर्थ संप्रदायाचे 'रामदास पंचायतन' असेच लोकरूढ बनून गेले. संत ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ, तुकाराम आणि रामदास हे महाराष्ट्राचे 'संत-पंचायतन' मराठी सारस्वतात गेल्या शेकडो वर्षांत लोकादरास पात्र झाले ते याच विशिष्ट सहिष्णु, उदार व समन्वयात्मक भूमिकेनेच.

## एकनाथपंचकांचा काळ

कोणत्याही कवीच्या काळातील भोवतालची परिस्थिती अथवा वातावरण त्याच्या साहित्य निर्मितीस प्रेरणा देत असते. 'एकनाथपंचका'च्या काळाचा विचार म्हणूनच प्रथम आवश्यक ठरतो. 'एकनाथ पंचका'चा काळ दक्षिणेतील विजयनगरच्या हिंदू साम्राज्याचा अस्त व बहामनी राज्याचा उदय अशा संक्रमणावस्थेचा होता. याच वेळी उत्तरेकडील मोगल सम्राट अकबराचे सैन्यही संत एकनाथांच्या खुद्द पैठणपर्यंत येऊन ठेपल्याने येथील मुसलमान राज्यकर्त्यांना आसपासच्या हिंदू राजे-सरदारांचे साहाय्य घ्यावे लागले. स्वार्थांधता, स्वाभिमानशून्यता व प्राणभयाने ते देखील राज्यकर्त्यांच्या मदतीत पुढाकार घेत. त्या बदल्यात त्यांना वतने, इमाने, सरकारदरबारी मानमरातब प्राप्त होत. निंबाळकर, घोरपडे, शिर्के, जाधव, माने, भोसले, इ. मराठा सरदारांचा लौकीक त्याद्वारेच वाढला. महाराष्ट्रातील निजामशाहीचा विकास व ऱ्हासही एकनाथांच्या काळाशी निगडीत होता. त्या काळात राज्यकर्ते व प्रजेच्या धर्मात प्रथमच विरोध निर्माण झाल्याने मंदिरांचा विध्वंस, मूर्तींची विटंबना, अन्याय, अत्याचार, बाटवा-बाटवी, स्त्रियांचा अनावर इ. प्रकार सर्रास घडत. त्यातच सूफी साधुंनीही आपल्या आचार-विचारांनी अप्रत्यक्षपणे येथील प्रजेची मानसिकता बदलून टाकली. परिणामी ती पीरांची पूजा बांधू लागली, उरुसात नाचू लागली, क्षुद्र देव-देवतांच्या भजनी लागली. त्यांचे वेषही बदलले. संत एकनाथांनी लिहिले, *"म्लेंच्छे गांजिले देवभक्ता । महिमा उच्छेदिला सर्वथा ।"* समाजात रुढी, परंपरा, अंधश्रद्धा यांचा अतिरेक होऊन प्रजा खरा धर्म विसरली. स्वार्थी धर्ममार्तंडांनी गोरगरीबांना कर्मठ आचार-विचारात, व्रत-वैकल्यात, पोथ्या-पुराणात गुंतवून टाकले.

धर्मजागरण अथवा आध्यात्मिक उद्बोधन ही त्या काळाची एक महत्त्वाची गरज होती. वैदिक धर्मातील आचार-विचार टिकवून ठेवण्याच्या दृष्टीने दत्तसंप्रदायाने त्या काळात ब्राह्मण वर्गात जागृती घडवून आणून ती गरज बहुतांश पूर्ण केली. त्याचबरोबर नाथ, वारकरी, गाणपत्य, आनंद, नागेश, वीरशैव, महानुभाव इ. संप्रदाय व जैन साधुंनीही या काळातील धार्मिक-सांस्कृतिक आक्रमणाचा आपापल्या परीने प्रतिकार केला. कीर्तन-प्रवचन, धर्म-संकीर्तन आणि ग्रंथनिर्मिती कार्यास त्यांनी मोलाचा सहभाग दिला. लोकरंजनातून जनजागरण सुरू केले. त्यासाठी संस्कृतातील ज्ञानभांडार लोकभाषा मराठीत आणले. संत एकनाथांनी म्हटले,

*"वैकुंठीचा दारवठा उघडा केला की जी मायबाप ।"*

राज्यकर्त्यांमुळे व्यवहारात फारसी भाषेचा वापर सुरू झाला आणि ग्रामपंचायतीतील वतनबद्ध बलुतेदारीत मुसलमानांचा प्रवेश झाल्याने सर्वच क्षेत्रात हळूहळू समन्वयपण येत गेले.

## संत एकनाथ (इ. स. १५३३ ते १५९९)

'एकनाथ पंचका'तील सर्व प्रसिद्ध, लोकप्रिय आणि सतत कार्यरत असणारे संत एकनाथ पैठणचे रहिवासी ! परंपरेने ते सूर्योपासक व

वारकरी, गुरुपरंपरेने दत्तसांप्रदायिक आणि सूफी साधुंशीही त्यांचा संबंध आलेला दिसतो. विजयनगरहून विठ्ठलमूर्ती परत पंढरपुरास आणणारे संत भानुदास त्यांचे पणजोबा. *'आमुचिये कुळी पंढरिचा नेम । मुखी सदा नाम विठ्ठलाचे'* असे संत भानुदासांनी सांगितले आहे. हे घराणे विद्वान, सदाचारसंपन्न अशा देशस्थ ऋग्वेदी विश्वामित्री गोत्री ब्राह्मणाचे. पिता सूर्यनारायण व माता रुक्मिणी देवी यांच्या उदरी एकनाथांचा जन्म पैठण येथेच इ. स. १५३३ मध्ये झाला. त्यांच्या बालपणीच माता-पित्यांचे छत्र हरपल्याने त्यांच्या आजी-आजोबांनीच त्यांचे पालन-पोषण केले. घरातील संस्कारपूर्ण वातावरणाने परमार्थाची आवड उत्पन्न होऊन एके दिवशी त्यांनी देवगिरीच्या संत जनार्दन स्वामींकडे प्रस्थान ठेवले. *''जनार्दन पंत ज्ञानराशी । दत्तात्रेय दर्शन देत त्यांसी ।''* अशा साक्षात्कारी गुरुंनी एकनाथांचा प्रामाणिकपणा, सदाचार, अभ्यासूवृत्ती, चिकाटी आणि ईश्वरनिष्ठा पाहून शिष्य म्हणून त्यांचा स्वीकार केला. त्यानंतर एकनाथांचे परब्रह्म सद्गुरुच होऊन गेले. एकनाथी भागवतात त्यांनी आपली गुरुपरंपरा सांगितली ती अशी : नारायण > विधि > अत्रि > दत्तात्रेय > जनार्दन > एकनाथ.

जनार्दन स्वामींजवळ एकनाथांनी प्रस्थानत्रयीसह अनेक शास्त्रे व ज्ञानेश्वरीचे सखोल अध्ययन केले. सुलभ पर्वतावर तपश्चर्या केल्यानंतर स्वामींनी त्यांना श्रीदत्तात्रेय दर्शन घडविले. *'दत्त सबाह्य अंतरी । दत्तात्रेय चराचरी'* अशी परमानंदावस्था त्यांना प्राप्त झाली. त्यानंतर सद्गुरुंच्याच आज्ञेने त्यांनी भारतभर डोळसपणे तीर्थयात्रा केली आणि अंतर्मुख होत त्यांनी आपले जीवितध्येय निश्चित केले. तीर्थयात्रेहून परतताना त्यांनी अंबेजोगाईस दासोपंतांची तसेच बीड येथे जनीजनार्दनांचीही भेट घेतली. त्यांच्याबरोबर चर्चा-सुखसंवाद केले. इतर समकालीन संतांनीही त्यांच्या भेटी घेतल्या. या सर्वांच्या पार्थिव सहवासातूनच जनसामान्यात त्यांच्यातील एकीची-एकतेची कल्पना आली असावी. पैठणास परतल्यावर गुरू जनार्दनांच्याच आदेशानुसार त्यांनी गृहस्थाश्रम स्वीकारला आणि पैठण हीच आपली कर्मभूमी मानली. इतर संत कवींप्रमाणे संत एकनाथांच्या जीवनचरित्रातही अनेक आख्यायिका प्रसिद्ध आहेत.

एकनाथी भागवत, (टीका-प्रबंध), रुक्मिणी स्वयंवर, भावार्थ-रामायण (आख्यानके) स्फुट प्रकरणे (तत्त्व प्रतिपादन), असंख्य अभंग, भारुडे (लोकनाट्ये - लोकगीते), चरित्रे, स्तोत्रे, गौळणी, विराण्या, आरत्या, पदे, पाळणे, कूट रचना, संवादात्मक प्रकरणे अशा वैचित्र्यपूर्ण व वैविध्यतापूर्ण रचना संत एकनाथांच्या नावे उपलब्ध आहेत. कीर्तन-प्रवचनाद्वारे जन-जागरण व धर्मसंवर्धन, ज्ञानेश्वर समाधी जीर्णोद्धार, ज्ञानेश्वरीचे संपादन, तिचे पारायण आणि आळंदी वारीची पुन्हा सुरुवात हे त्यांचे ऐतिहासिक कार्य आजच्या काळातही महत्त्वपूर्ण ठरते.

शंकराचार्य आणि ज्ञानेश्वर या पूर्वसूरींविषयी त्यांच्या मनात अतीव प्रेमादर होता. श्रीमत् शंकराचार्यांचे अद्वैतमत आत्मसात करून आपल्या सर्व रचनांतून त्यास पुरस्कारिले. *'कैवल्याचा पुतळा । प्रगटला भूतळा ।। चैतन्याचा जिव्हाळा । ज्ञानोबा माझा ।।'* अशीच ज्ञानदेवांविषयी ते आत्मीयता दर्शवून जातात. अस्पृश्योद्धाराचे त्यांचे कार्य त्यांचे द्रष्टेपण दर्शविते तर अनेक आख्यायिका समाज-मनस्कता, सामाजिक समरसता जाणून घेण्यास मदत करतात. एकनाथांचे महत्त्व त्यांच्या ग्रंथसंपत्तीत तर आहेच परंतु त्याहीपेक्षा त्यांनी काळाचे आव्हान स्वीकारून महाराष्ट्राला जे जीवदान मिळवून दिले त्यात जास्त आहे. संत एकनाथ हे हरि-हर, सगुण-निर्गुण, ज्ञान-योग, कर्म-भक्ती, प्रपंच-परमार्थ, आचार-विचार यांच्या ऐक्याचा-समन्वयाचा, सहिष्णुतेचा मूर्तिमंत आविष्कार होता. 'सर्वांभूती भगवद्भाव' हेच त्यांच्या जीवनाचे सार म्हणता येईल.

## एकनाथांची प्रभावळ

संत एकनाथ हे मध्ययुगीन कालखंडातील एक प्रभावशाली व्यक्तिमत्त्व होते. साहजिकच त्यांचा तत्कालीन ज्या ज्या संत सत्पुरुषांशी प्रत्यक्ष संपर्क आला, विचारांची देवाण-घेवाण झाली, त्यातून त्यांच्या कार्याचे मोल त्या सर्वांनी जाणले आणि ते प्रभावीत झाले. परिणामी एका नव्या जाणिवेतून त्यांनी संत एकनाथांच्या रचनांचा मागोवा घेतच आपली ग्रंथरचना सुरू केली. या सर्व संतांचा समावेश एकनाथांच्या प्रभावळीत केला जातो. दासोपंत, रामा, जनार्दन, जनी जनार्दन, विठा रेणुकानंदन, शिवकल्याण, विष्णुदासनामा, त्र्यंबकराज, कृष्णदास मुद्गल, कृष्ण दयार्णव, कृष्ण याज्ञवल्की, रमावल्लभदास, मुक्तेश्वर, महालिंगदास, शांतालिंग, मन्मथशिवलिंग, मधुकर, मोरया गोसावी इ. प्रमुख कवी तर त्यात येतातच परंतु या व्यतिरिक्त त्यांच्या प्रभावाने प्रेरीत झालेले त्याच काळातील कैशव चैतन्य, मृत्युंजय, हुसेन अंबरखान, शेख महंमद, फादर स्टीफन्स, फादर क्रुवा, मेघा, गुणकिर्ती, इ. अन्य धर्म-पंथीय संतही आहेत. या सर्वांना एकनाथांची अद्वैतनिष्ठा, ज्ञानेश्वर-प्रेम, भक्तवत्सलता, संस्कृतज्ञ असूनही मराठीचा अभिमान, इतर भाषांतूनही रचना, समन्वयशीलता, उदारता, सहिष्णुता आणि समाजमनस्कता प्रभावित करून गेली. एखाद्या मिशनप्रमाणे त्यांनी त्या काळात ग्रंथनिर्मितीचे कार्य केले. आपल्या लेखनकार्याद्वारा त्यांनी संत एकनाथांच्या धर्मसंकीर्तन व समाजप्रबोधनाच्या कार्यास महत्त्वाचा हातभार लावला असे म्हणता येते. *'साधु दिसताती वेगळाले । परी ते स्वरूपी मिळाले ।'* अशीच त्यांची ख्याती झाली. मात्र असे असूनही संत एकनाथांच्या प्रभावळीतील दासोपंत, रामा जनार्दन, जनी जनार्दन, विठा रेणुकानंदन या चार संत-सत्पुरुषांचाच समावेश 'एकनाथपंचकात' झालेला आहे. प्रभावळीतील हे चार संत व स्वतः एकनाथ मिळून 'एकनाथपंचक' त्या काळात पुढे आलेले दिसते.

## नाथपंचकातील कवी

।। दासोपंत ।। (इ. स. १५५१-१६१५)

संत एकनाथांच्या खालोखाल महत्त्वाचा असा हा कवी आहे. प्रचंड ग्रंथनिर्मिती करणाऱ्या दासोपंतांचा जन्म नारायण पेठ येथील विद्वान देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण दिगंबरपंत व साध्वी पार्वतीबाई यांच्या उदरी झाला. दोघेही ईश्वरभक्त तसेच परोपकारी होते. एका दुष्काळात प्रजेची अन्नान्न दशा पाहून, कमाविसदार असलेल्या दिगंबरपंतांनी सरकारी गोदामातील धान्य आपल्या अधिकारात खुले केले. परिणामी बादशहाने

महिन्याभरात दोन लक्ष रुपये सरकारी तिजोरीत भरण्याचा त्यांना आदेश दिला. तोपर्यंत दासोपंतांना ओलीस ठेवून घेतले. दासोपंतांच्या बालमनावर या घटनेचा विलक्षण परिणाम झाला. बंदिवासात त्यांनी ईश्वराची आराधना आरंभिली. महिन्याच्या अखेरच्या दिवशी 'दत्ताजी पाडेवार' नावाच्या माणसाने दंडाची रक्कम भरल्याने दासोपंतांची सुटका झाली. घरी परतल्यावर रिवाजाप्रमाणे त्यांचे लग्न झाले. परंतु मुळातच विरक्त वृत्ती असलेल्या दासोपंतांनी काही दिवसांनी गृहत्याग केला. तीर्थयात्रा करीत राक्षसभुवनी आल्यावर तेथे त्यांनी कठोर तपश्चर्या आरंभिली आणि त्यांना श्रीदत्तात्रेयाचा साक्षात्कार घडून आला. साक्षात्कारानंतरच्या तीर्थप्रवासात वाणी संगमी त्यांची आपल्या कुटुंबियांसी गाठ पडली आणि सीतोपंत या आपल्या शिष्याच्या विनंतीवरून ते सहकुटुंब अंबेजोगाईस स्थायिक झाले. काशीहून परतताना संत एकनाथांनी त्यांची भेट घेतली. उत्सव-यात्रा प्रसंगी एकनाथांचा व इतरही संत सत्पुरुषांचा सहवास त्यांना प्राप्त झाला. त्यांच्या भेटीगाठींनंतरच दासोपंत आपल्या ग्रंथरचनेकडे वळले.

तीर्थयात्राकाळात दासोपंतांनी प्रस्थानत्रयीसह अनेक ग्रंथांचा अभ्यास केला. शिवाय ज्ञानेश्वरी, अमृतानुभव, योगवाशिष्ठ इ. धर्मग्रंथांच्या अभ्यासातून त्यांचा प्रचंड ग्रंथसंभार निर्माण झाला. त्यात 'गीतार्णव' सह पाच-सहा गीताटीका, दत्तमाहात्म्य, ग्रंथराज, प्रबोधोदय, वाक्यवृत्ती, वेदांतसारसंग्रह, पासोडी, सव्वा लाख ओव्यांचा पदार्णव, असंख्य स्तोत्रे, नामावळ्या, आरत्या, ललिते, पूजामंत्र इ. विविध व वैचित्र्यपूर्ण रचना आहेत. मराठीबरोबरच संस्कृतातूनही त्यांची असंख्य रचना उपलब्ध आहे. हिंदी, तामीळ, तेलगु, कन्नड, अशा इतरही भाषेत त्यांच्या रचना आढळतात. चार फूट रुंद व चाळीस फूट लांब कापडावर चित्रकृतींच्या चौकटीत मजकूर बसवून निर्मिलेला 'पंचीकरण' ग्रंथ हा जगातील पहिला कापडग्रंथ 'मराठीचे महावस्त्र' म्हणून डॉ. राजेंद्रप्रसाद यांनी त्यास गौरविले आहे. 'ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या' या शांकरमताचे पडसाद त्यांच्या ग्रंथात स्पष्टरीत्या उमटले आहेत. त्यांची मधुर, रसाळ पदे मराठवाड्यात लोकप्रिय आहेत. दासोपंतांच्या जीवनातही अनेक आख्यायिका प्रसिद्ध आहेत. त्यांच्या 'ग्रंथराजा'ची छाप रामदासांच्या दासबोधावर स्पष्टरीत्या पडलेली आहे. संस्कृतज्ञ असूनही मराठीचा जाज्वल्य अभिमान, ज्ञानेश्वर प्रेम, अद्वैतनिष्ठा, ईश्वर शरणता, कीर्तनभक्ती, विद्वत्ता, रचनेचे पंडिती वळण इ. त्यांचे रचनाविशेष होत. दत्तभक्त असलेले दासोपंत समाजविन्मुखतेनेच मराठी सारस्वतात संत एकनाथांच्या तुलनेत मागे पडले.

॥ रामा जनार्दन ॥ (अंदाजे इ. स. १५६९)

एकनाथपंचकातील तिसरे कवी रामाजनार्दन हे संत एकनाथांचे गुरुबंधू व जनार्दनस्वामींचे स्वकुलगोत्र (शुक्ल यजुर्वेदी वाजसनेयी ब्राह्मण) शिष्य होते. एकनाथपंचकात रामा जनार्दनांचे एक वैशिष्ट्यपूर्ण स्थान आहे. मात्र त्यांच्या काव्याविषयी तसेच जीवनचरित्रासंदर्भात फारच अल्प माहिती उपलब्ध आहे. डॉ. रा. चिं. ढेरे यांनी त्यांच्यासंबंधी थोडीफार माहिती दिलेली आढळते. त्यांचे पूर्वज गोदावरीकाठावरील ओझर या गावाकडे राहणारे. पुढील काळात ते पाटण या गावी स्थायिक झाले. त्यांचे उपनाम बुर्कुले. जनार्दन स्वामींनी आपली देशपांडेपणाची वृत्ती इ. स. १५४९ मध्ये आपणहून रामाजनार्दनांना बहाल केली. तेव्हापासून देशपांडेपणाचा हक्क त्यांच्याच घराण्याकडे अबाधितपणे चालू राहिला. 'एकनाथपंचकातील' त्यांचा समावेश त्यांनी रचलेल्या ज्ञानेश्वरांच्या एका आरतीनेही स्पष्ट होऊ शकतो. सुमारे चारशे वर्षांपासून वारकरी संप्रदायात प्रचलित असलेली ज्ञानेश्वरांची आरती महाराष्ट्रात आजही लोकप्रिय आहे. विठ्ठलाची (अनंतमूजाची) व ज्ञानेश्वरांची आरती तसेच सद्गुरुविषयक दोन स्फुटे व संतलक्षणविषयी एक अभंग इतकीच रचना रामाजनार्दनांच्या नावे आज उपलब्ध आहे. परंतु एवढ्या अल्प रचनेतूनही रामाजनार्दनांचा पारमार्थिक अधिकार जाणवतो. ज्ञानेश्वरांच्या आरतीतील 'कैवल्यतेज', 'पांडुरंगाचा अवतार' ही ज्ञानेश्वरांची विशेषणे त्यांच्या समग्र व्यक्तिमत्त्वावर प्रकाश टाकून जातात. 'प्रगट गुह्य बोले' आणि 'विश्व ब्रह्मचि केले' या शब्दांत रामजनार्दनांनी ज्ञानेश्वरांच्या समग्र जीवनकार्याचे जणू सारच भक्तांपुढे ठेवलेले आहे. त्यांनी रचलेली सद्गुरु जनार्दनस्वामींची आरतीही अशीच अर्थघन व लक्षणीय आहे. 'विठ्ठल' हे त्यांचे उपास्यदैवत होते तर 'ज्ञानेश्वर' हे महनीय श्रद्धाकेंद्र होते. वारकऱ्यांच्या पंचारतीत म्हणूनच त्यांच्या ज्ञानेश्वरारतीचा समावेश झाला असावा.

रामा जनार्दन कवी असले तरी प्रथमतः ते संत होते. भक्त होते. काव्य हे त्यांच्या भक्तीचे साधन होते. ईश्वरशरणता, अद्वैतनिष्ठा, विश्वात्मकता, सद्गुरुविषयक आत्यंतिक प्रेम, जनजागरणाचे भान इ. गोष्टी त्यांच्या या अल्प रचनेतूनही स्पष्ट होतात. संत एकनाथांशी त्या दृष्टीने असलेला त्यांचा अनुबंध महत्त्वाचा आहे.

विठा रेणुकानंदन (इ. स. १५७८ चा सुमार)

'एकनाथपंचका'तील विठा रेणुकानंदन हे चौथे संतकवी ! शुक्ल यजुर्वेदीय वत्सगोत्री ब्राह्मण. मूळचे नगर जिल्ह्यातील अकोळनेरचे राहणारे. त्याच गावचे कुलकर्णीपद त्यांच्या नावे होते. त्यांचे घराणे माहुरच्या रेणुकादेवीचे उपासक. बालपणीच्या उत्तम संस्कारांनी त्यांचा पिंड पोसल्याने तेही देवीचे उपासक बनले. वयाच्या चौदाव्या वर्षी रेणुकेने स्वप्नादेश देऊन त्यांना माहुरला दर्शनार्थ बोलावून घेतले. परंतु वाटेत गोलटगावी मामांची गाठ पडल्याने त्यांना माहूर गाठता आले नाही. गोलटगावच्या वास्तव्यात त्यानंतर गावाबाहेरच्या टेकडीवर असलेल्या रेणुकादेवीच्या मंदिरात ते नित्यनेमाने दर्शनार्थ जाऊ लागले. तेथेच त्यांनी रात्रंदिवस देवीची उपासना आरंभिली आणि कठोर परिश्रमाने तपश्चरण केल्यानंतर त्यांना देवीचा साक्षात्कार घडला. प्रत्यक्ष रेणुकामातेने त्यांना उपदेश केल्याचे सांगण्यात येते. त्यांच्या जीवनात उपास्य व सद्गुरु या दोन्ही भूमिका रेणुकादेवीने सांभाळल्या. तदनंतर रीतीप्रमाणे आई-वडिलांनी त्यांचे लग्न करून दिले. लग्नानंतरच्या शतचंडीच्या होमाच्या पूर्णाहुतीवेळी होमातून अर्धनारीनटेश्वराची मूर्ती प्रकटली आणि तिचीच त्यांनी रेणुकादेवीच्या आदेशानुसार घरात प्राण-प्रतिष्ठा करून पूजा-अर्चेस प्रारंभ केला. याच मूर्तीला 'आई-आदिपुरुष' असे पुढे नामाभिधान प्राप्त झाले. आई म्हणजे जगन्माता भवानी आणि आदिपुरुष म्हणजे

'शिव' साक्षात्कारानंतर विठा रेणुकानंदनांचे सर्व आयुष्य आई आदिपुरुषाच्या सेवेत गेले. एकीकडे आपली काव्यरचना करीत असताच त्यांनी अनेकांना सन्मार्गास लावले. कीर्तन-प्रवचनाद्वारे संत एकनाथांच्या धर्मसंकीर्तन व समाजप्रबोधन कार्यात त्यांनी समरसतेने भाग घेतला. पौष शुद्ध चतुर्दशीला गोलट गावीच त्यांनी समाधी घेतली. इतर संतांप्रमाणेच त्यांच्याही जीवनात आख्यायिका आढळतात. 'विठ्ठल' हे त्यांचे मूळ नाव; परंतु रेणुकानंदन हे परशुरामाचे म्हणजेच रेणुकादेवीच्या पुत्राचे नाव म्हणून ते स्वतःस 'विठा रेणुकानंदन' अशी नाममुद्रा लावीत. गोलट गावी दरवर्षी त्यांचे वंशज त्यांचा उत्सव साजरा करतात.

रामा जनार्दनांप्रमाणेच विठा रेणुकानंदनांची ही रचना अत्यल्प उपलब्ध आहे. दहा-बारा अभंग, काही पदे, वीस कडव्यांचा एक धावा व एकवीस कडव्यांचे 'उत्तर' नामक एक प्रकरण एवढीच रचना आज त्यांच्या नावावर उपलब्ध आहे. एक छोटे 'सीतास्वयंवर' काव्यही त्यांच्या नावे आढळते. परंतु ते पूर्णांशाने उपलब्ध नाही. विठा रेणुकानंदनांची काव्यरचना अत्यल्प असली तरी काव्यगुणसंपन्न आहे. पदांतून त्यांचे भक्त हृदय प्रकटते. ही सर्वच पदे रसाळ, प्रासादिक, आत्मप्रत्ययकारी आहेत. आई आदिपुरुषाला आळविलेल्या धाव्यातूनही याचा प्रत्यय येत राहतो. 'मायबापा वाचुनी कोण करी संबोखना?' अशी ते आई-आदि पुरुषाची आळवणी करतात. त्यांच्या स्फुट रचनात तसेच धाव्यात अद्वैतनिष्ठा, ईश्वर शरणता, सद्गुरु प्रेम, गरिबांविषयीचा कळवळा आणि भावनोत्कटता प्रकटते. इथे ती संत एकनाथांशी नाते सांगते. आपल्या रचनेतून त्यांनी ढोंग, स्वार्थ, बुवाबाजी इ. वर ताशेरे ओढलेले आहेत. इथे ते संत एकनाथांशी अनुबंधित असल्याचे दिसते.

॥ जनी जनार्दन ॥ (इ. स. १५२० ते १६०१)

बीड येथील जनीजनार्दन हे 'एकनाथपंचकाती'ल पाचवे संतकवी. त्यांचे घराणे वेदशास्त्रसंपन्न आश्वलायन सूत्री वाशिष्ठ गोत्री देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मणाचे. त्यांचे पिता वसुदेव आणि माता जनी. माहुरची रेणुकादेवी ही त्यांची कुलदेवता. परंपरेने घराण्यात वैदिक तसेच परमार्थिक वृत्ती जोपासल्याने संस्कारसंपन्न बालपणाचा त्यांना लाभ झाला. प्रथेनुसार त्यांचा बालपणीच विवाह झाला. काही काळाने माता-पित्यांचे निधन झाले आणि ते कमाविसदार म्हणून वडिलांच्या पश्चात अधिकारावर आले. एकदा दुष्काळाने प्रजा ग्रासली असता त्यांनी सरकारी धान्यकोठारे खुली केली. परिणामी बादशहाने त्यांना हत्तीच्या पायी तुडविण्याची शिक्षा फर्मावली. आश्चर्यकारकरीत्या ते त्या प्राणसंकटातून बचावले. माजलेल्या हत्तीने उलट शांत होऊन त्यांना वंदन केल्याचे सांगण्यात येते. या प्रसंगाने जनीजनार्दन अंतर्मुख बनले आणि त्यांनी संन्यास स्वीकारून काशीचा मार्ग धरला. एक तपानंतर ते स्वगृही परतले ते तपःसाधना पूर्ण करूनच. गणेश हे त्यांचे उपास्यदैवत होते. तपश्चर्येनंतर त्यांना गणेशाचा साक्षात्कार घडला. त्यांची गुरुपरंपरा आदिनाथ > कंथडीनाथ > धुंडीराज > जनार्दन अशी आहे. त्यांच्या जीवनात नाथपंथ आणि गाणपत्य संप्रदायाचा समन्वय झालेला आढळतो. संत एकनाथही त्यांच्या भेटीसाठी बीड येथे येऊन गेल्याचे उल्लेख आहेत. संत एकनाथांच्या भेटीतून त्यांच्या जीवितध्येयास पुरस्कार प्राप्त झाला. ग्रंथनिर्मिती आणि जनजागरणात त्यांनी आपले उर्वरीत आयुष्य व्यतीत केले.

जनी जनार्दनांच्या काव्यरचना संत एकनाथ, दासोपंतांसारखी प्रचंड स्वरूपाची नाही किंवा रामा जनार्दन - विठा रेणुकानंदांच्या रचनांइतकी अत्यल्पही नाही. त्यांच्या नावावर 'निर्विकल्प' हा तत्त्वविवरणात्मक ग्रंथ, 'जानकिसैंवर' हे आख्यानकाव्य, चौरिकलीला अथवा बालक्रीडा हे श्रीकृष्णाच्या चोरी प्रसंगावरील लघुकाव्य तसेच काही पदे, अभंग, आरत्या अशी स्फुट रचना उपलब्ध आहे. 'महावाक्यविवरण' ह्या ग्रंथाचे कर्तेपणही त्यांच्याकडेच देण्यात येते. परंतु ते आज उपलब्ध नाही. ईश्वरशरणता, श्रीकृष्णभक्ती, शांकरमत पुरस्कृती, समन्वयशीलता, उदारता, दीनांचा कळवळा, मराठीचा अभिमान इ. गोष्टी त्यांच्या संत एकनाथांशी असलेला अनुबंध स्पष्ट करतात. 'आत्मवत् सर्व जाणावे' हेच त्यांच्याही जीवनाचे सार सांगता येईल.

॥ संत एकनाथ व पंचकातील इतर कवींचा अनुबंध ॥

संत एकनाथांच्या व्यक्तिमत्त्वाचा गाभा म्हणजे त्यांचे संतत्व ! त्यामुळे इतरांनाही सन्मार्गी लावण्यासाठी त्यांचे समाजमनस्क मन तळमळे. त्यांच्या सत्संगाच्या प्रभावाने दासोपंत, रामाजनार्दन, विठा रेणुकानंदन व जनी जनार्दनांची जीवने उजळून निघाली. शंकराचार्यांनी पंचायतनाची संकल्पना समाजमनात रुजविली, संत एकनाथांनी तिचा पुरस्कार केला अणि पंचकातील इतर कवींची उपास्ये वेगळाली असली तरी त्यांच्यात समन्वयाची, सख्यत्वाची, सहिष्णुतेची व अद्वैताची भावना निर्माण झाली. संत एकनाथांना अनुसरित एकाच दिशेने, एकच विचारसरणी अनेक वाङ्मय प्रकारात आविष्कृत होत गेली. त्यांच्या एकूण रचनांमधील साम्यस्थळांचा विचार करता संत एकनाथ व पंचकातील इतर संत कवींच्या अनुबंधाचा आलेख सहज काढता येईल. उदा.

१) सद्गुरु महिमा : पंचकातील या कवींनी नाथपंथातून आलेल्या काही गोष्टीतील सद्गुरुमहिमा, श्रीकृष्ण प्रीति, लौकिक भाषा स्वीकार आणि अद्वैतमत पुरस्कार यांचा पुरस्कार केला. प्रत्येकाने सद्गुरु गुणगान केलेले आहे. *'कल्पद्रुमा मोक्षा । सद्गुरु दातार (रामा जनार्दन) रोकडा ब्रह्मसाक्षात्कारु । करु जाणे तो सद्गुरु । (दासोपंत), ध्येय ध्याता, ध्यान । अवघा माझा जनार्दनु (संत एकनाथ) स्वधर्म स्थापावया पूर्णानंदघन । जगत्रय जीवन रूप धरी (जनी जनार्दन) विठली विठल भेदला । आदि पुरुषी मीनला* (विठा रेणुकानंदन.) संत एकनाथ तर सद्गुरुला परब्रह्मच मानीत.'

२) श्रीकृष्णप्रीति : पंचकातील संत एकनाथांनी रुक्मिणीस्वयंवर रचले, दासोपंतांनी गीतार्णवासह पाच-सहा गीताटीका लिहिल्या, जनी जनार्दनांचे 'सीतासैंवर' रसाळ तसेच वैशिष्ट्यपूर्ण आहे. विठा रेणुकानंदनांनी श्रीकृष्ण विठ्ठलरूपात पाहिला, तर रामा जनार्दनही ज्ञानेश्वरांना पांडुरंगाचा म्हणजेच श्रीकृष्णाचा अवतार समजतात.

३) लौकिक भाषातून रचना : हे सर्व कवी विद्वान, संस्कृतज्ञ असूनही त्यांनी आपल्या रचना लौकिक भाषा मराठीतून रचल्या. सामान्यजनांना स्वधर्माची जाणीव करून देण्यास, वेदातील ज्ञान सोपे

करून सांगण्यास त्यांच्याच सुलभ भाषेचा स्वीकार केला आणि त्यांना एक विचार दिला.

४) अद्वैतमत पुरस्कार : संत एकनाथांसह सर्वांनी शांकरमतानुसार अद्वैतनिष्ठा जोपासली. *'ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या'*, *'अहं ब्रह्मास्मि'* तत्त्वाचा पुरस्कार केला. ज्ञानेश्वरांचा चिद्विलासवाद स्वीकारलाच परंतु आपापल्या धारणेनुसार त्याचा आपल्या रचनांतून आविष्कार केला. उपास्यांची अनेकता असली तरी मुळात सर्व देवता एकच असल्याचे आपल्या आचरणातून दर्शविले. *'नाना अनुपम्य मुखे । मज मी देखे मजमाजी ।'* (विठा रेणुकानंदन) *'प्रगट गुह्य बोले । विश्व ब्रह्मचि केले* (रामा जनार्दन)', *'आत्मवत् सर्व जाणावे* (जनी जनार्दन)', *'आत्मा ब्रह्म सकळ । तैसे जो जाणे ।* (दासोपंत)', *'एकाजनार्दनी पूजा । पूज्य पूजक नाही दुजा'* (संत एकनाथ) याप्रमाणे त्याची उदाहरणे देता येतील.

५) नाममाहात्म्य : सर्व संतकवींनी आपल्या रचनांमधून नाममाहात्म्यही गायिले आहे. *'नामापाशी चारी मुक्ती । जाण निश्चिती विदेहा ।'* (एकनाथ) *'देवा नलगे ब्रह्मसाक्षात्कारु । नामवादिया माते* (दासोपंत)' *'कृपालुबा नाम तुझे जगजीवन ।'* (जनीजनार्दन), *नाम हेचि निजसखा । आधार वेदशास्त्रांचे* (विठा रेणुकानंदन),

६) ज्ञानेश्वर प्रेम : सर्वांनीच ज्ञानेश्वरांविषयी प्रेमादर बाळगिला आहे. *'कृपाळू उदार । माझा ज्ञानेश्वर ।'* (संत एकनाथ), *'आरती ज्ञानराजा । महा कैवल्यतेजा'* (रामा जनार्दन), जनी जनार्दनांच्या घराण्यात ज्ञानेश्वरीच्या अभ्यासाची-प्रतलेखनाची परंपराच होती. दासोपंतांचे गीताटीकालेखन, अमृतानुभवाशी साम्य दर्शविते, तसेच ज्ञानेश्वरांशी शब्दसाम्यता *'पैलु कागु बोले काये । माझा नयनु स्फुंदतु आहे ।'* या ओळीतून प्रकटते. (पैल तो गे काऊ कोकताहे - ज्ञानेश्वर)

७) मायमराठीचा गौरव : संत एकनाथांसह पंचकातील इतर कवींना आपल्या मातृभाषेविषयी अतीव जिव्हाळा होता. वस्तुतः ते स्वतः प्रकाण्ड पंडित, संस्कृतज्ञ त्यांनी संस्कृतविषयी आदर दर्शविलाच परंतु मराठीलाही प्रतिष्ठा प्राप्त करून दिली. 'संस्कृत वाणी देवे केली । प्राकृत काय चोरापासून जाली?' असे एकनाथ विचारतात तर *'प्राकृत म्हणौनी दूषिती । तेचि माया ज्ञाना वंचती ।'* असे सांगून दासोपंत मराठीचा गौरव दर्शवितात. पंचकातील इतरांची अत्यल्प रचना उपलब्ध आहे नपेक्षा तिच्यातही मराठीचा महिमा आढळला असता.

८) विविध भाषांतूनही रचना : या कवींनी केवळ मराठीतूनच आपल्या रचना केलेल्या नाहीत, तर संस्कृत, तेलगु, कानडी व हिंदी, उर्दू, अशा इतर प्रादेशिक भाषांमधूनही काही पदरचना केलेली आढळते. त्या काळाचे हे वैशिष्ट्य म्हणता येईल.

९) उदारता आणि समन्वयशीलता :

संत एकनाथ, रामा जनार्दन हे गुरुबंधू, जनी जनार्दन नाथपंथी या तिघांचे जीवन मात्र भागवत धर्मियांच्या सहवासात गेल्याने त्यांनी श्रीकृष्णभक्तीही जोपासली. गुरुबोधक्रमात संत एकनाथांनी व दासोपंतांनी दत्तोपासना वारसाही जोपासला. *'दत्त माझी माता । दत्त माझा पिता ।'* हे एकनाथांचे बोल आणि 'करित जतन दत्तु । प्राणधन माझे ।' हे दासोपंतांचे उद्‌गार उभयतांच्या दत्तभक्तीची समरूप साक्ष देताता. दासोपंतांनी संत एकनाथांचा गौरव केलेला आहे. *'नमो एकनाथ पंत संत साधू भला रे ।'* असा त्यांचा त्याविषयीचा अभंगही आहे. दासोपंतांप्रमाणेच जनीजनार्दन व विठा रेणुकानंदन संत एकनाथांच्या विचारांनी प्रभावित झाल्याचे जाणवते. स्वतः देवी उपासक असूनही त्यांनी भावार्थ रामायणाला अनुसरीत सीतास्वयंवर रचले. त्यातून राममहिमा गायिला. जनी जनार्दन गणेश उपासक. त्यांनीही 'जानकिसैंवर' रचले. भावार्थ रामायणातील समाजस्थिती, चालीरीती, विवाहविधीत एकनाथांशी शब्दसाम्ये आढळतात. पंचकातील कवींचा नाथसंप्रदायाशी अनुबंध त्यांच्या सद्‌गुरुमाहात्म्यात, कृष्णाच्या बाळक्रीडेत, लौकिक भाषा स्वीकारात प्रकटतो. त्या दृष्टीने त्यांच्या रचना अभ्यासनीय आहेत. उपास्ये अनेक परंतु सर्वात एकरूपत्व. एकात अनेकत्व आणि अनेकांत एकत्व या गोष्टी त्यांच्यातील समन्वयशीलता, उदारता, सहिष्णुता व अद्वैतता दर्शवितात.

॥ वाङ्‌मयीन व भाषिक वैशिष्ट्ये ॥

'एकनाथपंचका' मध्ये दासोपंत, रामा जनार्दन, विठा रेणुकानंदन आणि जनीजनार्दन यांचीही नावे समाविष्ट करण्यात एक निश्चित भूमिका आढळते. उपरिनिर्दिष्ट आध्यात्मिक अनुबंधाप्रमाणेच या साऱ्यांच्या रचनांमधून दृग्गोचर होत जाणाऱ्या वाङ्‌मयीन व भाषिक वैशिष्ट्यांचाही विचार करणे अगत्याचे आहे. संत एकनाथांच्या ग्रंथरचनेच्या वळणाशी साम्यता दर्शविणारे ग्रंथरचनेचे वळण इतर चौघांच्याही रचनांतून कमी-अधिक प्रमाणात आढळते. 'पद्यबद्धता' हा प्राचीन मराठी वाङ्‌मयाचा अविभाज्य घटक, त्यासाठी ओवी-अभंगांसारख्या सुलभ छंदाच्या वापराबरोबरच अनेक जातीवृत्तातील रचना येथे आढळतात. तत्त्वप्रतिपादनार्थ प्रबंधात्मक, मनोरंजनातून जनजागरणास्तव आख्यानात्मक, भारुडात्मक-पदात्मक अशा रचना त्यांनी साधल्या. संस्कृतप्रचुर सामासिक तसेच तत्सम व तद्‌भव शब्दांचा उपयोग करून शब्दांचे सामर्थ्य प्रकटविले. सुभाषितवजा ओव्यांचा प्रबोधनासाठी उपयोग केला. काव्यशास्त्रातील शब्दशक्ती, रस व अलंकारप्रचुरतेचा आपापल्या रचनांतून विचार केला. आख्यान काव्यातून संत एकनाथांप्रमाणेच उत्तम शब्दचित्रे, स्वभावचित्रणे, प्रसंगवर्णने रेखाटली. अनुनासिकांनी आपल्या काव्यात माधुर्य आणले. प्रसाद, सुश्लिष्टता, ओज इ. काव्यगुणांचा आपल्या रचनेत योग्य तो समावेश केला. खेरीज विनोदनिर्मिती करून उपहासात्मकतेलाही वाव दिला.

एवंच, 'एकनाथपंचका'तील कवींमध्ये आध्यात्मिक अनुबंध तसेच साहित्यिक, वैचारिक अनुबंध जसे जाणवतात तसेच त्यांच्या प्रकटीकरणात-आविष्करणातही त्यांनी आपला अनुबंध कायम राखल्याचे आढळते. हे कवी आंतरबाह्य एकरूपतेचे प्रतिक ठरत असल्यानेच 'एकनाथपंचक' या नामाभिधानास आजही मराठी सारस्वतात मानाचे स्थान आहे.

सौ. सुनीता तांबे
नामदेव अध्यासन,
पुणे विद्यापीठ, पुणे.

# एकनाथांची हिंदी कविता

**सौ. स्वाती केळकर**

एम. ए. हिंदी., हिंदी शिक्षण योजना २।। वर्षे अनुभव, संयुक्त स्त्रीसंस्थेचे शारदा विद्यालय २ वर्षे अनुभव. गोखले व गंभीर क्लासेसमध्ये हिंदीचे अध्यापन. हिंदी-इंग्रजी व इंग्रजी-हिंदी अनुवाद कोर्स पूर्ण. कबीर-तुकाराम विषय संशोधनासाठी घेण्याचा मानस.

संत एकनाथांचा काळ १५३० ते १६०० असा मानला जातो. सोळाव्या शतकाचा जवळ-जवळ दोन तृतीयांश काळ त्यांनी पाहिलेला होता. या काळात महाराष्ट्र पूर्णतः पराधीन होऊन यावनी शासनाच्या नियंत्रणाखाली होता. राज्य शासन मुसलमानी असल्याने राजकीय व सामाजिक व्यवहारात हिन्दी अथवा तत्कालीन भाषेचा वापर अधिक प्रमाणात होत होता. नाथांनी उत्तरेकडील तीर्थक्षेत्रांची यात्रा केली होती. उत्तरेकडील तीर्थयात्रेच्या वेळी एकनाथांनी काही काळ काशीत वास्तव्य केले होते.

मराठी साहित्यातील युग प्रवर्तक रचनाकार आणि भागवत धर्माचे आधारस्तंभ असणाऱ्या संत एकनाथांची मातृभाषा मराठी होती. तरीही त्यांनी हिंदी काव्य रचना मनापासून केल्या. याचे एक कारण त्यांचे उत्तरेत असलेले वास्तव्य असेल. दुसरे, त्या वेळी महाराष्ट्रात मुसलमान शासक होते. त्या वेळच्या मुसलमान शासकांना व अन्य अमराठी लोकांना भागवत धर्माचे महत्त्व सांगण्यासाठी आणि त्याच्या प्रसारासाठी एकनाथांनी हिंदी काव्य रचना केल्या असतील. संत एकनाथांनी उत्तर प्रदेशातील तीर्थयात्रा केली होती. ते स्वतः काशीत ३ वर्षे राहिले होते. या कालखंडात आपले मनोगत दुसऱ्यांना सांगणे किंवा दुसऱ्याचे विचार आपण समजावून घेणे या करिता त्यांना हिंदीचा आश्रय घ्यावा लागला असेल.

संत एकनाथांची हिंदी काव्य रचना 'मुक्तक' किंवा 'स्फुट' या रूपात उपलब्ध आहे. त्यांची हिंदी पदे एकत्रित न मिळाल्याने त्यांच्या काव्याचे संकलन होऊ शकले नाही. एकनाथांच्या हिंदी काव्याचे प्रामुख्याने दोन भाग पडतात. पहिल्या भागात संत एकनाथांच्या सर्व स्फुट रचना येतात. त्यात अभंगगाथा, एकनाथी भारुड इत्यादी आहेत. या सर्व प्रकाशित रचनांमध्ये मराठी पदांच्या बरोबर हिंदी पदेदेखील पाहायला मिळतात. दुसऱ्या विभागात समस्त हस्तलिखित संग्रह ग्रंथांचा समावेश होतो. त्यात एकनाथांची हिंदी पदे मिळतात. अशा तऱ्हेने दोन्ही विभागातील हिंदी पदांची संख्या २३० इतकी आहे. यामध्ये अभंग, भारुड आणि काही दीर्घ कविता आहेत. हिंदी भक्तिसाहित्यामधील ज्ञान भक्ती, कृष्ण भक्ती व राम भक्ती या तीन प्रमुख धारांचा संगम नाथांच्या हिंदी रचनेत दिसून येतो. नाथांच्या हिंदी पदरचनेत गुरुवंदना व गुरु महिमा आहे. नाथांच्या हिंदी पदात सगुण-निर्गुणाविषयी चर्चाही दिसून येते. भक्तिपेक्षा मुक्ती श्रेष्ठ आहे, असाही विचार हिंदी रचनेत मिळतो. हा मराठीत नामदेव ज्ञानदेवांपासून हिंदीत तो नामदेव आणि नाथांनी रुजविण्याचा प्रयत्न केलेला दिसतो. माया, मोह, जीव, जगत या संकल्पना स्पष्ट करणाऱ्या काही हिंदी रचना आहेत.

भारतीय साहित्यात भक्तीचे विशिष्ट स्थान आहे. हिंदी साहित्यांच्या इतिहासात भक्तिसाहित्याच्या रचनाकारांना दोन श्रेणींमध्ये विभाजित केलेले आहे. निर्गुण ब्रह्माच्या उपासकांना संत आणि सगुण ब्रह्माच्या उपासकांना भक्त असे म्हटलेले आहे. संत एकनाथांच्या मतानुसार भगवान श्रीकृष्ण हे पूर्ण ब्रह्म आहेत. त्यांनी जगाच्या उद्धारासाठी लीलया सगुण रूप धारण केले आहे. वास्तविक ते अमूर्त आहेत. पण सर्व प्राणीमात्रांचे लालन-पालन करण्याच्या हेतूने ते मूर्त रूपात उपस्थित झाले आहेत. एकनाथांच्या मताप्रमाणे ब्रह्म सत्-चित्-आनंद यांचे एकत्रित रूप आहे. त्याला वेगवेगळ्या स्वरूपात पाहता येत नाही. हे ब्रह्म अनंत, अनादी, निर्गुण, निराकार परिपूर्ण व्यापक आहे. एकनाथ महाराजांच्या दृष्टीने ब्रह्माच्या सगुण अथवा निर्गुण रूपामध्ये अंतर नसून दोघांचेही महत्त्व सारखेच आहे. सगुण ब्रह्मापेक्षा निर्गुण ब्रह्माचे श्रेष्ठत्व मानणाऱ्या विद्वानांच्या मताबरोबर एकनाथ सहमत नाहीत. ब्रह्माच्या या दोन्ही स्वरूपांचे समान श्रेष्ठत्व पटवून सांगण्यासाठी नाथांनी घृत-घृतकणिका, बीज-वृक्ष, सुवर्ण-सुवर्णालंकार इत्यादी अनेक दृष्टांत देऊन सगुण-निर्गुणाच्या समानतेवर भर दिलेला आहे. या विचारांचे समर्थन करणाऱ्या काही ओळी अशा !

*एका जनार्दनी चिदानन्द घन ।*
*सगुण निर्गुण समान दिखावे ।।*

एकनाथ महाराज ईश्वराच्या विविध अवतारांमध्ये एकाच ब्रह्माची सत्ता मानतात. आपल्या हिंदी काव्यांमध्ये त्यांनी परब्रह्माच्या विभिन्न रूपामध्ये विठ्ठल, शिव, राम, गणेश, दत्तात्रय, जगदंबा, इत्यादी हिंदू देव-देवतांचा नव्हे तर मुसलमानांच्या अल्लाचा - खुदाचाही समावेश केलेला आढळतो. निर्गुण-निराकार, सच्चिदानंद, ब्रह्माचेच एक रूप जीव आहे असे एकनाथ महाराज मानतात. ज्ञान भक्तीमुळे अविद्यामायेचा प्रभाव नष्ट होऊन आत्मरूपाची जाणीव होते. सर्वत्रच ब्रह्मारूपाचा साक्षात्कार घडतो. एकनाथांनी हा अनुभव समर्पक शब्दांत व्यक्त केलेला आहे -

*जीव ही शिव, शिव ही जीव नहीं भिन्न भेद बाबा ।*
*एका जनार्दनी एकरूप सहज स्वानंदकंद बाबा ।*

जीवाप्रमाणे सृष्टी ब्रह्माचे स्वरूप असल्याचे एकनाथ सांगतात. ब्रह्मानेच आपल्या क्रीडेसाठी सृष्टीची निर्मिती केलेली असून तिच्या

आदी, मध्य आणि अंत या सर्वांमध्ये ब्रह्माची सत्ता व्याप्त असते. सृष्टीतील सर्व चराचरमध्ये ब्रह्माचे रूप सामावलेले असते. एकनाथांनी माया ही ब्रह्माचीच शक्ती मानली आहे. हीच मूळ माया, शिव अर्थात ब्रह्म स्वरूपात योग माया आणि जीव-स्वरूपात अविद्यामाया असते. पुराणातील काही सुप्रसिद्ध उदाहरणे देऊन मायेच्या प्रभावाचे वर्णन नाथांनी केलेले आहे -

*माया छांड सुनोजी, अच्छा भांड बनोजी ।*
*ब्रह्मदेव ने वेद पढाया, माया मीठी लागी ।*

मायावी, दुःखमय व नश्वर जगाच्या बंधनातून मुक्त झाल्यानंतर होणाऱ्या आनंदप्राप्तीलाच मुक्ती अथवा मोक्ष म्हटले जाते. हा मोक्ष प्राप्त करण्यासाठी एकनाथ महाराजांनी भक्तीचा मार्ग प्रमुख सांगितला असून कर्म, ज्ञान, योग या मार्गाचेही समर्थन केले आहे. एकनाथ महाराजांनी मुक्तीपेक्षा भक्तीचे अधिक महत्त्व प्रतिपादन केले आहे -

*राम बिना मुक्ति कहाँ करिए ।*
*राम छोड मुक्ति हाथ न धरिए ।*

आत्मज्ञान मिळविण्याचे सरळ नि सोपे साधन भक्तीशिवाय दुसरे नाही असे नाथांनी वारंवार सांगितले आहे. ईश्वराला अन्य कोणत्याही गोष्टीपेक्षा भक्तिभाव अधिक प्रिय असतो. एकनाथ महाराज स्वतः उच्चं कोटीचे भक्त असल्याने निष्काम कर्मयोग, विवेक वैराग्य आणि कर्तव्यदक्षता त्यांच्यामध्ये सहजपणे दिसून येते. त्यांनी भक्तिमार्गातील राजसी व तामसी प्रकारांचा निषेध केला आहे. एकनाथ महाराज म्हणतात -

*राम नामे बल जो करे पाप ।*
*त्याकु न राखे देव का बाप ।*

म्हणजे देवाच्या नावावर पापाचरण करणाऱ्या भक्ताला देव कधीच क्षमा करीत नाही.

परमेश्वराची अलौकिकता, चरित्रगान, गुणकथन, नाममहिमा इत्यादींचे श्रवण हा भक्तीचा प्रथम सोपान असल्याचे एकनाथ महाराज सांगतात. परमेश्वराची अलौकिकतेची महती पटल्यानंतर भक्त स्वतःच परमेश्वराचे गुणगान करू लागतो. जप-तप, तीर्थाटन, योग-ध्यान इत्यादी गोष्टी करूनही ब्रह्मानंद मिळविता येतो हे एकनाथांनी जनतेस पटवून दिले आहे. हरिनामाचे नामस्मरणाला भवसागरातून तारणारी नौका, पापाचा मळ धुवून काढणारे साबण, अज्ञान रूपी अंधकार दूर करणार दीपक अशा उपमा दिल्या आहेत -

*राम नाम यों सानु भाई ।*
*जे कोई भीतरी लगावे ।*
*अज्ञान मैल दूरि करी ।*
*राम नाम का दीया लागे ।*

भारतीय दर्शनात मुक्ति ह्या कल्पनेला सगळ्या दार्शनिकांनी स्वीकारलेले दिसते. परंतु भक्तीच्या स्वरूपाविषयी मतभिन्नता दिसून येत. सालोक्य, सामीप्य, सारुप्य अणि सायुज्य मुक्तिमध्ये एकनाथ महाराजांनी सायुज्य मुक्तीला प्राधान्य दिले आहे. एकनाथ महाराज मुक्तीपेक्षा भक्तीला जास्त महत्त्व देतात. त्यांच्या म्हणण्यानुसार भक्तीच्या आनंदात तल्लीन होऊन मुक्तीचा आनंद ही मिळतो.

एकनाथ म्हणतात भक्तिमध्ये मनाचा, शरीराचा व हृदयाचा संबंध असतो. देवाच्या कीर्तिचे श्रवण कानांनी होते. त्याचे गुणगान जिव्हेद्वारे होते आणि मनानी देवाचे ध्यान चिंतन आदि केले जाते. आत्मज्ञान मिळविण्याचे सर्वात सोपे साधन म्हणजे भक्ती असे एकनाथ मानतात. एकनाथांनी ज्ञान, योग, कर्म इत्यादी मार्गांचे वर्णन करून त्यातल्या अडचणी प्रतिपादित केल्या आहेत. त्यांच्या मताप्रमाणे भक्ती हे सर्वात सुलभ आणि श्रेष्ठ आहे.

एकनाथ महाराजांनी भक्तिमध्ये संत संगतीला महत्त्व दिले आहे. त्यांच्या काही हिंदी पदांमध्ये संत-संगतीचे वर्णन दिसून येते व ते भक्तिसाठी सत्संग आवश्यक मानतात. संत स्वभावाने उदार, निष्कपट असतात. माणसाचे दुःख संत दूर करतात. संतांच्या सहवासात राहून सामान्य माणसालापण सद्‌गती मिळते. संत संगतीचे महत्त्व सांगताना एकनाथ महाराज म्हणतात -

*भला संतन का संग । जावे निज बोधन की भंग ।*
*किया संतन का दुमाल । मेरा टूटा बहु जंजाल ।*

एकनाथ महाराज एकनिष्ठ गुरुभक्त होते. आपले गुरु जनार्दन स्वामींची त्यांनी मनोभावे सेवा केली होती. त्यांच्या विषयीच्या आदर, निष्ठा व ऋण यांचा अनेक ठिकाणी अत्यंत श्रद्धेने निर्देश केला आहे. त्यांच्या म्हणण्यानुसार जगात ज्ञान प्राप्तीसाठी सद्‌गुरुंची अत्यंत आवश्यकता आहे. गुरुकृपेचे अंजन डोळ्यांमध्ये घातले की विकार नष्ट होतात व रामाच्या अस्तित्वाची जाणीव होऊ लागते -

*गुरुकृपा अंजन पायो मेरे भाई ।*
*राम बिना कछु खाली नाही ।*
*भीतर राम बाहर राम ।*
*जहाँ देखो वहाँ पूरन काम ।*

नाथांच्या काळात हिंदू व मुसलमान यांच्यामध्ये धर्माच्या नावावर संघर्ष चालत असे. एकनाथ महाराजांनी त्यांच्यामधील भ्रम दूर करण्यासाठी 'हिंदू-तुर्क' संवाद नावाचे एक काव्य लिहिले. हे काव्य हिंदी व मराठी दोन्ही अशा मिश्र भाषेत आहे. दोघेही आपापल्या धर्माचे महत्त्व पटवून सांगतात. त्या वेळी दुसऱ्याच्या धर्मातील दोष दाखवितात. शेवटी दोघांनाही समजते की, परब्रह्म व खुदा या दोघांना कुठलीही जातच नाही व आपले भांडण व्यर्थच आहे. नाथांनी या संवादामधून हिंदू-मुसलमान ऐक्य घडवून आणण्याचा प्रयत्न केला आहे. ईश्वर जातपात ओळखत नाही. त्याला सर्वच माणसे सारखी असतात. त्यांच्या दृष्टीने जातीच्या आधारावर कोणी चांगला कोणी वाईट असे नसते.

नाथांची हिंदी रचना वाङ्मयाच्या अंगानेही संपन्न आहे. इतर मराठी संतांनी केलेल्या हिंदी रचनेच्या तुलनेने ती विपुल आहे. मराठी साहित्याप्रमाणेच हिंदी काव्यरचनाही त्यांनी दोन स्तरांवर केली आहे. सामान्य जनतेला व पंडित यांना डोळ्यांसमोर ठेवन नाथांनी दोन

प्रकारच्या रचना केल्या.

नाथांच्या हिंदी काव्यरचनेमध्ये रसाळपणा आहे. त्याबरोबर अलंकार, शब्दशक्ती इत्यादी साहित्यिक वैशिष्ट्ये दिसून येतात. पण त्याचबरोबर नाथांची मातृभाषा मराठी असल्याने त्यांच्या हिंदी काव्यांमध्ये काही जागी मराठी शब्दांचा वापरही आढळतो. नाथांना मराठी व हिंदी बरोबरच गुजराथी, कन्नड, संस्कृत इत्यादी भाषा अवगत होत्या असे दिसते.

नाथांच्या वेळी हिंदीची दोन प्रमुख रूपे प्रचलित होती. एक रूप ब्रजभाषायुक्त व दुसरे उर्दू-फारसीयुक्त दक्खिनी हिंदी असे होते. नाथांनी हिंदी भाषी विद्वानांसाठी ब्रजभाषा व मुसलमानी तथा सामान्य जनतेसाठी दक्खिनी हिंदी भाषेचा वापर केला.

नाथांच्या हिंदी रचनेमध्ये संस्कृत, ब्रज, उर्दू, फारसी शब्दांबरोबर गुजराथी, कन्नड व मराठी शब्द ही अधून-मधून दिसतात. संस्कृत शैली अथवा ब्रजशैलीतील रचना शुद्ध व उच्च कोटीची आहे. त्यांच्या हिंदी रचनेत तत्सम्, तद्‌भव, स्थानीय आदी शब्दांप्रमाणे काही ठिकाणी ग्रामीण शब्दही आढळतात. आपले विचार जनतेपर्यंत पोहोचविण्याचे हेतूने प्रचलित लोकछंदाचा प्रयोग एकनाथांनी केलेला दिसतो.

हिंदी भक्ति साहित्यातील ज्ञान-भक्ती, कृष्ण भक्ती व राम भक्ती या प्रमुख तीन विचारधारांचा संगम नाथांच्या हिंदी रचनेत दिसतो. एकूणच मध्ययुगीन भक्तिसाहित्यामध्ये संत एकनाथ महाराजांचे स्थान महत्त्वपूर्ण आहे.

सामाजिक विषमता नष्ट होऊन स्नेह निर्माण व्हावा यासाठी एकनाथांनी सांस्कृतिक कार्येही केली आहेत. त्यात कृष्ण जन्माष्टमी उत्सव, पैठणहून पंढरपुरची पालखी सुरू करणे, ज्ञानेश्वरीचे पाठ संपादन, ज्ञानेश्वर समाधीचा जीर्णोद्धार करणे इत्यादी कामे याच प्रकारची आहेत.

एकनाथ महाराज भक्त असल्यामुळे त्यांच्या काव्यात भक्तिरस प्रामुख्याने दिसून येतो.

भक्तिरसाबरोबर शांत, शृंगार व वीररस यांचाही अंतर्भाव दिसून येतो. भक्तिरसामध्ये कृष्णाविषयीचे प्रेम आहे. एकनाथ महाराज आपल्या रचनांमधून जीवनाची क्षणभंगुरता, नाशिवंत ऐश्वर्य आदींचे विवेचन करतात. जगाचा त्याग न करता या जगात संयमाने जीवन जगण्याचा संदेश ते देतात.

आपले विचार दुसऱ्यापर्यंत पोहोचविण्याचे सर्वात उत्तम साधन भाषा आहे. एकनाथांनी लोकभाषा मराठी मोठी केली. त्यांनी आपल्या मराठी रचनेत विविध शब्दांचे प्रयोग करून भाषेला एक प्रकारे प्रतिष्ठेचे स्थान मिळवून दिले. मराठी काव्य रचनेनंतर हिंदी काव्य विपुल प्रमाणात लिहिले. त्या शब्दातील वैविध्य आणि उत्कट भाव लक्षणीय वाटतो.

स्वाती केळकर
१९९५ माडीवाले कॉलनी, सदाशिव पेठ,
पुणे ४११०३०.

# ॥ संत एकनाथांच्या गौळणी ॥

**ओम्. गो. श्रीवत्सोपासक**

एम फिल (संस्कृत), गेली १० वर्षे नामदेव अध्यासन पुणे विद्यापीठ येथे संशोधन सहाय्यक. बारा विषयांत १५ शोध प्रबंधिका पूर्ण. निरनिराळ्या मासिकांत १७ लेख प्रसिद्ध. पुणे आकाशवाणी केंद्रावर ७ लेखन संभाषण कार्यक्रम. शंकराचार्यकृत विवेकचूडामणि आणि यादवकालीन मराठी संत या विषयावर पी.एच.डी. प्रबंध सुरू. (संशोधन सहाय्यक, संत नामदेव अध्यासन, पुणे विद्यापीठ.)

## आरंभिक

ज्ञानेश्वरांनंतर सुमारे तीनशे वर्षांनी महाराष्ट्राच्या सांस्कृतिक जीवनाचे पुनरुत्थान घडविण्याचे कार्य संत एकनाथांनी केले. बहिणाबाईंनी भागवत मंदिराचे चित्र रेखाटताना *'जनार्दनी एकनाथ खांब दिला भागवत'* असे श्रेय नाथांना दिले आहे. प्राकृतात ग्रंथरचना करण्याची ज्ञानेश्वरांपासून चालत आलेली परंपरा नाथांनीही पुढे चालविली आहे. या दोन संतश्रेष्ठात फार मोठे विचारसाम्य आहे. 'ज्ञानाचा एका' हे वारकरी संप्रदायातील घोषवाक्य या दोघांचे मानसिक ऐक्य सिद्ध करू शकेल. तत्त्वज्ञान लोकभाषेत सांगून जनरंजन करता-करता लोकशिक्षण देणारे नाथ हे पहिले कवी होत असे म्हटले तर ते अतिशयोक्त ठरू नये. नाथभागवत, रुक्मिणीस्वयंवर, भावार्थ रामायणसारखे ग्रंथ आनंदलहरी-स्वात्मसुख-हस्तामलक-शुकाष्टक-चतुःश्लोकी भागवत यासारखी स्फुट प्रकरणे; भारुडे, अभंग, पदे, गौळणी मिळून नाथांची कविता सुमारे पाऊण लाख भरते. ज्ञानेश्वरीचे संशोधन आणि ज्ञानेश्वरांच्या समाधीचा जीर्णोद्धार अशी दोन महत्त्वाची कार्ये नाथांना करावी लागली. दत्त आणि वारकरी संप्रदाय, प्रपंच आणि परमार्थ अशा दोन ध्रुवांचा समन्वय नाथांनी आपल्या जीवनात व कवितेत घातला.

गौळणी हा मराठी संतवाङ्मयातील काव्यप्रकार आहे. बालक्रीडा, गाऱ्हाणी, काळा, मुरली विराण्या असे त्यांचे पोटविभाग आहेत. संतवाङ्मयाच्या भव्य प्रासादात गौळणीवाङ्मय हे एक शृंगारलेले दालन आहे. त्यात शृंगाराचे अनेक प्रकार आहेत. प्रेमभावनेने रतिरूप घेतले की तोच शृंगाराचा स्थायीभाव बनतो. मराठी संतांनी आळविलेला, खेळविलेला जो गोपीकृष्णविषयक शृंगार तो भक्तिरसाचाच एक पर्याय आहे.

नंदकुमार श्रीकृष्ण हा मदनाहून सुंदर होता. गोकुळातील गोपिका सौंदर्याला, माधुर्याला भुलल्या व त्याच्यावर आसक्त झाल्या, अभिलाषा व आसक्ती बाळगून त्या श्रीकृष्णाजवळ आल्या हे सत्य; परंतु श्रीहरीने दर्शन, स्पर्शन, संभाषण व रासक्रीडा या साधनांनी त्यांचे विकार जाळून टाकले. त्यांचा कामच निष्काम करून टाकला. कृष्ण, यशोदा, राधा, गोपी, गोप आणि गोकुळ-वृंदावन यांची वर्णने या गौळणीवाङ्मयात आहेत. यशोदेचे वात्सल्य, राधेचा अनुराग, गोपींचे उत्कट प्रेम, गोपगड्यांची कृष्णनिष्ठा, बाळकृष्णाचे अलौकिक पराक्रम, त्याच्या खोड्या आणि गोपींना रमविण्याचे त्याचे चातुर्य इ. गुणविशेषांनी हे वाङ्मय मधुररसाचा उत्कृष्ट परिपाक ठरले आहे. ते विविध रंगछटांनी नटलेले आहे. त्यांत प्रणय, क्रोध, विलास, विरह, सुख, वेदना हे सर्व विभ्रम आहेत. रांगणारा, दुडुदुडु धावणारा, गौळणींच्या घरी दही-दूध चोरणारा, गोपींच्या खोड्या करणारा, मुरली वाजविणारा, गाई वळवणारा, रासक्रीडा करणारा अशी एकाच कृष्णाची अनेक नयन मनोहर रूपे या वाङ्मयात पाहायला मिळतात. आक्रस्ताळी, कांगावखोर, साधीभोळी, रमणी, मानिनी, कामिनी अशी गोपींचीही नानाविध स्वरूपे यात दृष्टीस पडतात. ज्ञानदेवांच्या विराण्या गहन अर्थाने भरलेल्या आहेत. नामदेवांची या विषयावरची पद्यरचना प्रसादपूर्ण आहे. एकनाथांच्या गौळणी सकृद्दर्शनी लौकिक आणि कामप्रेरित दिसल्या तरी त्यांच्या अंतरंगात परमार्थ भरलेला दिसतो. तुकोबांच्या गौळणी चतुर, प्रगल्भ आहेत. निळोबांच्या गौळणीही हृदयस्पर्शी व सरस आहेत. प्रस्तुत लेखातून आपल्याला नाथांच्या गौळणींचा थोडक्यात परिचय करून घ्यावयाचा आहे.

## नाथांच्या गौळणी

एकनाथांच्या अभंग गाथेत कृष्णचरित्र, रामचरित्र, दत्तचरित्र, शिवचरित्र आणि विठ्ठलचरित्र यांना अतिशय महत्त्व मिळालेले आहे. विष्णु-कृष्ण-विठ्ठलात हरिहरांचे ऐक्य स्वीकारण्याची जी परंपरा ज्ञानेश्वरांनी सुरू केली तिचाच पुढील टप्पा एकनाथांच्या अभंगवाणीत गाठला गेला आहे. देवकी डोहाळे, कृष्णजन्म, कृष्णाचे शैशव, बाल्य-खोड्या-खेळ-सवंगडी, कृष्णाविषयीची गौळणींची गाऱ्हाणी, यशोदा-राधा संवाद, राधाविलास, वेध लागलेल्या गौळणींची देहावस्था, कृष्ण मुरलीचा प्रभाव, कंसवध आणि कृष्णगौरव या पद्धतीचे जवळ-जवळ चारशे अभंग नाथांनी रचले आहेत. प्रसंगांची गुंफण, कथानकाची गतिमानता, प्रवाही आणि विलक्षण स्वाभाविक असलेली शब्दकळा यामुळे या अभंगांचा रसाळपणा आणि प्रासादिकता विशेष वाढली आहे. प्रसंग चित्रे, निसर्ग चित्रे, कल्पना चित्रे आणि भावना चित्रे रेखाटण्यात नाथांची प्रतिभा रंगून गेलेली आहे. निर्गुण, निराकार, अविनाशी, अनिर्वचनीय असे विश्व चैतन्यरूप असलेले परब्रह्म कृष्णरूपात सगुण साकार होताच नाथांच्या वाणीला चैतन्याचा स्पर्श होतो. ती अनुभूती ते शब्दबद्ध करण्याचा प्रयत्न त्यांची प्रतिमा करते. 'चिद्रूप चराचर', 'ज्ञानगर्भुसार' असलेल्या चैतन्यरूपाला नाथांच्या अभंगातून एक व्यक्तित्व लाभते. कृष्णरूप न्याहाळता न्याहाळता नाथ मनोमन कृष्णरूप होऊन जातात. ही तन्मयता एकीकडे कवीची तन्मयता असते तर दुसरीकडे ईश्वर आणि भक्त यांची एकरूपता असते. एक संपूर्ण प्रसंग त्यातील बारकावे, मुग्धता, कृष्णाविषयीची आस्था या साऱ्या भावनांना आणि कल्पनांना गोचर करण्यात नाथांना यश आलेले असते.

यशोदा दधिमंथन करीत असता कुठून तरी कृष्ण धावत येतो व तिची रवी धरून ठेवतो. त्या वेळी तिथे आलेल्या राधेला यशोदा कृष्णाचा खट्याळपणा पुढील शब्दांत सांगते :

*करू देईना मज दूध तूप बाई*
*मथिता दधि तो धरी रवी ठायी ठायी*
*हट्टे हा कदापि नुमजे समजाविल्यास काई ।*
*समजावुनि याते तुझ्या घरास नेई नेई*
*राधे हा मुकुंद कडिये उचलोनि घेई घेई*
*रडताना राहिना करू यास गत काई काई ॥*

(रा. अ. जोशी सं. स. सं. गा. खंड २ । अ. क्र. ७७)

कृष्ण आणि त्याचे सवंगडी यांच्या खोड्यांनी गौळणी हैराण होऊन जातात. कृष्णाला पकडून शासन करण्याचे त्यांचे मनोरथ विफल ठरतात. मग त्या यशोदेकडे दाद मागण्यास येतात. अशा गौळणींचे एक गाऱ्हाणे नाथांनी पुढीलप्रमाणे वर्णिले आहे.

गौळणी सांगति गाऱ्हाणी, रात्री आला चक्रपाणी ।
*खाऊनि दही, दूध, लोणी, फोडिली अवघी विरजणी ।*
*हा बाई कोणासि आवरेना ॥*
*यशोदे बाळ तुझा तान्हा, कोठवरी सोसू मी धिंगाणा ॥ ध्रु. ॥*

(तत्रैव ६९)

कृष्ण थोडा मोठा होताच नंद त्याला गायी राखण्यासाठी रानात पाठवितो. त्याच्याबरोबर गोकुळातील अन्य गोपबालकेही असतात. कृष्ण मुरली वाजवून स्वतःची व इतरांची करमणूक करतो. त्या मुरलीने स्थिर चराला वेड लागते. सर्व आसमंत स्वरांनी भरून धुंद होतो. मुरलीचा स्वर ऐकून गोकुळातील गौळणींनाही कृष्णाचा वेध लागतो. त्या अस्वस्थ होतात. त्यांच्या हातून गृहकार्यात प्रमाद घडू लागतात. मग त्या एकमेकींना हाका मारून कृष्णसहवासासाठी वनात जायला निघतात. अशा प्रसंगी एका गौळणीची काय अवस्था होते हे नाथ सांगतात :

*नंदनंदन मुरलीवाला, याच्या मुरलीचा वेध लागला ।*
*प्रपंच धंदा नाठवे काही, मुरलीचा नाद भरला ह्रदयी ॥*
*पतिसुताचा विसर पडला, याच्या मुरलीचा छंद लागला ।*
*स्थावर जंगम विसरुनि गेले, भेदभाव हरपला ॥ (१४८)*

*किंवा*

*अहा रे सावळिया, कशी वाजविली मुरली ॥ ध्रु. ॥*
*तुझ्या मुरलीचा, ध्वनी अवचिता पडिला कानी ।*
*विव्हळ झाले अंतःकरणी, मी घरधंदा विसरले ॥ (१५१)*

**समारोप**

प्रौढ स्वरूपाचे ग्रंथ लिहिणारे नाथ भावपूर्ण रचना किती सरस करू शकतात याचा अनुभव त्यांच्या पदांतून आणि गौळणीतून येतो. 'असा कसा देवाचा देव बाई ठकडा । देव एका पायाने लंगडा ॥' अशा अत्यंत साध्या भाषेतून नाथांनी श्रीकृष्णाचे रम्य रूप रेखाटले आहे. 'भिंगाचे भिंगुळे' खांद्यावर अंगुले नाचत तान्हुले यशोदेचे हे पण कृष्णवर्णनपरच पद आहे. पण त्यातील भाषेची सहजता आणि बालभाव पाहिले की रामायण आणि स्वयंवर यांची रचना करणारे नाथच ही पदे लिहीत आहेत काय असा प्रश्न पडतो.

*ऐक ऐक सखये बाई नवल मी सांगू कायी ।*
*त्रैलोक्याचा धनी तो हा यशोदेसी म्हणतो आई ॥ (१०७)*

हे नाथांचे पद तर प्रासादिकता आणि स्त्री-सुलभता यांचे सुंदर प्रतीकच होय. पदलालित्य हे नाथांच्या पदांचे उल्लेखनीय वैशिष्ट्य होय. काही पदांतून नाथांच्या संगीतज्ञानाचीही साक्ष मिळते. थोडक्या शब्दात चित्र उभे करण्याचे नाथांचे कौशल्य 'वारियाने कुंडल हाले। डोळे मोडीत राधा चाले' या पदात आढळते. नाथांनी वर्णिलेल्या कृष्णाच्या बाललीला जितक्या सुलभ तितक्याच अध्यात्मपूर्णही आहेत हे बाळक्रीडेच्या अभंगांवरून स्पष्ट होते. यमुनातीरावरील कृष्णाच्या विटीदांडू, चेंडूफळी, लपंडाव इ. तत्कालीन खेळांवर नाथांनी अध्यात्मपूर्ण रूपके रचली आहेत.

उदा :

*कृष्णा कैसी खेळू लपंडाई । अनंत लोचन तुझे पाही ।*
*तेथ लपावे कवणे ठायी । तुझे देखणे लागले पाही ॥ (१९५)*

खोडकर कृष्णाबद्दल गौळणी यशोदेजवळ

*कवाड भ्रांतीचे उघडिले । कुलूप मायेचे मोडिले ।*
*शिंके अविद्येचे तोडिले । बाई तुझिया कृष्णे ॥*
*डेरा फोडिला दंभाचा । त्रिगुण तिवईस ठाव कैचा ।*
*प्रपंच सडा हा ताकाचा । केला तुझिया कृष्णे ॥ (१०१)*

अशी कृष्णाबद्दल तक्रार करतात. नित्य व्यवहारातील या तक्रारीत नाथांनी अध्यात्म किती सहजपणे गुंफले आहे ! आपल्या गौळणीमध्ये नाथांनी शृंगाराचा रंग भरला आणि त्याला अध्यात्माची किनार जोडली. नाथांची पदे आणि गौळणी कीर्तनात रोचकता वाढविण्यास फार उपयुक्त ठरल्या. प्रपंचातील भाव आणि विचार रंगवीत नाथ अध्यात्मात केव्हा नेऊन सोडतात हे कळतदेखील नाही. *'राधा पाहुनि भुलले हरी । बैल दुभे नंदाघरी ॥'* असे शृंगारयुक्त आणि विनोदपूर्ण वर्णन करून *'मन मिळालेसे मना । एका भुलला जनार्दना।'* अशी अध्यात्माची कलाटणीही नाथ चटकन देतात. *'तुझी संगती नाही कामाची । मी सुंदरा कोवळ्या मनाची ॥'* 'कृष्णा माझा पदर धरू नको सोड' या नाथांच्या गौळणी आजदेखील लोकप्रिया आहेत. तुझे श्रीमुख सुंदर, कशी जाऊ मी वृंदावना, कुणीतरी सांगा गे, खेळे भवरा ग, एके दिनी नवल झाले, गोकुळी आनंद जाहला, दुडीवरी दुडी, ऐक ऐक सखये, कृष्णाला भुलविले गोपीने, आनंद सोहळा वृंदावनी पाहो, मनमोहन मुरलीवाला, मुरली मनोहर रे, अधरी धरूनी वेणू, काळी घोंगडी हाती काठी, गोधने चारावया जाती शारंग पाणी, खांद्यावरी कांबळी, रडते माझे बाळ तान्हे, असा कसा देवाचा देव, अरे कृष्णा अरे कान्हा, पहा हो पाहा वृंदावनी आनंदु, रूपे सुंदर सावळा गे माये इ. आकाशवाणीवरून ऐकावयास मिळणाऱ्या व ध्वनिमुद्रिका-ध्वनिफिती यांच्या रूपाने अजरामर झालेल्या गौळणी या त्याची साक्ष आहेत !

ओम्. गो. श्रीदत्तोपासक
श्रीदत्त-विठ्ठल मंदिर, ३३ मंगळवार पेठ,
पुणे ४११ ०११.

# दिव्यत्वाची जेथ प्रचिती !

**सौ. पुष्पा अरुण जोशी**

एम.ए. मराठी, विविध विषयांवर लिहिण्याची आवड, व्यक्तिचित्र, प्रवास वर्णन यावर लेखन, इ. १० पर्यंत घरी गणित, शास्त्र, मराठी, संस्कृत या विषयांचे मार्गदर्शन.

भारतीय संस्कृतीला जात्याच अध्यात्मिक बैठक आहे. मनाने 'भगवे होऊन' कर्तव्य करीत राहणे हे भारतीय मनाला सहज जमते. त्यातून महाराष्ट्रातील संतांची परंपरा तर फार मोठी. ज्ञानोबांपासून थेट तुकोबांपर्यंत. ही परंपरा महाराष्ट्राच्या मनामनात खोलवर रुजून आहे. म्हणूनच विशेषतः मराठी माणूस प्रपंचात पूर्णपणे न गुंतता सगुण भक्तीच्या साहाय्याने आपला आपल्याला तारून नेतो - अनेक संकटातून, अडी-अडचणींतून आणि या भवसागरातूनही !

*'पांडुरंग कांती दिव्य तेज झळकती ।*
*रत्नकीळ फांकती प्रभा ।'*

अशी सगुण ब्रह्माची वारकऱ्यांच्या आदिपिठी युगानुयुगे 'कर कटावरी ठेवूनिया' 'विटेवरी' उभी असणारी विठ्ठलमूर्ती साऱ्या महाराष्ट्राचे आदि-दैवत आहे. अगदी ज्ञानदेवांपासून चालत आलेली ही परंपरा भगवी पताका घेऊन हरीनामाचा गजर करीत-करीत पुढे-पुढेच जात आहे आणि वेळोवेळी व्यक्ती-व्यक्तीगणिक समाजमनालाही एक मोठेच बळ देऊन आहे. हरीनाम घेत या परंपरेने स्वार्थ नि परमार्थ यांना एकत्र सांधले आहे.

परमार्थ, आत्मानात्मविचार, अध्यात्म असे जाडे शब्द वापरले की फार अवघडल्यासारखे होते हे, खरे पण परमार्थ म्हणजे दुसरे-तिसरे काहीही नाही. कर्ता-करविता 'तो' आहे. सगळीच कर्मे 'त्या' ला अर्पण करून करायची ! बस्स. एकदम सोपे काम !

ज्ञानदेवांनी हेच पटविण्यासाठी सर्वांना समजेल अशा मायबोलीतून 'ज्ञानेश्वरी' लिहिली. तीच पताका हाती घेऊन पुन्हा दोन शतकांहून अधिक काळ उलटल्यावर एकनाथांनी तेच केले. मराठीला हाताशी धेऊन 'भागवता'वर टीका लिहिली. केवळ जनसामान्यांच्या कळवळ्याने. नाथांच्या शब्दात सांगायचे झाले तर,

*''म्लेंच्छे गांजिले देवभक्ता । महिमा उच्छेदिला सर्वथा ।*
*न चले जपतप तत्त्वता....''* किंवा
*''न चले कर्माचे आचरण । विधि निषेधांचे महिमान ।*
*लोपली तीर्थेजाण । देव प्रतिमा पाषाण ॥*
*न ठाके कोठे कोणाचा भाव । अवघा लटिका व्यवसाय''*
*किंवा ''आपुलाला धर्म नाचरती जनी ।*

अपिक धरणी पीक न होय ॥'' अशी अवस्था झाली होती. समाजाचे अधःपतन झाले होते. समाजात अन्याय, विषमता, निर्दयता, दीनदुबळ्यांची दुःस्थिती फार वाढली होती. स्वतःला विद्वान, ब्रह्मवेत्ते समजणाऱ्या पाखंडी नि कर्मठ अशा मूठभर व्यक्तींच्या हाती धर्मसत्ता गेली. सततच्या परकीय आक्रमणामुळे समाज गदूळला होता. ढवळून निघाला होता. रंजिस आला होता. अशा अत्यंत प्रतिकूल परिस्थितीत या समाजाला वर उचलण्यासाठी 'जनार्दना'चा 'एका' हात देता झाला; मोठ्या कणवेने, असीम कळवळ्याने नि अपार मायेने !

जात्याच प्रेमळ चौकस व कुशाग्रबुद्धीचे असलेले नाथ १२ वर्षे गुरुगृही आणि नंतर गुरुसमवेत तीर्थाटने करून परिपक्व झाले होते. ज्ञानी बनले होते.

*''मी कोण कोठिल कुठे मजलागी जाणे ॥*
*का हे जगात घडले मज साथ येणे ॥''*

अशी संदिग्ध भूमिका पूर्णपणे नाहीशी होऊन 'यच्चयावत भूतमात्र म्हणजे सख्खी भावंडेच हे ज्याला समजले तो खरा ईश्वराचा भक्त आणि तोच खरा ज्ञानी ' अशा ठाम भूमिकेने समाज कल्याणासाठी कटीबद्ध झाले ते जनार्दन शिष्य एकनाथ

आता एकनाथ आंतर्बाह्य ज्ञानी, संयमी, विवेकी, विचारी बनलेले होते म्हणूनच ना त्यांनी तथाकथित धर्ममार्तंडांची गय केली ना पर्वा ! तर निर्भिडपणे माणुसकी, सदयता, समता यांचा पुरस्कार केला. त्यांनी भागवत धर्माचा प्रसार आणि प्रचार करता-करताच 'जनते'मध्येच 'जनार्दन' म्हणजे परमेश्वर पाहिला आणि जनसेवा म्हणजेच परमेश्वरसेवा हेच आपल्या आयुष्याचे ध्येय ठेवले. तेच व्रत शेवटपर्यंत अंगिकारले.

परम नीतीमान, सदाचार संपन्न, ब्रह्मज्ञानी नाथांची जी एकनाथी भागवत, हस्तामलक, आनंद लहरी, रुक्मिणी स्वयंवर, भावार्थ रामायण, स्वात्मसुख यासारखी त्यांच्या प्रतिभेचा, भाषाशैलीचा, विद्वत्तेचा उच्चांक दाखविणारी ग्रंथरचना आहे. त्यातही नाथांचे रसाळ कवित्व आणि लोकोद्धाराची तळमळ दिसून येते. या जनसामान्यांच्या उद्धारासाठी, प्रगतीसाठी नाथांनी साधन वापरले भजन, प्रवचन, पुराण-कथन यांचे ! गृहस्थाश्रमाचे आचरण करीत कथा-कीर्तनाद्वारे जन-जागृतीचे खडतर व्रत नाथांनी हाती घेतले. इथे त्यांचे व्यवहारचातुर्य असे की अठरा-पगड जातीचे लोक त्यांचे पुराण ऐकायला येत आणि हो या सर्वांनी यावे हरी-कथा ऐकाव्यात. त्या निमित्ताने देवाचे नाव त्यांच्या कानी पडावे चार-दोन नीतीपाठ त्यांना समजावेत म्हणून नाथच १-१ ओंगराळे साखर आलेल्या श्रोत्यांना कथा-कीर्तनानंतर वाटीत असत. प्रथम साखर मिळेल या आशेने ते लोक येऊ लागले. पण हळूहळू नाथांचे बोल ऐकण्यासाठी नाथांना लाच नाही द्यावी लागली. उलट साखरेहुनही गोड आणि अति सोप्या भाषेतील नाथांची कथा ऐकायला दूरदूरचे लोकही येऊ लागले. नाथांना काय? तेच तर हवे होते.

अठरा पगड जातीच्या सर्वसामान्य जनतेला समजेल असे बोलायचे.

यासाठीच तर नाथांनी खेळांचे वर्णन करणारेही अनेक अभंग रचले. या अभंगातून नाथांनी लोकांना अध्यात्म शिकवले 'कांडण', 'पिंगा', 'भोवरा', 'लपंडाव', 'झोंबी', 'एकीबेकी' या सर्वांतून अगदी हसत-खेळत परमार्थ सांगितला आणि तोही 'हरिबोला देता हरिबोला घेता' असा हरिनामाचा प्रसाद वाटत-वाटत ! यातूनच वेदांत आणि व्यवहार यांची सांगड घालून मोक्षाचा ठेवाच नाथांनी लोकांना दाखवून दिला.

एकनाथांच्या अगोदर ज्ञानेश्वर-नामदेवांनीही 'भारुड' रचना केली होती. पण 'भारुडे' म्हटले की एकनाथच डोळ्यांसमोर येतात. कारण त्यांची जवळ-जवळ ३०० भारुडे आहेत. नाथांनी आपल्या भारुडांच्या मदतीने जनसेवा केली, लोकजागृती केली त्यासाठी

*"भूत लागले नारदाला । साठ पोरे झाली त्याला ॥*
*भूत लागले ध्रुवबाळाला । उभा अरण्यात ठेला ॥"*

असे म्हणत नाथ 'भूत्या' बनले. तर कधी त्यांनी 'अनादी निर्गुण प्रकटली भवानी.........' म्हणत जोगवा मागितला. कधी 'गोंधळी' होऊन 'आईचा गोंधळ घातला' तर कधी 'चार वेदांना झाडणारा' व 'सहा शास्त्रांचा केर भरणारा' महार बनून 'जोहार' घातला. 'जोहार मायबाप जोहार' म्हणत या नाथांच्या महाराने कधी-कधी रोख-ठोक बजावलेलेही आहे

*'ऐका ऐका पाटील बोवाजी । गाव बरा राखा राजी*
*उद्या येतील यमाजी बाजी । फटफजिती होईल की जी ॥'*

नाथांचा 'डोंबारी' हा 'निराकाराचा डोंबारी' आहे. तर कोल्हाटी 'सोऽहंशब्दे' 'ढोलके' पिटणारा आहे. त्याचा 'येसकर' भक्तीची कास धरणारा आहे. म्हणूनच नाथ सर्व अठरापगड जातीचे नाथ झाले. सोनार असू दे, महार असू दे नाहीतर मांग असू दे प्रत्येकाला नाथ आपले जीवाभावाचे वाटत होते. नाथांच्या ठिकाणी त्या सर्वांची भक्ती जडली होती. दीन-दलितांविषयी नाथांच्या मनी अपार अनुकंपा होती. त्यांच्याशी वागताना अति कोमल, हळूवार, होणारे नाथ, शांतिब्रह्म नाथ जेव्हा समाजातील नैतिक अधःपतनाचे चित्र जवळून पाहतात, आपआपसातील मत्सर, हेवे-दावे, दंभ, अहंकार, विषयवासना, भोग, लपंटता या दुर्गुणांमुळे नासलेल्या समाजाला पाहतात, तेव्हा आदिमाया मूळ प्रकृती भगवतीला ते कळवळून म्हणतात,

*"दंभ झोटिंग महाबळी । अहंकार मुंज्या छळी ।*
*आशा मनशा तृष्णा घेऊनि गोंधळी । विषय कल्लोळी नाच तू ।"*

म्हणून बया दार लाव म्हणतात. तर समाजातील काम, क्रोध, अहंकार, अज्ञान नष्ट झाल्याशिवाय समाजाची शक्ती प्रकट होणार नाही. ही समाजाची शक्ती प्रकट होण्यासाठी,

*"उदो उदो ऐसा शब्द गाजतो । काम क्रोध दैत्यावर कोरडा कडाडा वाजतो*
*ज्ञान पोत पाजळतो । बोध परडी हाती घेतो ।*
*प्रेमाचा पाऊड पुढे ठेवितो । अहं शंखासुर दैत्य बळी देतो ॥"*

तेव्हा "बया दार उघड" म्हणत विश्वमोहिनीस साद घालतात. या सर्वच भारुड, भजने, पदे इत्यादी लेखनातून नाथांच्या मनातील आशा-आकाक्षांचा, भावनांचा उद्रेक आपल्याला पाहायला मिळतो. समाजाविषयीची कळकळ दिसून येते. तसेच त्यांच्या चारित्रसंपन्न जीवनपटाकडे पाहिले की एक आदर्श कर्मयोगी आपल्यापुढे ठाकतो.

जनार्दन स्वामींच्या घरी ज्ञानलालसा आणि परमेश्वरभेटीच्या इच्छेने राहिलेला पोरवयातील 'एका' एक पैच्या हिशोबासाठी रात्र जागवतो नि हिशोबाचा मेळ जमल्यावर साक्षात् परमेश्वर भेटल्याचा आनंद त्याच्या मनी-मानसी होताना दिसतो. अन् वाटते आज काय? आज 'बोफोर्स', 'हवाला', 'सांगली खत गैरव्यवहार', 'माजीमुख्यमंत्री जयललिता - भारतीय इमेल्डा मार्कोस' अशी एकसे बढकर एक प्रकरणे डोळ्यांसमोर थैमान घालू लागतात नि मन व्याकुळ होते.

एकनाथांचा काळ म्हणजे मातलेल्या, माजलेल्या म्लेंच्छ सत्ताधिशांचा. पैठणचा एक यवन, नाथ गोदावरीवरून स्नान करून आले की पान खाऊन थुंकत असे ! नाथ परत स्नान करून येत न चिडता ! एकदा तर म्हणे असे १०८ वेळा घडले. शेवटी त्या यवनालाच लाज वाटली. त्यानेच पुढे येऊन नाथांना साष्टांग दंडवत घातला. सत्ताधांच्या पिळवणुकीचे चित्र तर येथे स्पष्ट होतेच. पण खरे तर धन्य त्या शांतिब्रह्म नाथांची ! असा शांतिपाठ घालून देणारा एखादा नाथ आज भेटेल का तरी?

नाथ आपल्या कथा-कीर्तनांत, पुराण-कथनात ध्रुव, प्रल्हाद गोष्टी, राम, कृष्ण गोष्टी, दशावतारांच्या कथा, तुलसी माहात्म्य, एकादशी व्रत, सुदाम-कृष्ण कथा अत्यंत रसाळपणे नि सोप्या भाषेत सांगत. नाथ म्हणजे जणू आचार-विचारांचे चालते-बोलते शुद्ध नीतिपाठच ! जत्रेला जसे हवशे, गवशे, नवशे असतात ना? तसे नाथांच्या श्रोत्यांमध्ये कुचाळ कथा करणारे, वेळकाढूपणा करणारे असे लोक होतेच. पण भक्तीभावाने येणारे श्रोते खूप ! असेच एकदा नाथांनी 'पिंगला आख्यान' लावले. सर्व प्रकारच्या श्रोत्यांमध्ये एक वेश्याही होती. तिलादेखील ही 'चिळसी' आणणारी 'जिविका स्थिती' पिंगळेप्रमाणेच अतिशय दुःसह झाली. झाले ती पैठणची वेश्या नाथांच्या भजनी लागली. पिंगलेचे दुःसह व्यक्त करताना नाथांची प्रतिभा समरसून गेली होती. कर्मठ समाज काय म्हणेल याची नाथांना पर्वाच नव्हती. म्हणूनच त्या पैठणच्या वेश्येने विनंती करताच नाथ तिच्या समाधानासाठी तिच्या घरी गेले. भक्तीभावनेने ओथंबलेल्या तिने नाथांकडून 'रामकृष्ण हरी' हा सोपा मंत्र घेऊन कालांतराने आपली देहयात्रा 'रामकृष्णहरी' म्हणतच संपवली. आज आपल्याला काय दिसते? स्त्रीची प्रतिष्ठा मोलाची मानणारा आपला समाज असून झालाय का वेश्या-व्यवसाय बंद? होत नाहीत का स्त्रियांवर अत्याचार?

एकदा असेच रात्रीचे कथा-कीर्तन संपले नाथ देवघरामध्ये देवासमोर ध्यानस्थ बसलेले. बाकी सगळीकडे निजा-निज झालेली. चोर घरात शिरले. जे काय न्यायचे ते दाराशी नेऊन ठेवले. पण मोह कुठे आवरतोय त्यांना? अजून काही मिळतेय पाहायला थेट देवघराशी गेले नि काय चमत्कार ! त्यांची दृष्टीच गेली. अंध झालेले ते जायला निघताच उंबऱ्याशी अडखळले. नाथांची 'भावसमाधी' भंगली. चोरांना पाहून आपण आरडा-ओरड करतो. पण नाथांचे न्यारेच वागणे. त्यांनी चोरांच्या डोळ्यांवरून हात फिरवला. चोरांना दृष्टी आली. एवढेच नव्हे तर नाथांनी त्यांना खाऊ-पिऊ घालून आपला गृहस्थधर्मही पाळला नि चोरांची अशी बोळवण केली. एवढे सदाचारी व्यक्तिमत्त्व अनुभवल्यावर

ते चोर पुढे सदाचरणी, सद्‌वर्तनी झाले यात नवल ते काय? बघा ना या कर्मयोगी नाथांचे कवतिक ! पदनतांना चांगली वागणूक देऊन सुधारण्याचा जणू त्यांनी आपल्याला परिपाठच घालून दिला.

एकदा एका ब्राह्मणाने नाथाघरी आपल्याजवळील परीस ठेव म्हणून ठेवला नि तो गेला तीर्थयात्रेला. इकडे नाथांनी तो ठेवला देव्हाऱ्याखाली. तो परीस नाथशिष्य उद्धवाकडून निर्माल्यसमवेत पडला जाऊन गोदावरीच्या पाण्यात ! काही दिवसांनी परत आलेल्या ब्राह्मणाने परीस मागितला की परत. निरिच्छतेची परिसीमा असणारे नाथ परीस विसरूनच गेले होते. आता काय ! नाथांनी काय करावं? गोदावरीत डुबकी मारून तळाचे ओंजळभर दगड ब्राह्मणापुढे धरून म्हटले 'जो तुझा परीस असेल तो परीस घे' अहो काय आश्चर्य ते सारेच दगड परीस ! बिच्चाऱ्या ब्राह्मणाची जीभ टाळ्याला लागली असेल. नाथांनी उरलेले दगड टाकले गोदावरीत ! आहे न गंमत ! परत-परत तेच ! आज काय स्थिती आहे? खरेच असा एखादा परीस कुणाला आज सापडला तर? मला वाटते त्या परीसाच्या लोभाने आज काय-काय घडू शकेल याची कल्पना करणे माझ्यासारख्या पामराला अशक्यच !

श्रवण, कीर्तन, स्मरण, अर्चन आदी नवविध भक्तींपैकी वंदन हाही एक भक्तीचा प्रकार ! समोर येणाऱ्या भूतमात्रास नमन करणे हा या भक्ती प्रकाराचा आचार. नाथांचा एक शिष्य होता. या शिष्याला दंडवत स्वामी असेच नाव पडले होते. कारण त्यांनी ही नमन भक्ती अंगिकारली होती. एकदा समोर दिसलेल्या गाढवास त्यांनी नमस्कार घातला आपल्या नेहमीच्या सवयीने पण ते गाढव मेलेले. ते झाले जिवंत आणि या दंडवत स्वामींचा उदो-उदो होऊ लागला. चमत्काराला नमस्कार करणारे समाजमन आपण इथे पाहतो. पण दूरदृष्टीच्या नाथांनी ताडले नमन भक्तीद्वारे मोक्षाप्रत जाऊ शकणारा आपला शिष्य लोकांनी डोक्यावर घेतला तर सिद्धीच्या मागे लागेल नि त्याची आध्यात्मिक प्रगती खुंटेल. म्हणून नाथांनी या दंडवत स्वामींना समाधिस्थ होण्याची आज्ञा केली. शिष्याच्या मृत्यूस कारणीभूत झालेल्या नाथांना लोकांनी टोचायला सुरूवात केली. समाजाला न घाबरणाऱ्या नाथांच्या दृष्टीने व्यक्तिगत आध्यात्मिक प्रगती अधिक श्रेष्ठ होती.

म्हणूनच पैठणचाच एक व्यापारी केवळ पैशाच्या मागे लागलेला ! देवधर्म, कथा-कीर्तन, पुराण-श्रवण, नामस्मरण यातले काहीही त्याला सुचत नसे. केवळ पैसा-पैसा नि व्यापार उदीम. नाथांनी काय करावे? नाथ रोज त्याच्या दुकानात जात व त्याला एक विष्णुसहस्त्रनामाचा श्लोक शिकवित. लिहून देत आणि पाठ करायला लावीत. असे करता-करता त्या व्यापाऱ्याचे सारे विष्णुसहस्त्रनाम पाठ झाले. आता नाथांनी त्याला एवढेच सांगितले की सतत हे विष्णुसहस्त्र नाम म्हणायचे. हाताने आपले दैनंदिन उद्योग चाललेले नि मुखी तन्मयतेने विष्णुसहस्त्रनाम ! अशी अवस्था त्या व्यापाऱ्याची झाली ! देह ठेवतानादेखील त्याच्या मुखी विष्णुसहस्त्र नाम असेल तर त्यात विशेष ते काय ! खरे कर्तृत्व आपल्या नाथांचे !

अशा या नाथांच्या किती म्हणून कथा सांगाव्यात? काशीहून मोठ्या परिश्रमाने आणलेली गंगा तहानेने व्याकूळ झालेल्या गाढवाच्या मुखी घालणारे सर्वांभूती परमेश्वर पाहणारे एकनाथ; निर्भिडपणे, प्रसन्न मुद्रेने महाराघरी अन्नब्रह्माचा स्वाद घेणारे, सर्वसमभाव जपणारे एकनाथ; नाथांना राग आणू पाहणाऱ्या ब्राह्मणावर न रागावता उलट त्यालाच २०० रु. अधिक मिळवून देणारे शांतिब्रह्म नाथ ! अशा नाथांच्या अनेक कथा. कुठे नाथांच्या उक्ती आणि कृतीमध्ये असणारे एकरूपत्व नि कुठे आजच्या तथाकथित समाजधुरिणाचे दुटप्पी वर्तन ! 'नच पुरे ही वाणी' अशी अवस्था होतेय खरी !

नाथांची प्रचंड लेखनसंपदा, त्यातील कथा, त्यातील भावार्थ, त्यातील विचारधन, त्यातील अध्यात्म आपल्याला समजो न समजो. पण ते जसे आयुष्य जगले त्यामुळे त्या काळात सर्वसामान्य माणसाला ते जसे आपले वाटत होते तसेच आजही प्रत्येकाला आपले हितचिंतक आपले आप्तस्वकीय वाटतात आणि

*"नीति सांगतो ऐका एक । दाससभेचा सेवक ।*
*मन टाळू नका एक । कोणी एक कोणी एक ।"*

असे म्हणत सहजपणे सोप्या भाषेत ते यशस्वी जीवनाला आवश्यक असा नीतिपाठ सांगतात. 'लाच खाऊ नये', 'इमान सोडू नये', 'सज्जनासी विटू नये', 'नीचासवे बाटू नये', 'खळासंगे भांडू नये' असे म्हणतात. स्वत: स्वीकारलेला, पाळलेला गृहस्थधर्म त्यांच्या जनता-जनार्दनास, अठरापगड जातीतील प्रत्येकास समजणारा आहे. कळणारा आहे. अमलात आणता येण्यासारखा आहे. 'सद्‌गुरु सेवा सोडू नये'. 'कुळधर्मासी मोडू नये' 'पापद्रव्य जोडू नये' अशा प्रकारे सारी आचार संहिता सांगत-सांगत सामान्यांच्या हाती जणू संसार सुखाची गुरुकिल्ली देणारे नाथ खरे तर कसे आहेत?

त्यांच्यात शब्दात सांगायचे झाले तर

*"सगुण चरित्रे परमपवित्र सादर वर्णावी ।*
*सज्जनवृंदे मनोभावे आधी वंदावी ।।*
*संतसंगे अंतरंगे नाम बोलावे ।*
*कीर्तनरंगे देवासंन्निध सुखे डोलावे ।। "*

असे आहेत आपल्या सर्वांचे नाथ ! एकमेव असे 'एकनाथ'

एकूणच नाथांनी

*'विष्णुमय जग वैष्णवांचा धर्म । भेदाभेद भ्रम अमंगळ ।'*

असे म्हणत केवळ उक्ती नव्हे तर कृतीही केली. नाथांची ही भक्ती, नाथांचे हे साधुत्व स्वत: अनुभवण्याचा मोह प्रत्यक्ष परमेशालाही आवरता आला नाही. म्हणूनच प्रत्यक्ष परमेश्वर 'श्रीखंड्या' होऊन ज्या नाथांच्या घरी १२ वर्षे पाण्याच्या कावडी वाहून नाथांची सेवा करीत होता त्या नाथांविषयी तुकोबारायांनी काढलेले उद्‌गार,

*"ब्राह्मणाचा पोर एक खेळिया भला ।*
*तेणे जन खेळकर केला रे ।"*

सार्थ तर वाटतातच. शिवाय अशा भव्य, दिव्य, उत्तुंग व्यक्तिमत्त्वासमोर नक्कीच 'कर माझे जुळती ।' अशी सर्वांची अवस्था होते. खरे न !

सौ. पुष्पा अरुण जोशी
आय १०२, रत्यनगरी,
बिबवेवाडी, पुणे ३७.

# ॥ संत श्रीएकनाथ ॥

**श्री. शशिकांत कुलकर्णी**
मराठी दैनिक व साप्ताहिक यामध्ये 'एक तरी ओवी अनुभवावी' या सदरात लिखाण (ज्ञानेश्वरी)

महाराष्ट्र ही संतांची भूमी आणि महाराष्ट्रातील संतपरंपरेत श्रीएकनाथ महाराजांचे स्थान खूप महत्त्वाचे आहे. मराठी वाङ्मय साहित्यात एकनाथांचा दर्जा हा फार मोठा. त्याचप्रमाणे चरित्र आणि चारित्र्य याबाबतीतही महाराष्ट्राच्या संतमंडळीत एकनाथांचे स्थान हे आदराचे आहे. शंकराचार्य हे जसे संन्यास आश्रमाचे भूषण तसे एकनाथ महाराज हे गृहस्थाश्रमाचे मंडन आहेत. एकनाथांच्या संबंधी लिहावयाचे म्हणजे ते एक साधु पुरुष, एक महान संत, परमचारित्र्यसंपन्न गृहस्थाश्रमी असे अनेक दृष्टींनी लिहावयास पाहिजे. एकनाथांचा जन्म संभवतः १५३० ते १५३५ च्या दरम्यान झाला असे मानले जाते.

श्रीएकनाथांच्या वाङ्मयात तत्कालीन असे पुष्कळ उल्लेख आहेत. विशेष करून एकनाथकृत 'भावार्थ रामायणात' ही गोष्ट स्पष्टपणे दिसून येते. एकनाथांनी किती तीर्थक्षेत्रे पाहिली, किती प्रवास केला व त्यांचे तत्कालीन परिस्थितीचे ज्ञान किती व्यापक होते याची माहिती भावार्थरामायणात दिसून येते. बाराव्या वर्षी घर सोडून ते गुरुगृही गेले व तेरा वर्षे अध्ययन करून ठिकठिकाणची तीर्थक्षेत्रे करून पैठणला परत आले. तेरा वर्षांत जो विविध अनुभव मिळविला त्याचे प्रतिबिंब एकनाथांच्या वाङ्मयात दिसून येते. संस्कृतीला अनुसरून लेखन, वाचन, प्रवचन, कीर्तन यामध्ये त्यांचा काळ जात असे. श्रीएकनाथ महाराजांच्या चरित्रामध्ये विशिष्ट गोष्ट अशी की ज्याप्रमाणे त्यांनी उपदेश केला त्याप्रमाणे त्यांचे स्वतःचे वागणे होते. त्या काळामध्ये हरिजनांना घरी जेवायला घालणे, वडारांचा सत्कार-सन्मान करणे यासारख्या गोष्टी पाप समजल्या जात होत्या. 'देव सर्वत्र आहे' हे म्हणणे सोपे आहे; परंतु त्याप्रमाणे वर्तन करणे हे एकनाथांइतके कोणीही दाखविले नाही. जन्माने मनुष्य प्रतिष्ठा मिळवू शकत नाही, मनुष्य हा इयून-तेथून सारखाच आहे. ब्राह्मण, हरिजन, चोर, साव, गरीब, श्रीमंत, स्त्री, पुरुष या सर्वांशी त्यांची वागणूक साधुत्वाची होती. असाधारण अशी प्रतिष्ठा एकनाथांची होती. जीवनमुक्तीची जी लक्षणे गीतायोगवासिष्ठादि ग्रंथात आपण पाहतो त्यांचा प्रत्यक्ष धडा श्रीएकनाथांच्या आचरणात दिसून येतो.

पुराणात धर्म काही का असेना पण त्यापेक्षा अधिक उदात्त अशा वातावरणात जनतेला नेऊन उपनिषदांचे 'सर्व भूतांचे ठायी एकता आहे' आहे हे ध्येय एकनाथांनी कार्यान्वित केले.

एकनाथांचे वाङ्मय हे संत-वाङ्मय आहे. आत्मसाधनाचे खरे लक्षण म्हणजे एकात्म दृष्टी या गोष्टीवर त्यांनी विशेष भर दिला आहे. जग व आत्मा यातील भेद नष्ट झाले म्हणजे व आत्मसाक्षात्कार झाला म्हणजेच मोक्ष ही शिकवण स्पष्ट दिसून येते. तरीसुद्धा देवभक्त हा भेद मोडल्यानंतर भजन त्याचप्रमाणे कर्म का करावे याचे उत्तर नाथांनी अनेक दृष्टांतांच्या साह्याने दिले आहे. यात्रा करून यात्रेकरू घरी आल्यावर त्याचे श्रेय शिल्लकच राहते, अमृत प्याल्यानंतर अमृत संपले तरी पिणाराचे अमरत्व कायमच राहते. त्याचप्रमाणे देवाच्या प्राप्तीचे साधन जे भजन ते साक्षात्कारानंतर शिल्लक राहते.

*जेथे अभिमान समूल तुटे । तेथे चिन्मात्र पहाट फुटे ।*
*निरभिमान निरवधि । तेची अखंड समाधी ।*

अशा प्रकारची समाधीची व्याख्या एकनाथांनी केली. आत्मसाक्षात्काराने शरीर नव्हे तर चित्त स्थिर व समाधिस्थ झाले पाहिजे आणि तसे झाले तरच पुरुष हे योगाचे कोडे समजतो. समजू शकतो.

ब्रह्म व माया या बाबतीत प्रत्यक्षाची उपेक्षा होते म्हणून परब्रह्माच्या भोवताली मायेने आवरण टाकून ती थांबविली आहे अशी सुंदर कल्पना एकनाथांनी केली आहे.

अग्नि-देवाचे मुख पण त्यावर माणसे हात-पाय शेकतात. एवढेच काय थुंकतात. सृष्टीतील सर्व पदार्थांची उपेक्षा प्रसंगाने माणसे करतात; आणि हे सर्व परब्रह्माचे स्वरूप असूनसुद्धा होते म्हणून -

*तैसी परब्रह्माच्या अभक्ती - अवघ्या होती अधोगति ।*
*ते चुकविली निश्चिती - माया देवी ॥*

असे या गोष्टीला सुंदर स्वरूप दिले आहे.

मुक्ती व मोक्ष वर सांगितल्याप्रमाणे साक्षात्कार होणे आहे. मृत्यूनंतर मुक्ती ही कल्पना कशी चुकीची आहे हे पुढील अभंगात पाहावयास मिळते.

*मेल्यामागे मुक्ति । ते श्वानसूकरादि मरती ।*
*मेल्यामागे ब्रह्मप्राप्ति । हे जे सत्य मानावी युक्ति ।*
*ते जे जे प्राणी मरती । ते ते मुक्त होती अनायासे ॥*

हे सर्व साक्षात्कारानेच. ज्ञान केवळ ग्रंथ वाचनाने होत नाही त्यासाठी सद्गुरुचा उपदेश पाहिजे. निव्वळ देवभक्तीनेही हे होणार नाही. जे अनुभव व दिव्यसृष्टी काष्टपाषाणादिकाचे देव देत नाहीत ते अनुभवसद्गुरु व संत महात्मे देतात. संतांच्या विभूती धर्मासाठी अवतार घेतात व जगाला सदुपदेश करतात.

*जे धर्माची वाट मोडे । अधर्माची शीग चढे ।*
*ते आम्हा येणे घडे । संसारस्थिती ॥*
*नाना मते पाषांड । कर्मठता अति बंड ॥*
*तयाचे ठेचणे तोंड । हरिभजने ॥*

समाजामध्ये ज्या वेळेला अशा प्रकारे पाखंड माजले जाते, अधर्म वाढला जातो त्या वेळेला संत महात्मे आपल्या वर्तनाने व उपदेशाद्वारे समाजाला मार्गावर आणतात. ही गोष्ट संत असल्यामुळे देवाधर्माच्या बाबतीत केली जाते आणि हिंदू समाजाची रचना संपूर्णपणे धार्मिक कल्पनेत असल्यामुळे त्याप्रमाणे तंत्र संतांनी वापरले असल्यास आश्चर्य वाटण्याचे कारण नाही आणि याचसाठी समाजातील सर्वसामान्य जनतेला उपदेश समजावा, खरा धर्म समजावा या हेतूने देशी भाषेतून (मायबोलीतून) धर्माचा उपदेश करण्याचा ज्ञानेश्वरांनी जो पायंडा पाडला, जी पाऊलवाट पाडली तिचा विस्तार एकनाथमहाराजांनी केला. तिला राजरस्त्याचे रूप दिले.

एकनाथी भागवत हा ग्रंथ सर्वांत श्रेष्ठ असाच आहे. भागवतामध्ये सर्व अध्यात्मविषयाचाच प्रपंच केला आहे. भक्तीमार्गात 'भक्ती' हाच भागवताचा मूळ सिद्धांत आहे आणि भागवत ग्रंथ हा सामान्य लोकांसाठीच त्यांनी लिहिला.

*शब्दापुढे ज्ञान धावे ओवी पुढे अर्थ पावे ॥*
*जे जे जीवी विवंचले ते ते आवघे ग्रंथार्थ होय ॥*

या ओवीतील अर्थावरून लक्षात येते की, हा आत्मविश्वास नाथांनी प्रगट केला आहे.

*श्री भागवत आणि भाषा मऱ्हाटे हे बोलणे नवल वाटे ।*
*पुर्वी नाही ऐकले कोठे ।*

अशी नाथांची भूमिका आहे.

*पावोनी चतुश्लोकाचे ज्ञान ब्रह्मा झाला ज्ञानसंपन्न ।*
*करिता सृष्टीचे सृजन तिळभरी अभिमान बाधेना ॥*
*त्या ज्ञानाची सरळ कथा मऱ्हाठेया सांगेन आता ॥*

असे म्हणूनच नाथांनी भागवत ग्रंथाला सुरुवात केली आहे. त्याचप्रमाणे भागवत ग्रंथ लिहिण्यास आपल्याला प्रेरणा कशी झाली त्यांचे वर्णन नाथांनी खालील श्लोकांत केले आहे.

*एकांती आणि लोकांती थोर साक्षेप केला संती ॥*

भागवत हा ग्रंथ लिहिताना आपल्याला भगवंताचेच साहाय्य झाले हेही एकनाथांनी सांगितले. हा ग्रंथ लिहिला तो मराठी भाषेतून लिहिला त्या वेळी मोठमोठे पंडित आणि विद्वान हा वर्ग नाराज झाला. ज्ञानेश्वरांच्या बाबतीतही असेच घडले होते. यासाठी नाथांनी म्हटले, मराठी व संस्कृत या दोन्ही भाषा सारख्याच योग्यतेच्या आहेत. गायीचा रंग कसाही असला तरी दुधाचा रंग बदलत नाही. त्याचप्रमाणे अर्थही बदलणार नाही. संपूर्ण ग्रंथामध्ये अध्यात्मावरच जास्त भर आहे.

एकनाथ महाराज म्हणतात, भक्तियोग व सत्संग याशिवाय दुसरा मार्ग नाही, हा सिद्धांत सांगितला आहे. वेदातांचा अभ्यास म्हणजे विहिरीतून पाणी काढायला - -

*मोट नाडा बैलजोडी अखंड झोडता आसुडी ।*
*येता-जाता ओढाओढी ।*

अशा प्रकारची खटपट करावी लागते आणि एवढे करून काहीही लाभ होत नाही. पुढे याचसाठी म्हटले आहे अगदी सरळ, साधे.

*सरितेचा पाट । एक वेळ केल्या वाट ।*
*अहर्निशी घडघडाट । चालती लोट जीवनाचे ॥*

वेदांताचा अभ्यास म्हणजे विहिरीतून पाणी काढण्यासारखे आहे. भक्तीमार्ग म्हणजे सरिता. नदीच्या पाण्याला एकदा पाट काढला की पाहावे लागत नाही. अहर्निशी घडघडाट असे म्हटले आहे.

भागवतामध्ये भक्तीबद्दल म्हणजे भक्तीचे स्वरूप, सत्संगति, सच्छास्त्रश्रवण, सद्गुरुप्राप्ति, कीर्तन व नामस्मरण असे आहे. भक्तीमध्ये यमनियमादिकांचा विचार पण आहे. सांख्ययोग नित्यानित्यविवेक, धर्म, तप, त्याग, श्रोतस्मार्तकर्मे, व्रतेवैकल्ये, यज्ञ इत्यादी गोष्टींचे नाथांनी वर्णन केले आहे आणि हे सर्व केल्याने देवाची प्राप्ती अगर साक्षात्कार होत नाही असा सिद्धांत मांडला आहे. पुष्कळ वेळा ज्याला लौकिक भाषेत विटंबना म्हणता येईल अशा प्रकारची टीका केली आहे. उदा.

*अनंतव्रते व्रती झाला । चौदा गाठी देव बांधिला ।*
*शेखी अनंताते विसरला । देवो हरविला हातीचा ।*

भक्तीमार्ग कसा श्रेष्ठ आहे हे सांगताना नाथ म्हणतात की संत म्हणजे परमेश्वराचे स्वरूप. संत म्हणजे सचेतन परमेश्वर, प्रत्यक्ष पुरषोत्तम, चालते-बोलते परब्रह्मच. त्याचप्रमाणे गुरुबद्दल म्हटले आहे. गुरू कसा असावा याचे वर्णन या ओवीत पाहायला मिळते.

*शब्दज्ञाने पारंगत जो ब्रह्मानंदे सदा डुलत ।*
*शिष्य प्रबोधनी समर्थ ॥ असा तो असला पाहिजे*

शिष्याच्या बाबतीतही नाथमहाराज सांगतात तो निर्भय असला पाहिजे. अर्थजिज्ञासु, द्रव्याविषयी उदासीन असा समदृष्टी व स्वतंत्र दृष्टीचा असावा. ज्ञानाभिमानी असू नये. परमार्थाच्या सर्वांगीण ज्ञानाची उत्सुकता म्हणजेच अर्थजिज्ञासा त्यास असावी. त्याची वृत्ती उत्तम गुण जेथे आहेत ते मानावे अशी असली पाहिजे. नाम ! नामाचा महिमा नाथांची अनेक दृष्टीने वर्णन केला आहे. नाम हे एका व्यक्तीसाठी असते परंतु कीर्तन हे समुदायासाठी आहे. कीर्तनाचा प्रभाव किती असतो हे सांगताना नाथांनी प्रतिभा अति उच्च कोटीला पोहचली आहे. कीर्तनामुळे यमलोक ओस पडला. जपतपांना निराश करून सोडले. योगाभ्यास मरायला टेकला. कीर्तनाने वैकुंठपीठ हर्षाने डोलू लागले आणि शंकर तांडवनृत्य करण्यास प्रवृत्त झाला.

*नाशिली जगाची सर्व दुःखे । अवघे विश्वची हरिखे ।*
*भरिले महासुखे उचंबळत ॥*

किष्किंधाकांडात नामस्मरणाविषयी लिहिताना एकनाथ महाराजांनी मोठे मार्मिक आणि सुंदर वर्णन केले आहे.

*नामापाशी भुक्ति-मुक्ती । नामापाशी यशकिर्ति ।*
*नामापाशी विजयप्राप्ती । कर्मनिर्मुक्ती हरिनामे ॥*

नामस्मरण हे अखंड असले पाहिजे. हरिकीर्तनाप्रमाणे अखंड असावे व मनुष्य मुक्त झाल्यावरही ते सोडता कामा नये आणि ते जर मध्येच सोडले तर त्याची स्थिती कशी होईल त्यांचे वर्णन सुंदर कल्पनेत केले आहे.

*मुक्तपणाच्या विलासा । वनिताअधरी सुवर्ण फासा ।*

*पडोनि मुक्त आले नासा । रामपरेशा न भजोनी ।।*

मोती असतात त्यांना आपण मोकळे आहोत असे वाटते परंतु ते स्त्रीच्या नाकातील सुवर्णफासात गुंतविलेले असतात. त्याचप्रमाणे असा अभिमान नसावा.

भागवत धर्माचे थोडक्यात स्वरूप म्हणजे त्यात योग अथवा कर्म आड येऊ शकत नाही. भागवत धर्माचरण हा कल्याणाचा सुलभ आणि सोपा मार्ग आहे. ज्ञानी व अज्ञानी या दोघांनाही सुलभ असाच हा मार्ग आहे. 'इंद्रिये कोंडता येत नाहीत, विषय सांडिता येत नाही' आणि म्हणून यासाठी आत्मनिवेदन भक्ती, श्रवण आणि कीर्तन हे करूनच मुक्ती मिळवायची. ज्याठिकाणी मन आणि बुद्धी ब्रह्माला अर्पण केली जाते तेथे ती ढळत नाही आणि मग तिथेच खरी समाधी आपण मानली पाहिजे. भक्ती ही परब्रह्माशी मीलन करून देते. त्याठिकाणी मायेचे काहीही चालत नाही आणि भागवत धर्माचे मुख्य तत्त्व म्हणजेच भक्ती. ह्यामध्ये ज्ञान आणि वैराग्य यांचाही समावेश होतो.

*भक्ती म्हणजे सर्वांभूती । सप्रेम भजनयुक्ती ।।*
*प्राप्ती म्हणजे अपरोक्ष स्थिती । भगवतस्फूर्ति अनिवार्य ।।*

तर भागवत धर्माच्या बाबतीत भक्तीवर खूप काही लिहिले. एकनाथांनी भागवत ग्रंथामध्ये सर्व प्रकारचे सुंदर आणि मार्मिक दाखले दिले आहेत. दृष्टांत दिले आहेत. भक्तीधर्माचरण याप्रमाणे नाथांनी या श्रेष्ठ आणि महान ग्रंथात निरूपले आहे. निरूपण केले आहे.

श्रीएकनाथांचा परमार्थाविषयी साहित्यिक विस्तार फार मोठा आहे. ज्या लोकांना जनताजनार्दनास संस्कृतचा गंधही नव्हता, संस्कृत जाणणारा नव्हता अशा समाजामध्ये एकनाथ मिळून-मिसळून राहिले व त्यांना समजेल-उमजेल व त्यांच्या वर्तनात उमटेल असे साहित्य सोप्या व साध्या मराठी भाषेत दिले. ज्ञान आणि भक्तीचा उपदेश भागवतातून केला आहे. त्यांचे साहित्य असे आहे, दांभिकापासून सावध, शाब्दिकापासून दूर असा त्यात इशारा आहे. एकनाथमहाराजांनी ग्रंथरचना, प्रवचन, कीर्तन, उपदेश इत्यादी मार्गांनी हिंदू समाजात चैतन्य निर्माण केले. प्रपंचात राहून त्यांनी लोकांना सन्मार्ग दाखविला. जी अशी प्रजा (बहुसंख्य) होती की त्यांना योगमार्ग झेपणार नाही, ज्ञानमार्ग पेलणार नाही, इंद्रिय-निग्रह होऊ शकत नाही अशा प्रजेला नाथांनी उपकृत केले.

श्रीएकनाथांचा भागवत ग्रंथ इतका रसाळ आहे हे समजण्यासाठी तो वाचलाच पाहिजे. मराठी भाषेतील अलंकार, अनेक उपमा, कठीण गोष्ट अगदी सरळ, साध्या भाषेत समजाविण्याची हातोटी याचे वर्णन करता येत नाही.

शशिकांत कुलकर्णी
श्रीराम क्लब सामे (परामा)
महेसाणा (माळशिरसकर) ३८४ ००१

# श्रीएकनाथांची गुरुनिष्ठा

**सौ. निर्मला दि. जोशी**

सद्गुरुंचे मार्गदर्शन २०-२२ वर्षे. त्यामुळे श्रीदासबोध व श्रीज्ञानेश्वरीपरीक्षा दिल्या. जेथे नगर बिबवेवाडी येथे दर गुरुवारी श्रीदासबोध निरुपण. प.दा.अ. चे ३ वर्षे परीक्षक. स्वामी स्वरूपानंद, श्री जनार्दनस्वामी लेख लिहिताना स्फुरलेला मन पुष्प 'मी माझे मावळों सर्व । तू तुझे उबगो आता ॥ मी तू पण जगन्नाथा । होवो एकची तत्त्वता ॥'

*गुरु हा संत कुळीचा राजा । गुरु हा प्राण विसावा माझा ॥*
*गुरु विण देव दुजा नाही ॥*

श्री एकनाथ हे गुरुपरंपरेतील श्रेष्ठ अधिकारी पुरुष होते; नव्हे ते आहेतच. ज्ञानेश्वरांच्या गळ्याला मुळी लागली तर नाथांना दृष्टांत झाला. केवढी योग्यता व अधिकार आहे.

*'चला कल्पतरुंचे आरव । चेतना चिंतामणिंचे गाव ।*
*बोलते जे अर्णव । पीयुशाचे ।'*

संत म्हणजे जणू चालते-बोलते कल्पतरुंचे कोवळे-कोवळे कोंबच असतात. चिंतामणी ऐहिक इच्छा पूर्ण करतात; पण हे संत साधकांच्या पारमार्थिक इच्छा पूर्ण करणारे, चैतन्यरूप चिंतामणींचे रत्नांचे गावच. संत बोलायला लागले की जणू अमृताचा सागर उचंबळतो आहे असे वाटते.

श्री एकनाथ स्वतःबद्दल मोकळेपणाने असे सांगतात की, "संत भानुदास माझे पणजोबा. त्यांच्यामुळे आमचा वंश देवाला प्रिय झाला. त्यांनी लहानपणीच सूर्याला प्रसन्न करून घेतले. मानाभिमान सोडून भानुदास ईश्वराकडून पावन झाले व स्वतः ज्ञान सूर्य बनले. त्यांचे काव्य पाहण्यास प्रत्यक्ष विठ्ठल आले होते. विठ्ठलाच्या कानातील कुंडले झळकली व त्यांचे आगमन समजले. भानुदासांचा मुलगा चक्रपाणी. चक्रपाणीला एक मुलगा झाला त्याचे नाव सूर्य ठेवले. पुढे चक्रपाणींनी देह ठेवला. त्यांनी आपल्या मुलाचे नाव सूर्य ठेवले होते. नाथांचे वडील सूर्याजी व आई रुक्मिणी. त्यांच्या लहानपणीच त्यांचे आई-वडील इहलोक सोडून गेले. जनार्दन स्वामी नाथांचे गुरू व माय-बाप. नाथ म्हणतात भानुदासांमुळे माझ्यावर जनार्दनांनी कृपा केली. दत्तात्रयांचे शिष्य तीन - पहिला सहस्त्रार्जुन, दुसरा यदु व, तिसरा जनार्दन एकनाथांचे सद्गुरुंवर आलोट प्रेम. ते म्हणतात, माझे सद्गुरु स्वयंप्रकाश आनंदसागर आहेत. त्यांनी माझ्यावर कृपा सावली केली म्हणून मी एकनाथी भागवत, एकनाथ रामायण, एकनाथी भारुडे लिहू शकलो. जनार्दनांनी मला ब्रह्म दाखविले आणि माझ्या मुखांतून अखंड नाम वदविले. अखंड नामाचे स्मरण होणे ही सद्गुरु कृपा संपादन झाली. त्यांनी मला ब्रह्मज्ञानाचा उपदेश केला. त्यांच्या पायी जीव ठेवून मी प्रपंचाचे व्यवसाय करतो. माझे प्रेम कुणावर नाही. मी मनाने अखंड त्यांचीच पूजा करतो. त्यामुळे मला समाधान मिळते. मी माझे मन त्यांचे पायी लीन केले आहे. त्यांचे ध्यान अखंड माझ्या हृदयात आहे. त्यांनी माझ्यावर कृपा केली व माझ्याकंठी नाममाळ आणि हृदयात गोजिरी गुरुमूर्ती ठेवली. जनार्दनांची भेट झाल्यामुळे वेदांत व सिद्धांत पाहण्याची आटाआटी थांबली. माझ्या मनाच्या भ्रांतीचे निरसन झाले. त्यांनी ब्रह्मानंद सोपा केला. माझे मन शुद्ध व शांत झाले. तुकाराम म्हणतात, 'मन करा रे निर्मळ । सर्व साधनांचे फळ । शास्त्रांनी' वर्णन केल्याप्रमाणे अपरोक्ष अनुभुती नाथांना आली. ते म्हणतात, 'सद्गुरुंना मी माझा प्राण अर्पण केला व देह त्यांना विकला. त्यामुळे द्वैताची भावना नाहीशी झाली. ब्रह्मसुखाने मी सदासंपन्न झालो. जनी वनी ओतप्रोत भगवंतच भरला आहे असे भासू लागले. जनार्दनाने मला भागवताची गोडी लावली. मला संस्कृत चांगले येत नव्हते हे माझे अज्ञान मी जाणून आहे. परंतु मी लिहीत नाही म्हटले तर प्रत्यक्ष श्रीराम मला प्रेरणा देऊ लागले. त्या प्रेरणेला डावलून मी लिहीना तेव्हा स्वप्नामध्ये श्रीराम मला रामायणाचा संपूर्ण विस्तार व ग्रंथाचा अराखडा दाखवू लागले. जागेपणी माझ्यासमोर रामकथा प्रकाशू लागली. अशी रामाने माझी पाठ पुरवली. माझे सारे लक्ष रामायणात गुंतवले तरी रामायण लिहिणे नाथ टाळू लागले, तेव्हा त्यांच्या मीपणाचाच ताबा रामाने घेतला. मी झोपलो असता श्रीराम मला उठवत व रामायण लिही सांगत. माझे मीपण रामाने घेतले व रामच भावार्थ रामायणाचा कर्ता झाला. मुलाचा हात धरून बाप जसा स्वतःच अक्षरे लिहितो त्याचप्रमाणे एकादश स्कंधाचा अर्थ जनार्दनानेच मजकडून वदविला. मी अज्ञानी मजकडून ज्ञान बोलवले. त्याने माझे मीपण नेले व मग आपल्या सत्तेने शब्दांच्याद्वारा परमार्थ बोलविला. हा ग्रंथ म्हणजे नाथभागवत, एकनाथांची स्थिती तेच वर्णन करत आहेत. ते म्हणतात, 'नाथ मोठा भक्त आहे. कोणी तो जीवनमुक्त आहे असे म्हणतात, तर कोणी त्याला प्रापंचिक मानतात. लोक म्हणतात नाथांना आसन माहीत नाही. मंत्र, मुद्रा, माळा, जप यातले काहीच माहीत नाही. याचा मंत्र कोणता? हा शिष्याला काय उपदेश देतो हे कोणालाच तो कळू देत नाही. असे असता श्रद्धाळू लोक केवळ भाविकपणाने त्यांच्या नादी लागले आहेत. नुसत्या हरीनामाच्या घोषाने त्याने भाविकांना भुरळ पाडली आहे, असे नाना प्रकारचे विकल्प जनार्दन स्वतःच लोकांमध्ये उपस्थित करतो.

*जैसी स्थिती येई । तैशा परी राहे । कौतुक तू पाहे संचिताचे ।*

क्रियामाण कर्म सर्व भगवंताच्या अधिष्ठानावरच आहे. अधिष्ठानाकडे लक्ष, सर्व कर्तृत्व त्याचे मानून आनंदात राहणे हे या संतांना सद्गुरु कृपेनेच साधले. नाथ म्हणतात या ग्रंथाचा जे आदर

करतील व जे उपेक्षा करतील व निंदा करतील ते सर्वच मला सद्गुरुरूप ब्रह्ममूर्तीच आहेत.''

*'या उपाधी माजी गुप्त । चैतन्य असे सर्वगत ।*
*ते तत्त्वज्ञ संत । स्विकारीती ।'*

उपाधी यांना बाधत नाही. कारण तत्त्वाकडे पूर्ण लक्ष वेधलेले असते. जनार्दनांनीच ग्रंथ लिहिला हा भाव व त्यातही कोणी टीका, मत्सर केल्यास त्याचा राग नसून त्यांना सद्गुरु रूपात पाहणे हे असामान्य कर्म, मनाची शक्ति भगवंताकडे लावली, मनाला त्या चरणी अर्पण केल्यामुळे बाधा संपली.

श्री श्रीधर स्वामी म्हणतात, 'बाधा कसलीही मज नसावी । सकल अपदा नष्ट व्हावी । निर्विघ्न पणेची गां मज मिळवी । ब्रह्म पदी तुझ्या । सुष्टांना दुष्टांना सारखेपणाने पाहणे हे असामान्य कर्म त्यांना साधले. सद्गुरु कृपेचं फळ हेच आहे.'

नाथ म्हणतात, 'मी नामाचे अमृत सेवन केले व समाधान पावलो. सर्व संतांनी नामाचा महिमाच वर्णन केला आहे. साधन अभ्यास ग्रंथाचे विचार पाहता नाम व राम ओंकाराने जोडलेले एक साधन. मोठे प्रभावी साधन. सगळे संत आपल्या शक्तीने भक्ताला देतात. भक्त पावन होतो. आपले कमलमुख नामाकरताच आहे. नामाने वाणी शुद्ध होते. अंतःकरण निर्वैर राहते. नाथ म्हणतात, 'मी ध्यानी, मनी नाम जपले. मी नित्य नामच स्मरतो म्हणून आत्माराम नामरूप झाला. नामाचा निदिध्यास ज्याला लागला त्याचा मी दास आहे. जनार्दनाने कृपा केली व माझ्या मुखी अखंड नाम दिले. नामरूपी संजीवनी ध्यानी मनी आहे हेच परम भाग्य आहे.'

*'राम आकाशी पाताळी । राम आहे भूमंडळी ।'*

राम नाही अशी जागाच नाही. माझी वासना रामरूप झाली. मी माझी वासना बळाने भाजली. तेव्हा वैराग्याचे बळ अंगी आले. माझे चित्त चिंतनात स्थिर झाले. चित्त चिंतनाला विसरले. चित्त चैतन्यरूप झाले. आत्मानंदामध्ये माझ्या वृत्तीची निवृत्ती झाली. क्रिया, कर्म, धर्म, सर्वच ब्रह्मरूप झाले. त्याग व भोग भ्रम आहे. काही त्यागावे नलगे, काही भोगावे नलगे. मीच देव मीच भक्त. समस्त पूजा उपचार मीच आहे. मी देव झालो. चारही देहामध्ये आत्मा परिपूर्ण आहे. देवाशिवाय जगात काहीच नाही. मला आधीव्याधी नाही.

*कैंची आधी कैंची व्याधी । अवघी संपली उपाधी ।*
*मन राम रंगी रंगले । अवघे रामरूप झाले । (स्वरूपानंद)*

द्वैत मावळल्यामुळे मी एकटा एक राहिलो. मी निरंजन बनलो. निरंजन, ज्याला कशाचाही रंग लागत नाही असा झालो.म्हणून मी जनांत जात नाही. सद्गुरुंनी डोळ्यांत अंजन घातले. त्यामुळे पडदा फाटला व आत्मवस्तूचे दर्शन झाले. देहात शांती निर्माण झाली. आशातृष्णेचे जाळे तोडले. कामनेचे तोंड काळे झाले. माझ्या सर्व व्याधी घालवून मला गोड परमार्थ दाखवला. सद्गुरुंच्या कृपेने देहातच मी देव पाहिला. जप, तप, अनुष्ठान, इंद्रियदमन मी केलं नाही. चारही देहासहित मी सद्गुरुंना शरण गेलो व चरणी मिठी मारली. हृदयात पूर्ण ब्रह्म बिंबले. मला पूर्ण समाधी लागली. जिथे परापश्यंतीची भाषा मावळते तिथे स्वयंप्रकाश आत्म्याचे दर्शन घडते. हा अनुभव मी जनार्दनाच्या कृपेने घेतला. जन्मोजन्मीचा शीण गेला. उपाधी तुटली. मी मनानेच जनार्दन धरला व वरमाला जनार्दनाला घातली. परेमध्ये जे आत्मसुख आहे ते जो पश्यंतीमध्ये भोगतो तो राजयोग्यांचा मुगुटमणि होय. ही सिद्धांची खूण आहे. स्वयंप्रकाशांत मी सुस्नात झालो व द्वैतभाव जाऊन निर्मळ झालो. आत्म विद्येचे वस्त्र मी ल्याइलो. भूत दया हे भस्म अंगी लावले. अकार हरवला. उकार विसरला आणि मकाराच्या-पलीकडील मूलारंभ प्रणय मी धरला. अहं, सोऽहं मावळले मी एकटा उरलो, अहं सोडल्याने सर्व कर्मे कृष्णार्पण होऊ लागली. संसाराला तीन ओंजळी पाणी दिले. सोऽहंचा अखंड जप चालू झाला. अखेर आत्मतत्त्वाने सर्व भूतमात्रांना नमन केले. ईश्वर दर्शन होण्यासाठी सात अवस्थांतून जावे लागते. श्रवण ही पहिली पायरी, स्मरण ही दुसरी अवस्था होय. नित्य-अनित्य ज्ञान ही तिसरी अवस्था तर मन ही चौथी अवस्था होय. निदिध्यासन पाचवी तर संपूर्ण वैराग्य ही सहावी अवस्था होय. या सर्वांचे पर्यवसान आत्मसाक्षात्कारामध्ये घडून येते. नाम हेच ब्रह्म आहे. जागेपणी स्वप्नांमध्ये आणि गाढ झोपेत नाम घेतले तर मोक्ष प्राप्त होतो हा अनुभव जनार्दन सांगत आहेत. माझ्या निकट नाम असल्याने सर्व सृष्टी ब्रह्मानंदाने भरलेली आहे, याची मला जाणीव आहे. वासना सुटल्यामुळे मी टाकाऊ, कुचकामाचा झालो. कामना असलेले लोक मला डरपोक, भित्रा, भ्याड म्हणू लागले. ही जगाची चाल नाथांनाही जाणवली आहे. हे माझे वागणे लौकिकापुरते नसून मी अव्यंग सुख सर्वस्व साधले. एकनाथ म्हणतात खरे सांगायचे म्हणजे सर्व परमार्थ मनानेच साधावा लागतो. मनामध्येच करायचा व मन हे पुष्प भगवंताला अर्पण करायचे. स्नान, ध्यान, अर्चन, जप, तप, पुण्य, पाप, समाधी हे मनाचाच व्यापार बंद करण्याकरता आहे. मन नाही अशी थोर अवस्था नामस्मरणाने करून घ्यायची व सर्व श्रेय सद्गुरुंना देऊन मोकळे व्हायचे, त्या आत्मानंदात राहायचे हा भक्तीमार्ग अनुभवावयाचा आहे. श्रीसमर्थ म्हणतात,

*'ज्ञात्यास संकल्पची असेना । म्हणोन त्यांचेन बाधवेना । या कारणे आत्मज्ञाना अभ्यासावे ।। अभ्यासिलीयां आत्मज्ञान । सर्व कर्मास होय खंडण । हे रोकडी प्रचित प्रमाण । संदेह नाही ।। ज्ञाने विण कर्म बिघडें हे तो कदापि न घडे । सद्गुरुवीण ज्ञानजोडे । हेहि अघटित ।। म्हणोन सद्गुरु करावा । सत्संग शोधोन धरावा । तत्त्व विचार विवरावा । अंतर्यामी । तत्त्वे तत्त्व निरसोन जाता । आपला आपणचि तत्त्वतां । अनन्यभावे सार्थकता सहजचि ।। जाली (हरि ओम तत्सत)'*

सौ. निर्मला दि. जोशी
अनिकेत सोसायटी नं.१, स्वामी विवेकानंदपथ,
बिबवेवाडी, पुणे ४११ ०३७.



## मागणे

मंदिरात घुमतो नाद । अन् भक्तीरसाची साद ।
चढे कुणा उन्माद । बेहोशीत ॥
संसारी विटले मन । थकून झाले क्षीण ।
कोण तारी तुजवीण । देवराया ॥
उदासल्या अंधारी । वाजे दुःख एकतारी
तूच आता निवारी । संकट माझे ॥
जन्माला रडतच आले । आजवरी किती रडले ।
प्रत्येक स्वप्न मोडले । हृदयीचे ॥
प्रत्येक जण स्वार्थाने । भरलेला सर्वार्थाने ।
माझे झाले खेळणे । आयुष्याचे ॥
ढोंगी अन् अप्पलपोटे । मलाच म्हणती खोटे ।
मनी उदास निराश वाटे । काय सांगू ॥
केलास खरा तू कळस । भांगेत लाविली तुळस ।
आणि म्हणीसी पळस । तीन पानांचा ॥
अंगीचे बळ सरले । मनाचे जोमही जिरले ।
काय आता उरले । जगण्यासाठी ॥
शरीराची व्यर्थ धडपड । मनाची अनंत तडफड ।
तूच लावूनी तड । थांबव आता ॥
दिलास जन्म जर पुढचा । देई रे वृक्षवल्लींचा
मूकपणे जनसेवा । आनंदे करीन ॥

**डॉ. कु. नंदा शांताराम शिंदे**
सायली क्लिनिक १२३ / ८,
शिवदर्शन पुणे - ४११ ००९.



## मन

*माणसाचं मन कसं असतं*
*ज्याचं वर्णन करणं शक्य नसतं*
*क्षणात अथांग सागर बनतं*
*क्षणात अणुपेक्षाही क्षुद्र होतं*
*कधीकधी योग्य वळणं घेतं*
*नाहीतर बेफाम धावत सुटतं*
*कधी कधी भावनाच हरवून बसतं.*
*नाहीतर अनावर होऊन छळतं*
*कधी कोणावर प्रेम करतं*
*नाहीर द्वेषात गुरफटून जातं*
*कधी कोणाला आदर्श मानतं*
*नाहीतर तिटकाऱ्यानं भरतं*
*माणासचं मन कसं असतं*
*ज्याचं वर्णन करणं शक्यच नसतं*
*कधीतरी 'खूप' परिपक्व बनतं*
*नाहीतर निरागसतेतचं हरवतं*
*कधीतरी विचारात हरवून जातं*
*नाहीतर अगदीच रितं रितं बनतं*
*खरोखर मनीं काय वसतं ?*
*ते भावनांची गुंफण करीत असतं*
*विचारांचं मंथन करीत रहातं*
*पण.... मन... मन.... मात्र मनचं असतं*
*खरंच माणसाचं मन हे असच असतं*
*ज्याचं वर्णन करणं शक्य नसतं*
*क्षितिजा उद्धव सोमण*

**कु. डॉ. क्षितीजा सोमन**
ब, ५ मालकंस सोसायटी,
पौडफाटा, कर्वेरोड,
एरंडवणे, पुणे ४११ ०३८.

## ईश्वरी करणी

*एक महानशी शक्ती*
*चालविते जगती सूत्र*
*हीच शक्ती परमेश्वर*
*सांभाळिते प्राणी मात्र ॥*
*माझ्या मनि हाच देव*
*आहे वस्तीला नेहमींचा*
*ईश्वरासि आवडतो*
*प्रेमभाव भाविकांचा ॥*
*किती, कितिक सांगावी*
*ईश्वराचि रूपें नाना*
*ठायिं ठायिं दिसताती*
*त्याच्या आस्तित्वाच्या खूणा ॥*
*हत्ती एवढा महान*
*मुंगी निर्मिली लहान*
*मार्गि लावीले जीवन*
*किती विचार करून ॥*
*ज्याचे त्याला दाविलेले*
*अन्न निर्माण करून*
*कसे, कैसे, मीळवावे*
*हीचं बुद्धि त्या देऊन ॥*
*खडक फोडितां गर्भांत*
*दिसे बेडकी पाण्यात*
*पडे कोडे मानवास*
*असे ईश्वरी संकेत ॥*
*मिळे नारळांत पाणी*
*अशी ईश्वरी करणी*
*धरा विश्वास मानसी*
*करू नये हेटाळणी ॥*

**सौ. कमला ना. दातार**
१६१३ सदाशिव पेठ,
टिळक रोड,
पुणे ३०.